॥ ॐ तत्सत् ॥

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ

[ मूळ श्रुति, अर्थ, शांकरभाष्य, स्पष्टीकरण व अवतरणें यांसह भाष्यार्थ. ]

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त—विष्णु वामन बापटशास्त्री.



आवृत्ति दुसरी.

वैशाख शु० १५ शके १८४६ रक्ताक्षीनाम संवत्सर.

पुणें, ता० १८ मे १९२४

किंमत [illegible] रुपाये

# प्रस्तावना

**तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थाची** पहिली आवृत्ति संपल्यामुळें आज ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करीत आहों. यांत पुष्कळच सुधारणा केली आहे. पहिल्या आवृत्तींतील बहुतेक सर्व दोष काढून अधिक सुबोध होण्यासाठीं भाष्याचीं वाक्यें ठिकठिकाणीं तोडलीं आहेत, हें वाचकांच्या लक्षांत येईल. पहिल्या आवृत्तींत श्रुतीचा अर्थ दिला नव्हता. कारण त्यापूर्वी '**सार्थ तैत्तिरीयोपनिषद्**' प्रसिद्ध केलें होतें. पण या आवृत्तींत श्रुतीचा सरळ अर्थ दिला आहे. तिचा शब्दशः अर्थ व सर्व उपनिषदांचें सिंहावलोकन "**सुबोध उपनिषत्संग्रहांत**" सविस्तर दिलेलीं आहेत. जिज्ञासूंनीं तीं त्यांत पहावीं.

**वि. वा. बापट**

---

# अनुक्रमणिका

ॐ तत्सत् ।

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ

## उपोद्घात

[ कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीयशाखेच्या उपनिषदाचें व्याख्यान करण्याची इच्छा करणारे भगवान् भाष्यकार त्या उपनिषदाचें प्रतिपाद्य असें जें 'जगाच्या जन्मादिकांचें कारण' या तटस्थ लक्षणानें मंदमतींना सामान्यतः ज्ञात होणारें व 'सत्य-ज्ञानादि' स्वरूप-लक्षणानें विशेषतः निश्चित झालेलें ब्रह्म तें नमस्काराच्या मिषानें संक्षेपतः दाखवितात—]

**यस्माज्जातं जगत्सर्वं यस्मिन्नेव प्रलीयते ।**
**येनेदं धार्यते चैव तस्मै ज्ञानात्मने नमः ॥ १ ॥**

**अन्वयार्थ**—[ यस्मात् सर्वं जगत् जातं—] ज्याच्यापासून हें सर्व जगत् उत्पन्न झालें, [ यस्मिन् एव प्रलीयते—] ज्यामध्येंच तें पूर्णपणें लीन होतें व [ येन च इदं धार्यते—] ज्याच्याकडून हें धारण केलें जातें [ तस्मै ज्ञानात्मने नमः—] त्या ज्ञानात्म्याला नमस्कार असो. ( 'यस्मात्' ही पंचमी विभक्ति निमित्त व उपादान या अर्थीं साधारण असल्यामुळें त्या पदानें ब्रह्माचें दोन्ही प्रकारचें कारणत्व विवक्षित आहे. 'यस्मिन्०' इत्यादि दुसऱ्या चरणानें जगाची प्रकृति दाखविली आहे. कारण कार्याचा विलय नियमानें प्रकृतींतच होतो. 'येन०' इत्यादि तिसऱ्या चरणानें जगाचें साधारण कारण सांगितलें आहे. या श्लोकाच्या तिन्ही चरणांनीं ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें आहे आणि 'ज्ञानात्मने' या पदानें त्याचें स्वरूपलक्षण सांगितलें आहे. ) [—गुरुभक्ति हें विद्याप्राप्तीचें अंतरंग साधन आहे, असें सुचविण्यासाठीं गुरूंना प्रणाम करितात—]

**यैरिमे गुरुभिः पूर्वं पदवाक्यप्रमाणतः ।**
**व्याख्याताः सर्ववेदान्तास्तान्नित्यं प्रणतोऽस्म्यहम् ॥२॥**

**अन्वयार्थ**—[ पूर्वं यैः गुरुभिः इमे सर्ववेदान्ताः पदवाक्यप्रमाणतः व्याख्याताः—] पूर्वीं ज्या गुरूंनीं हे सर्व वेदान्त—उपनिषदें पदें, वाक्यें व अनुमानादि प्रमाणें यांच्या विवेचनपूर्वक स्पष्ट रीतीनें सांगितलीं—त्यांचें व्याख्यान केलें. [ अहं तान् नित्यं प्रणतः

अस्मि–] मी त्यांच्यापुढें नित्य प्रणत आहें. [–आतां भाष्यकार आपल्या इष्ट कर्तव्याची प्रतिज्ञा करितात—]

**तैत्तिरीयकसारस्य मयाऽऽचार्यप्रसादतः ।**
**विस्पष्टार्थरुचीनां हि व्याख्येयं संप्रणीयते ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—**[ मया तैत्तिरीयकसारस्य इयं व्याख्या विस्पष्टार्थरुचीनां अर्थे आचार्य-प्रसादतः संप्रणीयते–] मी तैत्तिरीयकसाराची ही व्याख्या विशेष प्रकारें स्पष्टार्थ जाणण्याची इच्छा करणारांकरितां आचार्यांच्या प्रसादानें करतों. ( मजकडून ही व्याख्या केली जाते, असा मूळ श्लोकांत कर्मणि प्रयोग आहे. ज्यांना शास्त्रव्युत्पत्ति झालेली असते, त्यांना पदांपासून शब्दार्थाचें स्मरण होऊं शकतें, आणि शब्दांनीं ज्याचें स्मरण करून दिलें आहे अशा शब्दार्थांचा जो संसर्ग तोच वाक्यार्थ आहे. शिवाय सूत्रकारांनीं उपनिषदांच्या तात्पर्याचें निरूपण केलें आहे. यास्तव आमचा हा प्रयत्न व्यर्थ आहे, असें जरी वाटलें तरी मंदमतींना स्वतःच बोध होऊं शकत नाहीं. यास्तव तशा अगदीं पष्टार्थाची इच्छा करणारांकरितां हें व्याख्यान आहे, असा भाष्यकारांचा आशय आहे.)

[–' या उपनिषदाची निराळी व्याख्या करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण कर्म-विचारांतच त्याचा अर्थ येऊन गेला आहे, आणि निःश्रेयस म्ह० मोक्ष हें प्रयोजन कर्मांच्या अनुष्ठानानेंच सिद्ध होणें शक्य आहे, ' असें कोणी म्हणेल म्हणून भाष्यकार कर्मकांडाचें प्रयोजन '**नित्यानि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—नित्यान्यधिगतानि कर्माण्युपात्तदुरितक्षयार्थानि, काम्यानि च फला-र्थिनां पूर्वस्मिन्ग्रन्थे ॥**

**भाष्यार्थ—**पूर्व ग्रथांत ह्म० कर्मकांडांत संचित पापाचा क्षय व्हावा यासाठीं सांगि-तलेल्या–पापक्षय हें ज्यांचें प्रयोजन आहे, अशा नित्य कर्मांचें ज्ञान झालें, तीं कर्में कळलीं. त्याचप्रमाणें फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषांना त्या त्या फलासाठीं करावयास उचित असलेल्या काम्य कर्मांचेंहि ज्ञान झालें. ( वरील शंकेचें समाधान—जैमिनीनें ' अथातो धर्मजिज्ञासा ' या सूत्रांत धर्मशब्दाचा उल्लेख करून साध्य धर्माचाच विचार करून सिद्ध वस्तूचा विचार सोडला आहे. त्यामुळें उपनिषदें गतार्थ झालेलीं नाहींत; त्यांचा अर्थ धर्मविचारांत–कर्मविचारांत–होऊन गेलेला नाहीं. ' पुरुष धर्माचरणानें पापाचा क्षय करतो, ' सार्थ ना. पृ. ७८–अशा अर्थाचें श्रुतिवाक्य असल्यामुळें जिवंत मनुष्याला अवश्य कर्तव्य असलेलीं कर्में संचित पापकर्मांचा क्षय व्हावा, यासाठीं आहेत. मोक्षप्राप्तीसाठीं तीं नाहींत. कर्मकांडांत केवल यावज्जीव अवश्य कर्तव्य अस-लेलीं नित्य कर्मेंच ज्ञात झालेलीं नाहींत. तर स्वर्ग, पशु इत्यादिकांची इच्छा करणाऱ्या

पुरुषांकरितां काम्य कर्मेंहि ज्ञात झालीं आहेत. तींहि मोक्षाकरितां नाहींत. कारण ज्यांना स्वर्गाची इच्छा असेल त्यानें अमुक करावें, पशूची इच्छा असेल त्यानें अमुक करावें; इत्यादि विधानांप्रमाणें ' ज्याला मोक्षाची इच्छा असेल त्यानें अमुक कर्म करावें, ' असें विधान कोठेंहि नाहीं. यास्तव संसार हेंच कर्मांचें फल आहे.) [–याप्रमाणें कर्मकांडाचा अर्थ सांगून त्यांत ज्यांचा विचार केलेला नाहीं अशा उपनिषदांचें प्रयोजन '**इदानीं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—इदानीं कर्मोपादानहेतुपरिहाराय ब्रह्मविद्या प्रस्तूयते ॥**

**भाष्यार्थ—**आतां कर्मांच्या उपादानामध्यें म्ह० अनुष्ठानामध्यें जो हेतु त्याच्या निवृत्तीकरितां ब्रह्मविद्येचा आरंभ केला जातो. ( अर्थात् उपनिषदें कर्मांचें त्यांच्या हेतू-सह उन्मूलन करणारीं असल्यामुळें कर्मकांडाच्या विरुद्ध आहेत. त्यामुळें कर्मकांडांत तीं गतार्थ होऊं शकत नाहींत.) [ "–अहोपण, कर्मानुष्ठानाचा हेतु नियोग आहे. नियोग म्हणजे ' हें कर ' अशा प्रकारचें विधिवाक्य. तो प्रमाणसिद्ध असल्यामुळें त्याचा विद्येशीं विरोध संभवत नाहीं." या शंकेचा परिहार '**कर्महेतुः०**' इत्यादि भाष्यानें करितात—]

**भाष्यं—कर्महेतुः कामः स्यात् । प्रवर्तकत्वात् । आप्तकामानां हि कामाभावे स्वात्मन्यवस्थानात् प्रवृत्त्यनुपपत्तिः । आत्मकामित्वे चाप्तकामता । आत्मा हि ब्रह्म । तद्विदो हि परप्राप्तिं वक्ष्यति । अतोऽविद्यानिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानं परप्राप्तिः । " अभयं प्रतिष्ठां विन्दते " " एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति " इत्यादि श्रुतेः ॥**

**भाष्यार्थ—**कर्मांचा हेतु काम आहे. ( नियोग नव्हे. ) कारण काम पुरुषाचा प्रवर्तक आहे. ( अमुक साध्याचें हें अमुक साधन आहे, एवढेंच शास्त्र सांगतें. तें ऐकून ज्याचा ज्याविषयीं अभिलाष असतो, तो त्यामध्यें कामामुळेंच प्रवृत्त होतो. यास्तव कामच प्रवर्तक आहे. नियोग नव्हे. नियोगामध्यें प्रवर्तकत्वाचा संभवहि नाहीं, असा भावार्थ.)[–'काम असला तरच पुरुषाची प्रवृत्ति होते' असा काम व प्रवृत्ति यांचा अन्वय दाखवून 'कामाच्या अभावीं प्रवृत्तीचाहि अभाव होतो' असा व्यतिरेक '**आप्तकामानां०**' इत्यादि भाष्यानें दाखवितात–]=कारण ज्यांना सर्व काम प्राप्त झाले आहेत, ज्यांच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत अशा पुरुषांचें कामाच्या अभावीं स्वात्म्यामध्यें—स्वरूपा-मध्यें अवस्थान होत असल्यामुळें त्यांच्या प्रवृत्तीची अनुपपत्ति होते.[ –" अहोपण, इष्ट विषयाची प्राप्ति झाली म्हणजे कामाची निवृत्ति होते, असा अनुभव आहे. त्यामुळें इष्ट विषयप्राप्ति हाच कामनिवृत्तीचा हेतु आहे. विद्या कामनिवृत्तीचा हेतु नव्हे. 'तेव्हां कर्मांच्या

हेतूचा परिहार करण्यासाठीं विद्येचा आरंभ आहे,' असें कसें ह्मणतां?" अशी शंका घेऊन '**आत्मकामित्वे०**'इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आत्म्याची कामना झाली कीं आप्तकामता सिद्ध होते. (अर्थात् इष्ट विषयाची प्राप्ति झाली असतां कामाची तात्कालिक शांति होते; सर्वथा उच्छेद होत नाहीं. कारण कामाचा जर सर्वथा उच्छेद झाला असता तर पुनः विषयाची आकांक्षाच झाली नसती. परंतु इतर विषय तर राहिलेच, पण त्या विषयाचीहि थोड्याच वेळानें पुनः कामना होते, असा अनुभव आहे. यास्तव विषयप्राप्ति झाली असतां क्षणभर होणारी जी तृप्ति ती खरी कामनिवृत्ति नव्हे. आत्मा हीच एक परमार्थ वस्तु आहे. त्याहून दुसरी वस्तूच नाहीं, अशी निरंकुश आप्तकामताहि आत्मकामत्व झालें असतांच होते. कारण आत्मकाम झाल्यावर कामना करण्यास योग्य असें दुसरें कांहीं उरतच नाहीं. ज्याला आत्म्याचें अद्वय आनंदरूप माहीत नसतें तोच विषयांना आत्मव्यतिरिक्त पाहतो व त्यांची इच्छा करतो. अर्थात् काम आत्म्याच्या अज्ञानामुळें उद्भवणारा असल्यामुळें आत्मविद्याच त्याच्या निवृत्तीचें साधन आहे असा भावार्थ.) [–"अहो, आत्मविद्या कामविरोधिनी असू दे. पण तुम्ही कर्महेतूच्या परिहारासाठीं ब्रह्मविद्या आरंभिली जाते असें कसें म्हणता?" याचें उत्तर–'**आत्मा हि०**'या वाक्यानें देतात–]=आत्माच ब्रह्म आहे. (त्यामुळें कर्म-हेतु जो काम त्याच्या निवृत्तीसाठीं ब्रह्मविद्या आरंभिली जाते.)=आनन्दमय परमात्म्याला जाणणाऱ्या पुरुषालाच परप्राप्ति होते, असें श्रुति पुढें सांगेल. यास्तव अविद्येची निवृत्ति झाली असतां स्वात्म्यामध्यें, स्वतःच्या अविनाशी स्वरूपामध्यें स्थित होणें ही परप्राप्ति आहे. 'अभयं प्रतिष्ठां विन्दते' सु. उ. पृ.२२६–'एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति' सु.उ.पृ.२३३–इत्यादि श्रुति याविषयीं प्रमाण आहे. [–येणेंप्रमाणें उपनिषदें कर्मकांडानें गतार्थ झालेलीं नाहींत व कर्मांच्या अनुष्ठानानें स्वरूपावस्थानरूप मोक्ष संभवत नाहीं; यास्तव उपनिषदांच्या व्याख्यानाचा आरंभ करणें उचित आहे, असें सांगून पुनः त्याचा आरंभ करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असें ह्मणणाऱ्या वाद्याचा अभिप्राय '**काम्यप्रतिषिद्धयोः०**' इत्यादि भाष्यानें प्रगट करितात–]

**भाष्यं—काम्यप्रतिषिद्धयोरनारम्भादारब्धस्य चोपभोगेन क्षयान्नित्यानुष्ठानेन प्रत्यवायाभावादयत्नत एव स्वात्मन्यवस्थानं मोक्षः ॥**

**भाष्यार्थ**—काम्य व निषिद्ध कर्मांचा आरंभच केलेला नसल्यामुळें व प्रारब्ध कर्मांचा, त्यांच्या फलांचा उपभोग घेतल्यानें क्षय झाल्याकारणानें आणि नित्य कर्मांच्या अनुष्ठानानें प्रत्यवायाचा अभाव झाल्यामुळें अनायासानेंच स्वात्म्यामध्यें अवस्थान, हा मोक्ष सिद्ध होतो. (कारण काम्य व निषिद्ध कर्मांचें अनुष्ठान, प्रारब्धाचा अवशेष व प्रत्यवायप्राप्ति हीं पुनर्जन्माचीं कारणें आहेत. यास्तव त्यांचा अभाव होतांच आगामि

–पुढील शरीराची उत्पत्ति होत नाहीं आणि शरीराच्या अभावीं स्वरूपावस्थानरूप मोक्ष यत्नावांचूनच सिद्ध होतो. म्हणजे शरीराच्या उत्पत्तीचें कांहीं कारणच न राहिल्यामुळें मोक्षाकरितां निराळा यत्न करावा लागत नाहीं. अर्थात् मोक्ष अन्य उपायानें साध्य होण्यासारखा जर आहे तर ज्ञानाकरितां उपनिषदाच्या व्याख्यानास आरंभ करण्याची काय आवश्यकता आहे, असा भावार्थ.)[–आतां याविषयींच '**अथवा०**' इत्यादि भाष्यानें दुसरें मत सांगतात–]

**भाष्यं—अथवा निरतिशयायाः प्रीतेः स्वर्गशब्दवाच्यायाः कर्महेतुत्वात्कर्मभ्य एव मोक्ष इति चेत् ॥**

**भाष्यार्थ—**अथवा स्वर्गशब्दवाच्य निरतिशय प्रीतीला कर्महेतुत्व असल्यामुळें कर्मांपासूनच मोक्ष होतो, असें ह्मणाल (तर तें बरोबर नाहीं. ज्योतिष्टोमादि जें स्वर्गाचें साधन तेंच मोक्षाचें साधन आहे. कारण स्वर्ग या शब्दाचा अर्थ अशा निरतिशय प्रीतीचा मोक्षावांचून इतर अवस्थेंत संभव नाहीं आणि शरीर असेपर्यंत क्लेश होणें, अत्यंत अवश्य आहे, असा भावार्थ) [–यांतील पहिलें मत हा ऐकभविक पक्ष आहे. ऐकभविक ह्म० सर्व संचित कर्मांमुळें एकच उत्तर जन्म प्राप्त होतो, अशी समजूत. यास्तव भाष्यकार प्रथम त्या मताचेंच निरसन '**न कर्मानेकत्वात्०**'इत्यादि भाष्यानें कारितात–]

**भाष्यं—न । कर्मानेकत्वात् । अनेकानि ह्यारब्धफलान्यनारब्धफलानि चानेकजन्मान्तरकृतानि विरुद्धफलानि कर्माणि सम्भवन्ति । अतस्तेष्वनारब्धफलानामेकस्मिञ्जन्मन्युपभोगक्षयासंभवाच्छेषकर्मनिमित्तशरीरारम्भोपपत्तिः कर्मशेषसद्भावसिद्धिश्च । "तद्य इह रमणीयचरणाः" "ततः शेषेण" इत्यादिश्रुतिस्मृतिशतेभ्यः ॥**

**भाष्यार्थ—**तें बरोबर नाहीं. कारण कर्मैं अनेक आहेत. ज्यांच्या फलांना आरंभ झाला आहे व ज्यांच्या फलांना आरंभ झालेला नाहीं, अशीं अनेक अन्य जन्मांमध्यें आचरलेलीं व विरुद्ध फळें देणारीं अनेक कर्मैं संभवतात, हें श्रुतींत प्रसिद्ध आहे. यास्तव त्यांतील ज्यांच्या फलांना आरंभ झालेला नाहीं, जीं कर्मैं फलोन्मुख झालेलीं नाहींत् त्यांचा एका जन्मांत फलोपभोगानें क्षय होणें संभवत नाहीं. त्यामुळें अवशिष्ट राहिलेल्या कर्मांच्या निमित्तानें शरीराचा आरंभ होऊं शकतो आणि कर्मांच्या शेषाचीहि सिद्धि होते. याविषयीं "या लोकीं जे रमणीय–शुभ आचरण करणारे असतात त्यांना ब्राह्मणादि शुभ योनि प्राप्त होते आणि जे अशुभ आचरण करणारे असतात त्यांना कुत्रा, चांडाल इत्यादिकांची अशुभ योनि प्राप्त होते" छां. भा. ५. १०. ७. सु.उ. पृ.४०७'उपभोग घेऊन राहिलेल्या कर्मांच्या योगानें जीवाला उत्तरशरीर प्राप्त होतें.' गी. भा. पृ. ११९५

इत्यादि अनेक श्रुति-स्मृतिवचनें प्रमाण आहेत. (मुमुक्षूनें वर्तमान शरीरानें काम्य व निषिद्ध आचरण जरी न केलें तरी संचित कर्मच अनेक प्रकारचें संभवतें. त्यामुळें एकाच जन्मांत त्याचा उपभोगानें क्षय होऊं शकत नाहीं. अर्थात् वाद्यानें ' अनायासानें मोक्ष होतो ' याविषयीं वर जो हेतु दिला आहे, तो असिद्ध आहे. "मरणानें अभिव्यक्त झालेलीं सर्व कर्में मिळून एका शरीराचा आरंभ करितात. त्या शरीरांत सर्व कर्मांचा उपभोगानेंच क्षय झालेला असतो. त्यामुळें संचित कर्मच उरत नाहीं. " या शंकेचें निराकरण करण्यासाठीं ' विरुद्धफलानि ' असें भाष्यांत म्हटलें आहे. स्वर्ग हें फल देणाऱ्या ज्योतिष्टोमादि कर्मांचा व नरक हें फल देणाऱ्या ब्रह्महत्यादि कर्मांचा एकाच देहांत भोगानें क्षय होणें शक्य नाहीं. मरण सर्व कर्मांचें अभिव्यंजक आहे, मरण सर्व कर्मांना अभिव्यक्त करणारें आहे, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. त्यामुळें बलवान् कर्मानें ज्याला प्रतिबंध केला आहे, अशा दुर्बल कर्मांचें अवस्थान संभवतें, असा याचा भावार्थ. "अहो-पण, हें तुमचें म्हणणें केवल संभावनामात्र आहे, म्ह० त्याचा नुस्ता संभव आहे, एवढेंच त्यावरून ठरतें. पण त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं," अशी आशंका घेऊन तिच्या निरसनार्थ 'कर्मशेषसद्भावसिद्धिश्च०'इत्यादि भाष्य आहे. "वर्णाश्रमी लोक मरून परलोकीं जाऊन कर्मफलाचा अनुभव घेऊन ' ततः शेषेण '—त्यांतून अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें विशिष्ट जन्म घेतात," असें गौतम धर्मसूत्र आहे. वरील छांदोग्य श्रुति व हें सूत्र स्वर्गांतून खालीं येणाऱ्या अनुशयी जीवांचें अवशिष्ट कर्म विद्यमान असतें, असें दाखवितात, असा याचा भावार्थ. सु. ब्र. अ. ३. पा. १. अ. २ पृ. २५६ पहा.) [—आतां वादी संचित कर्मांचें अस्तित्व स्वीकारून दुसऱ्या देहाचा आरंभ होणार नाहीं, असें **'इष्टानिष्ट०'** इत्यादि भाष्यानें सांगतो—]

**भाष्यं—इष्टानिष्टफलानामनारब्धानां क्षयार्थानि नित्यानीति चेत् ।**

**भाष्यार्थ**—इष्ट व अनिष्ट अशीं दोन्हीं प्रकारचीं फळें देणाऱ्या संचित कर्मांच्या क्षयाकरितां नित्य कर्में आहेत, असें जर म्हणाल [ तर तें म्हणणें भाट्ट मीमांसकांच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध आहे, असें ' **न०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—न । अकरणे प्रत्यवायश्रवणात् । प्रत्यवायशब्दो ह्यनिष्टविषयः । नित्याकरणनिमित्तस्य प्रत्यवायस्य दुःखरूपस्याऽऽगामिनः परिहारार्थानि नित्यानीत्यभ्युपगमान्नानारब्धफलकर्मक्षयार्थानि ॥**

**भाष्यार्थ**—तर तें बरोबर नाहीं. कारण नित्य कर्मांचें अनुष्ठान जर न केलें तर प्रत्यवायप्राप्ति होते, असें शास्त्रांत सांगितलें आहे. प्रत्यवाय हा शब्द नेहमींच अनिष्टविषय आहे. नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें, या निमित्तामुळें उत्पन्न होणाऱ्या दुःखरूप

आगामि–भविष्यत्कालीन प्रत्यवायाच्या परिहारासाठीं नित्य कर्में आहेत, असा सिद्धान्त असल्यामुळें तीं ज्यांच्या फलास आरंभ झालेला नाहीं, अशा कर्मांच्या क्षयासाठीं आहेत असें म्हणतां येत नाहीं. [बरें, 'मुमुक्षूनें केलेलीं नित्यादि कर्में संचित कर्मांचा क्षय करण्यासाठींच आहेत, ' असें जरी समजलें तरी इष्टसिद्धि होत नाहीं, असें '**यदि नाम०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—यदि नामानारब्धकर्मक्षयार्थानि नित्यानि कर्माणि तथाऽप्यशुद्धमेव क्षपयेयुर्न शुद्धम्। विरोधाभावात् । न हीष्टफलस्य कर्मणः शुद्धरूपत्वान्नित्यैर्विरोध उपपद्यते । शुद्धाशुद्धयोर्हि विरोधो युक्तः ॥**

**भाष्यार्थ**—आतां अनारब्ध–संचित कर्मांच्या क्षयासाठीं नित्य कर्में आहेत, असें जरी समजलें तरीसुद्धां तीं अशुद्ध कर्मांचाच क्षय करूं शकतील; शुद्ध कर्मांचा क्षय करूं शकणार नाहींत. कारण नित्य कर्में व शुद्ध कर्में यांचा विरोध नाहीं. ज्यांचें फल इष्ट –शुभजन्मरूप आहे अशा कर्मांला शुद्धरूपत्व असल्यामुळें म्ह० इष्ट फल देणारीं कर्में शुद्ध असल्यामुळें त्यांचा नित्य कर्मांशीं विरोध संभवत नाहीं. कारण शुद्ध व अशुद्ध यांचाच विरोध असणें सयुक्तिक आहे. [ ' मुमुक्षूनें काम्य कर्मांना वर्ज्य करावें ' असें जें वर वाक्यानें म्हटलें आहे तें विवेकबल नसल्यास दुर्घट आहे. कारण मूल अज्ञान असेपर्यंत कामाचा उद्भव होणें, अगदीं अपरिहार्य आहे, असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न च कर्महेतूनां कामानां ज्ञानाभावे निवृत्त्यसंभवादशेषकर्मक्षयोपपत्तिः । अनात्मविदो हि कामोऽनात्मफलविषयत्वात्। स्वात्मनि च कामानुपपत्तिर्नित्यप्राप्तत्वात्स्वयं चात्मा परं ब्रह्मेत्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—ज्ञानाच्या अभावीं कर्माला कारण होणाऱ्या कामांची निवृत्ति होण्याचा असंभव असल्यामुळें सर्व कर्मांच्या क्षयाचा संभव नाहीं. अनात्मज्ञालाच काम होतो. कारण तो अनात्मफलविषय असतो. म्ह० त्या कामाचा विषय अनात्मरूप वस्तु असते. [–" अहोपण काम. अज्ञानमूलक नाहीं. कारण आत्मज्ञांमध्येंहि तो दिसतो " अशी आशंका घेऊन '**स्वात्मनि०**' या भाष्यानें सांगतात–]=स्वात्म्याविषयीं काम होणें अनुपपन्न आहे. कारण आत्मा नित्य प्राप्त आहे आणि स्वतः आत्मा परब्रह्म आहे, हें वर सांगितलेंच आहे. (सर्व आत्मा आहे, असें पाहणारांना तत्त्वतः विषयाचाच अभाव होत असल्यामुळें त्यांचा काम संभवत नाहीं. भोजनादिकांविषयींच्या प्रवृत्तीला अत्यंत अवश्य असलेला जो काम तो वस्तुतः कामच नव्हे. तर कामाभास आहे; कारण तो वास्तव–खरा आहे, असा अभिनिवेश नसतो, असा याचा भावार्थ. 'आत्मज्ञांना अर्चिरादि मार्गानें ब्रह्मप्राप्ति करून घेण्याची इच्छा असते ' अशीहि शंका घेऊं नये. कारण ' स्वयं आत्मा

ब्रह्म आहे' असें सांगितलें आहे.) [–आतां प्रत्यवायपरिहारार्थ नित्य कर्में आहेत, असें जें ह्मणणें आहे त्याविषयीं भाष्यकार 'नित्यानां च०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—नित्यानां चाकरणमभावस्ततः प्रत्यवायानुपपत्तिरिति। अतः पूर्वोपचितदुरितेभ्यः प्राप्यमाणायाः प्रत्यवायक्रियाया नित्याकरणं लक्षणमिति 'अकुर्वन्विहितं कर्म' इति शतुर्नानुपपत्तिः॥ अन्यथाभावाद्भावोत्पत्तिरिति सर्वप्रमाणव्याकोप इति। अतोऽयत्नतः स्वात्मन्यवस्थानमित्यनुपपन्नम्॥**

**भाष्यार्थ—**नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें, हा अभाव आहे. त्या अभावापासून प्रत्यवायरूप भावाची उत्पत्ति होणें युक्त नव्हे. (कारण आगामि दुःखालाच प्रत्यवाय म्हणतात. त्या भावरूप प्रत्यवायाचें कर्माभाव हें निमित्त होऊं शकत नाहीं. कारण 'पापः पापेन' बृ. भा. ४. ४. ५. सु. उ. पृ. ६९१. पापकर्मानें पापी होतो, अशी श्रुति असल्यामुळें दुःख निषिद्धाचरण या निमित्तानें होणारें आहे, असा याचा भावार्थ.) ["–अहोपण "अकुर्वन्विहितं कर्म निन्दितं च समाचरन्, प्रसज्जंश्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति" मनु. ११. ४४. विहित कर्म न करणारा निंदित कर्म करणारा, व विषयांमध्यें आसक्त होणारा पुरुष पतन पावतो, या वाक्यांत 'अकुर्वन्' इत्यादि 'शतृ–अत्' प्रत्यय असल्यामुळें अकरण–अननुष्ठानहि दुःखाचें निमित्त होतें, असें ज्ञान होतें," अशी शंका घेऊन '**अतः पूर्वोपचित०**' इत्यादि भाष्यानें भाष्यकार म्हणतात–]=वास्तव पूर्व संचित पापामुळें प्राप्त होणाऱ्या प्रत्यवायक्रियेचें नित्याकरण–नित्य कर्मांचें अननुष्ठान हें लक्षण आहे. त्यामुळें 'अकुर्वन् विहितं कर्म' या स्मृतिवचनांतील 'अकुर्वन्' या शतृप्रत्ययाची अनुपपत्ति होत नाहीं–तो प्रत्यय अयोग्य नाहीं. (जर यथाविधि नित्य-नैमित्तिक कर्मांचें अनुष्ठान झालें असतें तर संचित पापाचा क्षय झाला असता. पण यानें विहित कर्म केलें नाहीं त्यामुळें हा प्रत्यवायी होईल, असें शिष्टांकडून ताडलें जातें. जसें–'संशय न करणारा श्रोत्रिय' यांत संशय न करणें, हें श्रोत्रियाचें लक्षण होतें त्याप्रमाणें. अर्थात् 'शतृ–अत्' हा प्रत्यय दुसऱ्या- लक्षण -या अर्थींहि उपपन्न होत असल्यामुळें त्या प्रत्ययाच्या बलानें अकरणाला प्रत्यवायाचें निमित्त मानतां येत नाहीं, असा याचा भावार्थ.) [–"अहोपण 'लक्षणहेत्वोः क्रियायाः' पाणिनि अ. ३ पा. २ सू. १२६. असें 'क्रियेचें लक्षण व हेतु' या दोन्ही अर्थीं शतृ-प्रत्ययाचें विधान असतांना येथें हेतुत्वच कां ग्रहण करीत नाहीं" अशी आशंका घेऊन '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तसें जर न मानलें तर अभावापासून भावाची उत्पत्ति होते, असा सर्व प्रमाणांचा व्याकोप–विरोध–बाध होतो. यास्तव 'अयत्नतः–यत्नावांचून–अनायासानें स्वात्म्यामध्यें अवस्थान होतें' हें म्हणणें अनुपपन्न–अयोग्य आहे. (भावरूप कार्याचें भावरूप कारण असतें, असें प्रत्यक्षादि

प्रमाणांनीं ठरलेलें आहे. यास्तव शतृप्रत्ययाच्या बळावर अभावहि हेतु होतो, असें ह्मटल्यास सर्व प्रमाणांशीं विरोध येतो. "अहो पण तुह्मीहि अननुष्ठानाला प्रत्यवायाचें लक्षण मानतां. भाट्ट मीमांसक अनुपलंभाला अभावज्ञानाचें कारण मानतात. तार्किकहि प्रतिबंधकाभावाला व त्याच्या प्रागभावाला त्या त्या कार्याचा व्यवस्थापक मानतात. तेव्हां 'भावच कार्याचें कारण होतें अभाव कार्याचें कारण होऊं शकत नाहीं,' असें कसें ह्मणतां" असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर असें—अभाव स्वरूपतः कोणत्याहि कार्याचें कारण होत नाहीं. पण त्याचें ज्ञान प्रत्यवायाचें सूचक आहे, असें आम्ही समजतों. यास्तव नित्य कर्माचें अनुष्ठान न करणें या दोषामुळें प्राप्त होणारा जो प्रत्यवाय त्याच्या परिहारार्थ कर्म आहे, असें म्हणतां येत नाहीं. तर 'कर्माच्या योगानें पितृलोक, हे सर्व पुण्यलोकभाक् होतात;' इत्यादि श्रुतिवचनांच्या अनुसार त्यांचें पितृलोकप्राप्ति हें फळ आहे. तस्मात् नित्य कर्माचें अनुष्ठान केलें, म्हणजे शरीराचा उद्भव होत नाहीं, असें ह्मणतां येत नाहीं. असें 'अतः' इत्यादि भाष्यानें सांगितलें आहे.) [—आतां पूर्वोक्त दुसऱ्या मताचा परिहार 'यच्चोक्तं०' इत्यादि भाष्यानें करितात—]

**भाष्यं—यच्चोक्तं निरतिशयप्रीतेः स्वर्गशब्दवाच्यायाः कर्मनिमित्तत्वात्कर्माऽऽरब्ध एव मोक्ष इति । तन्न । नित्यत्वान्मोक्षस्य । न हि नित्यं किञ्चिदारभ्यते । लोके यदारब्धं तदनित्यमिति । अतो न कर्मारब्धो मोक्षः ॥**

**भाष्यार्थ**—'स्वर्ग या शब्दानें वाच्य असलेली—स्वर्गशब्दाचा अर्थ अशी जी निरतिशय प्रीति ती कर्मनिमित्त असल्यामुळें म्हणजे तिचें कारण कर्म असल्यामुळें मोक्ष कर्मारब्धच आहे. म्ह० तो कर्मापासूनच उद्भवतो,' असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण मोक्ष नित्य आहे; आणि कोणत्याहि नित्य वस्तूचा आरंभ केला जात नाहीं. व्यवहारांत जें आरब्ध—कृतक तें अनित्य अशी व्याप्ति दिसते. यास्तव मोक्ष कर्मारब्ध नाहीं. [आतां तो केवल कर्मांनीं आरब्ध जरी नसला तरी—]

**भाष्यं—विद्यासहितानां कर्मणां नित्यारम्भसामर्थ्यमिति चेत् । न । विरोधात् । नित्यं चाऽऽरभ्यत इति विरुद्धम् । यद्धिनष्टं तदेव नोत्पद्यत इति । प्रध्वंसाभाववन्नित्योऽपि मोक्ष आरभ्य एवेति चेन्न । मोक्षस्य भावरूपत्वात् । प्रध्वंसाभावोऽप्यारभ्यत इत्यभावस्य विशेषाभावाद्विकल्पमात्रमेतत् । भावप्रतियोगी ह्यभावः ॥**

**भाष्यार्थ**—विद्यायुक्त कर्मांना नित्य मोक्षाचा आरंभ करण्याचें सामर्थ्य आहे, असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तसें म्हणणें विरुद्ध आहे. नित्य वस्तु व तिचा

आरम्भ केला जातो हें म्हणणें विरुद्ध आहे. [ विद्यायुक्त असलेल्याहि कर्मानें मोक्ष जर आरभ्य—उत्पाद्य असेल तर तो अनित्यच होईल. कारण जें कृतक—कर्मसाध्य असतें तें अनित्य असतें अशी व्याप्ति दिसते, असें सांगितलें. आतां त्या व्याप्तीचा भंग होतो, तिचा बाध होतो असें समजणारा वादी ' **यद्विनष्टं०** ' इत्यादि भाष्यानें शंका घेतो—] =" अहोपण, जें विशेषें करून नष्ट झालेलें असतें तेंच उत्पन्न होत नाहीं, असा नियम आहे, त्यामुळें प्रध्वंसाभावाप्रमाणें मोक्ष नित्य जरी असला तरी आरभ्यच आहे." असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण मोक्ष भावरूप आहे. [ जें भावरूप कार्य असतें तें अनित्य असतें अशी व्याप्ति आहे. तुझा निरतिशय प्रीतिरूप मोक्ष भाव आहे. त्यामुळें त्याला अनित्यत्व प्राप्त होतें, असा भावार्थ. तार्किक ' सादिरनन्तः प्रध्वंसः ' असें म्हणतात.—तर्कसंग्रहसार पृष्ठ ७८—म्ह० प्रध्वंस उत्पन्न होणारा व अनन्त आहे, असें म्हणतात. तें त्यांचें म्हणणें मान्य करून हा दोष दिला आहे. प्रध्वंस जरी अनन्त व कार्य असला तरी तो भावरूप नाहीं. पण वस्तुतः जर पाहिलें तर प्रध्वंसाला कार्यरूपत्वच नाहीं, असें ' प्रध्वंसाभावः अपि ' या भाष्यानें सांगतात—]=प्रध्वंसाभावहि उत्पन्न होतो, हें म्हणणें अभावामध्यें कोणत्याहि प्रकारचा विशेष नसल्यामुळें नुस्ती कल्पना आहे. कारण अभावाचा प्रतियोगी नेहमीं भाव असतो. [ प्रध्वंस नेहमीं उत्पन्न झालेल्या पदार्थांच्या आश्रयानें रहातो. त्यामुळें त्याला कार्यत्व नसतें. कारण जन्म म्हणजे प्रादुर्भाव. तो भावरूप वस्तूच्या ठिकाणींच राहतो, असा अनुभव आहे. यास्तव शून्यरूप अभावाचा जन्म झाला, असें तत्त्वतः म्हणतां येत नाहीं. शिवाय भाव व अभाव यांचा अत्यंत विरोध असल्यामुळें अभावाचा भावरूप धर्म संभवत नाहीं. " अहोपण, अभाव चार प्रकारचा आहे. तर्कसंग्रहसार पृ. ७ पहा. त्यांतील प्रागभाव अनित्य आहे व प्रध्वंस, अत्यन्त व अन्योन्याभाव नित्य आहेत, असा विशेष असतांना अभावाला विशेषरहित कसें म्हणतां येईल ? " अशी आशंका घेऊन ' **यथा हि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—यथा ह्यभिन्नोऽपि भावो घटपटादिभिर्विशेष्यते । अभिन्न एव घटभावः पटभाव इति एवं निर्विशेषो भावाभावः क्रियागुणयोगाद्द्रव्यादिवद्विकल्प्यते । न ह्यभाव उत्पलादिवद्विशेषणसहभावी । विशेषणवत्त्वे भाव एव स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें भाव अभिन्न असला तरी घट, पट इत्यादि विशेषणांच्या योगानें त्याच्यामध्यें विशेष आणतां येतो; म्हणजे घटभाव, पटभाव अशा रीतीनें तो एकरूपच भाव अनेकरूप असल्यासारखा बोलला जातो, त्याप्रमाणें सर्व विशेषरहित असलेला भावाचा अभाव क्रिया व गुण यांच्या संबंधानें द्रव्यादिकांप्रमाणें विकल्पिला जातो.

( पण त्यामुळें तो तत्त्वतः सविशेष होत नाहीं. शिवाय ) अभाव कमलादि पदार्थों-प्रमाणें विशेषणसहभावी ( विशेषणयुक्त ) नसतो. कारण तो जर विशेषणवान् आहे असें म्हटलें तर तोहि भावच ठरेल. ( कारण विशेषण नेहमीं विशेष्याशीं संबंध ठेवतें, हें प्रसिद्ध आहे. पण प्रतियोगी विशेषणाशीं अभावाचा संबंध संभवत नाहीं. शिवाय घटाचा प्रध्वंसाभाव जर नित्य आहे, असें समजलें तर त्याचा प्रतियोगी घटहि नित्य आहे, असें होईल. कारण घट जर अनित्य आहे, म्हणून म्हटलें तर त्याचा अभाव तरी नित्य कसा असणार ? घटावांचून घटाचा अभाव उपलक्षित होऊं शकत नाहीं. बरें तो अभाव घटसहभावी आहे असें समजलें तर त्याच्या अभावत्वाचा बाध होतो. तस्मात् अभावाला प्रतियोगीमुळें सविशेष मानणें, युक्त नव्हे.) [—याप्रमाणें प्रध्वंसाप्रमाणें मोक्ष नित्य आहे, असें जें वाद्याचें म्हणणें होतें त्याचें निरसन करून आतां 'मोक्ष कर्मजन्य आहे' या शंकेचें निरसन '**विद्याकर्म०**' इत्यादि भाष्यानें निराळ्या प्रकारानें करितात—]

**भाष्यं—विद्याकर्मकर्तृनित्यत्वाद्विद्याकर्मसन्तानजनितमोक्षनित्यत्वमिति चेन्न। गङ्गास्रोतोवत्कर्तृत्वस्य दुःखरूपत्वात्। कर्तृत्वोपरमे च मोक्षविच्छेदात्। तस्माद-विद्याकामकर्मोपादानहेतुनिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानं मोक्ष इति। स्वयं चात्मा ब्रह्म। तद्विज्ञानादविद्यानिवृत्तिर्मोक्ष इति ब्रह्मविद्यार्थोपनिषदारभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—विद्या व कर्म यांचा कर्ता नित्य असल्यामुळें विद्या व कर्म यांच्या संता-नापासून—अविच्छिन्न प्रवाहापासून झालेला मोक्षहि नित्य आहे, असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण गंगेच्या प्रवाहाप्रमाणें कर्तृत्व दुःखरूप आहे. ( त्यामुळें तें असे-पर्यंत मोक्ष संभवत नाहीं. ) आणि त्या कर्तृत्वाचा उपरम होतो म्हणून जर म्हटलें तर तो होतांच मोक्षाचाहि विच्छेद होण्याचा प्रसंग येतो. यास्तव ( म्ह० मोक्ष ब्रह्मज्ञानावां-चून प्राप्त होणें शक्य नसल्यामुळें ) अविद्या-काम-कर्म यांच्या उपादान हेतूची निवृत्ति झाली असतां स्वात्मरूपांत अवस्थित होणें हा मोक्ष सिद्ध होतो आणि स्वतः आत्माच ब्रह्म आहे, यास्तव त्याच्या विज्ञानामुळें अविद्येची निवृत्ति होणें, हा मोक्ष आहे. म्हणून ब्रह्मविज्ञानाकरितां उपनिषदाचा आरंभ केला जातो. [ ब्रह्मविद्या या अर्थी 'उपनिषद्' या शब्दाचा प्रयोग होत असल्यामुळेंहि विद्याच मोक्षाचें कारण आहे, असें सिद्ध होतें, असें '**उपनिषद्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—उपनिषदिति विद्योच्यते। तच्छीलिनां गर्भजन्मजरादिनिशातना-त्तदवसादनाद्वा ब्रह्मणो वोपनिगमयितृत्वादुपनिषण्णं वाऽस्यां परं श्रेय इति। तदर्थत्वाद्ग्रन्थोऽप्युपनिषत् ॥**

**भाष्यार्थ**—उपनिषद् या शब्दानें 'विद्या' सांगितली जाते. अर्थात् उपनिषद् म्ह० विद्या. ती आपलें परिशीलन करणाऱ्या पुरुषांच्या–गर्भ, जन्म, जरा इत्यादिकांस शिथिल करीत असल्यामुळें किंवा त्यांचा नाश करीत असल्यामुळें अथवा ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवीत असल्यामुळें तिला उपनिषद् असें म्हणतात. किंवा या निमित्तभूत विद्येमध्यें परम श्रेय जें ब्रह्म तें जीवाच्या स्वात्मरूपानें उपस्थित होतें, म्हणून उपनिषद्. ग्रंथ त्या विद्ये-करितां असल्यामुळें त्यालाहि उपनिषद् असें म्हणतात. [ याप्रमाणें उपनिषदाचें व्याख्यान संभवतें, असें सिद्ध करून आतां भाष्यकार त्याच्या पदांचें व्याख्यान आरंभितात—]

**श्रुतिः—ॐ शं नो मित्रः शं वरुणः। शं नो भवत्वर्यमा॥**
**शं न इन्द्रो बृहस्पतिः। शं नो विष्णुरुरुक्रमः॥**

**अर्थ**—प्राणवृत्ति व दिवस यांची अभिमानिनी देवता आम्हांला सुखरूप–सुखावह होवो. अपानवृत्तीची व रात्रीची देवता–वरुण आम्हांला सुखकर होवो. चक्षु व सूर्य यांची अभिमानिनी देवता–अर्यमा आम्हांला सुखावह होवो. बलाची अभिमानिनी देवता इंद्र आणि वाक् व बुद्धि यांवर अभिमान ठेवणारी देवता बृहस्पति आम्हांला अनुकूल होवोत. ज्याचा क्रम–पाऊल विस्तीर्ण आहे असा पादाभिमानी विष्णु आम्हांला सुखकर होवो.

**भाष्यं—शं सुखं प्राणवृत्तेरह्नश्चाभिमानी देवतात्मा मित्रो नोऽस्माकं भवतु। तथैवापानवृत्ते रात्रेश्चाभिमानी देवतात्मा वरुणः। चक्षुष्यादित्ये चाभिमान्यर्यमा। बल इन्द्रः। वाचि बुद्धौ च बृहस्पतिः। विष्णुरुरुक्रमो विस्तीर्णक्रमः पादयोर-भिमानी। एवमाद्याध्यात्मदेवताः। शं नो भवत्विति सर्वत्रानुषङ्गः। तासु हि सुखकृत्सु विद्याश्रवणधारणोपयोगा अप्रतिबन्धेन भविष्यन्तीति तत्सुखकर्तृत्वं प्रार्थ्यते शं नो भवत्विति॥**

**भाष्यार्थ**—प्राणवृत्तीचा व दिवसाचा अभिमानी देवतात्मा 'मित्रः'–मित्र 'नः'–आम्हांला 'शं'–सुखावह होवो. त्याचप्रमाणें अपानवृत्तीचा व रात्रीचा अभिमानी देवतात्मा 'वरुणः'–वरुण, चक्षु व आदित्य यांतील अभिमानी 'अर्यमा;' बलांतील 'इंद्र;' वाक् व बुद्धि यांतील 'बृहस्पति;' 'उरुक्रमः'–ज्याचा क्रम–पाऊल विस्तीर्ण आहे, असा 'विष्णु' दोन्ही पायांचा अभिमानी आहे. या व दुसऱ्या सर्व अध्यात्म देवता आम्हांला सुखावह होवोत, असा सर्व वाक्यांत अन्वय लावावा. कारण त्या प्राण व इंद्रियें यांच्या अभिमानिनी देवता सुखकर झाल्या असतां विद्येचें श्रवण–गुरुमुखानें वेदान्ततात्पर्याचा निश्चय धारण–तिचें अविस्मरण व उपयोग–शिष्यांस निवेदन हीं कार्यें कोणत्याहि प्रकारच्या प्रतिबंधावांचून होऊं शकतात. यास्तव त्यांचें सुखकर्तृत्व वरील 'शं नो मित्रः०' इत्यादि मंत्रानें प्रार्थिलें जातें म्ह० त्या सर्व देवतांनीं आपल्याला सुखकर व्हावें, अशी विद्यार्थी प्रार्थना करितो.

**श्रुतिः—नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ १ ॥**

**अर्थ**—वायुरूप ब्रह्माला नमस्कार असो. हे वायो, तुला नमस्कार असो. तूंच बाह्य चक्षुरादिकांच्या अपेक्षेनें समीपवर्ती व अव्यवहित–साक्षात् ब्रह्म आहेस. त्यामुळें मी तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हणेन. मी तुलाच ऋत म्हणेन. वाक् व शरीर यांच्या योगानें संपादन केला जाणारा जो अर्थ तोहि तुझ्या अधीन राहूनच संपादन केला जातो. यास्तव मी तुलाच सत्य म्हणेन. तें सर्वात्मक वायुसंज्ञक ब्रह्म मज विद्यार्थ्याचें विद्यासंयोगानें रक्षण करो. तेंच ब्रह्म वक्ता जो आचार्य त्याला वक्तृत्वसामर्थ्य देऊन त्याचें रक्षण करो. 'माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो' ही पुनरुक्ति आदरार्थ आहे. विद्याप्राप्तीच्या आध्यात्मिक उपसर्गांची शांति होवो. आधिभौतिक उपसर्गांची शांति होवो, आधिदैविक उपसर्गांची शांति होवो. १.

**भाष्यं—ब्रह्मविविदिषुणा नमस्कारवन्दनाक्रिये वायुविषये ब्रह्मविद्योपसर्गशान्त्यर्थं क्रियेते । सर्वक्रियाफलानां तदधीनत्वात् । ब्रह्म वायुस्तस्मै ब्रह्मणे नमः । प्रह्वीभावं करोमीति वाक्यशेषः । नमस्ते तुभ्यं हे वायो नमस्करोमीति ॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्मजिज्ञासूकडून वायुविषयक नमस्कार-वंदनक्रिया ब्रह्मविद्येला होणाऱ्या उपसर्गांची शांति व्हावी म्हणून केल्या जातात. कारण सर्व क्रियांचीं फळें त्याच्या अधीन आहेत.–'ब्रह्मणे नमः'–ब्रह्म म्ह० वायु; त्या वायुरूप ब्रह्माला मी नमस्कार करतों. नमस्कार म्ह० प्रह्वीभाव–नम्रपणा, तो करतों; असा क्रियापदाचा अध्याहार करावा. हे 'वायो,' 'ते नमः'–तुला नमस्कार असो, मी तुला नमस्कार करतों. [ ब्रह्म निराळें व वायु निराळा अशी शंका घेऊं नये, असें '**परोक्ष०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—परोक्षप्रत्यक्षाभ्यां वायुरेवाभिधीयते । किं च त्वमेव चक्षुराद्यपेक्ष्य बाह्यं संनिकृष्टमव्यवहितं प्रत्यक्षं ब्रह्मासि यस्मात्तस्मात्त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥**

**भाष्यार्थ**—येथील ब्रह्म या परोक्ष व वायु या प्रत्यक्ष शब्दानें वायुच सांगितला जातो. [ 'स ब्रह्मेत्याचक्षते'–त्याला ब्रह्म असें म्हणतात, अशी श्रुति असल्यामुळें 'ब्रह्म' असा परोक्ष व 'वायु' असा प्रत्यक्ष निर्देश केला आहे. कारण प्राणाला प्रत्यक्षत्व आहे. आतां वायु सूत्ररूपानें जरी परोक्ष आहे तरी आध्यात्मिक प्राणरूपानें त्याला अपरोक्षत्व आहे. असें '**किंच०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=शिवाय ज्या अर्थी बाह्य चक्षुरादिकांच्या अपेक्षेनें तूंच समीप व साक्षात् प्रत्यक्ष ब्रह्म आहेस त्याअर्थी मी तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हणेन.

(चक्षुरादि इंद्रियांचें रूपदर्शनादि कार्यावरून अनुमान होतें, त्यामुळें तीं प्राणाहून बाह्य व व्यवहित आहेत. पण प्राण साक्षात् साक्षिवेद्य असल्यामुळें भोक्त्या जीवाला संनिहित आहे. तसाच तो चक्षुरादिकांच्या अपेक्षेनें प्रत्यक्ष आहे. श्वास घेणें, इत्यादि प्राणकृत क्रियेमुळें शरीरादिकांचें पोषण होतें, हें प्रसिद्ध आहे. प्राणाला त्या बृंहणामुळें–वृद्धीमुळें ब्रह्म म्हटलें आहे. राजाला भेटण्याची इच्छा करणारा एखादा आर्त मनुष्य द्वारपालालाहि तूंच राजा आहेस, असें ज्याप्रमाणें म्हणतो, त्याप्रमाणें हृदयस्थ ब्रह्माला पाहण्याची इच्छा करणारा मुमुक्षु हृदयस्थ ब्रह्माच्या द्वारपालभूत प्राणाला उद्देशून 'तुलाच मी प्रत्यक्ष ब्रह्म म्हणेन' असें देवतास्तुत्यर्थ म्हणतो.) [–तशीच 'ऋतं०' इत्यादि भाष्यानें आणखींही स्तुति करतो—]

**भाष्यं—ऋतं यथाशास्त्रं यथाकर्तव्यं बुद्धौ सुपरिनिश्चितमर्थं तदपि त्वदधीनत्वात्त्वामेव वदिष्यामि। सत्यमिति वाक्कायाभ्यां संपाद्यमानः सोऽपि त्वदधीन एव संपाद्य इति त्वामेव सत्यं वदिष्यामि। तत्सर्वात्मकं वाय्वाख्यं ब्रह्म मयैवं स्तुतं सन्मां विद्यार्थिनमवतु विद्यासंयोजनेन। तदेव ब्रह्म वक्तारमाचार्यं वक्तृत्वसामर्थ्यसंयोजनेनावतु॥**

**भाष्यार्थ**—'ऋतं वदिष्यामि'–मी तुलाच ऋत म्हणेन. ऋत म्ह० बुद्धींत यथाशास्त्र व यथाकर्तव्य अतिशय निश्चित केलेला अर्थ. पण तें ऋताहि तुझ्याच अधीन असल्यामुळें मी तुलाच तें ऋत म्हणेन. 'सत्यं वदिष्यामि'–वाक् व शरीर यांच्या योगानें संपादन केला जाणारा जो अर्थ त्याला सत्य असें म्हणतात. तोहि तुझ्या अधीन राहूनच संपादन करतां येतो. यास्तव मी तुलाच सत्य म्हणेन. 'तत्-मां अवतु'--तें सर्वात्मक वायुसंज्ञक ब्रह्म माझ्याकडून अशा प्रकारें स्तुति केलें गेलेलें होत्सातें मज विद्यार्थ्याचें विद्यासंयोजनानें म्ह० मला विद्या देऊन रक्षण करो. 'तत् वक्तारं अवतु'--तेंच ब्रह्म वक्ता जो आचार्य त्याला वक्तृत्वसामर्थ्य देऊन त्याचें रक्षण करो.

**भाष्यं—अवतु मामवतु वक्तारमिति पुनर्वचनमादरार्थम्। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिरिति त्रिर्वचनमाध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकानां विद्याप्राप्त्युपसर्गाणां प्रशमार्थम्। (इति श्रीशांकरभाष्ये प्रथमोऽनुवाकः॥ १॥)**

**भाष्यार्थ**—'अवतु मां०'–माझें रक्षण करो; वक्त्याचें रक्षण करो; असें पुनरपि जें म्हटलें आहे तें आदरार्थ आहे. 'ॐ शांतिः, शांतिः, शांतिः' असें तीन वेळ जें म्हटलें आहे तें विद्याप्राप्तीच्या आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक उपसर्गांच्या प्रशमनाकरितां म्हटलें आहे. (इति शीक्षाध्याये प्रथमोऽनुवाकः) १

**श्रुतिः—ॐ शीक्षां व्याख्यास्यामः । वर्णः स्वरः मात्रा बलं साम संतानः । इत्युक्तः शीक्षाध्यायः ।। (२)**

**अर्थ**—जिच्या योगानें वर्णादिकांचें उच्चारणरूप शास्त्र शिकविलें जातें ती शिक्षा किंवा जिच्या योगानें वर्णादिक शिकविले जातात ती शिक्षा. तिचाच मुळांत 'शीक्षा' असा जो दीर्घ प्रयोग केला आहे तो छांदस आहे. अशा प्रकारच्या शिक्षेचें आम्ही आतां व्याख्यान करितों. अकारादि वर्ण, उदात्त-अनुदात्त-स्वरित हा स्वर, ऱ्हस्वादि मात्रा, उच्चारणासाठीं विशेष प्रकारचा प्रयत्न हेंच बल, वर्णांचें मध्यम वृत्तीनें उच्चारण करणें हें साम व संतति म्ह० संहिता हेंच संतान. हा येथील शिकण्यास योग्य असा अर्थ आहे. अशा प्रकारची शिक्षा ज्या अध्यायांत आहे तो हा शीक्षाध्याय, याप्रमाणें सांगितला आहे. २.

**भाष्यं—अर्थज्ञानप्रधानत्वादुपनिषदो ग्रन्थपाठे यत्नोपरमो मा भूदिति शीक्षाध्याय आरभ्यते— शिक्षा शिक्ष्यतेऽनयेति वर्णाद्युच्चारणलक्षणम् । शिक्ष्यन्त इति वा शिक्षा वर्णादयः । शिक्षैव शीक्षा । दैर्घ्यं छान्दसम् । तां शीक्षां व्याख्यास्यामो विस्पष्टमा समन्तात्कथयिष्यामः ।।**

**भाष्यार्थ**—उपनिषद् अर्थज्ञानप्रधान आहे, म्ह० त्याचें अर्थज्ञान ही मुख्य गोष्ट आहे. पण त्यासाठीं ग्रंथाच्या पाठाविषयींचा यत्न शिथल होऊं नये—स्वर-ऊष्मवर्ण-व्यंजन यांचा प्रमाद होऊं नये म्हणून शीक्षाध्यायाचा आरंभ केला जातो. जिच्या योगानें वर्णादिकांचें उच्चारणशास्त्र शिकविलें जातें ती शिक्षा, किंवा जिच्या योगानें वर्णादिक शिकविले जातात ती शिक्षा. शिक्षा या शब्दाचाच येथें 'शीक्षा' असा दीर्घ उच्चार केला आहे. हें दीर्घत्व छान्दस आहे. त्या शिक्षेचें 'व्याख्यास्यामः'—आम्ही व्याख्यान करूं, म्ह० अगदीं स्पष्टपणें सर्व बाजूंनीं कथन करूं. [हें रूप 'ख्या-प्रकथने' या धातूपासून 'वि' व 'आ' हे उपसर्ग लागून झालेलें आहे, असें समजून वरील व्याख्यान केलें. आतां 'चक्ष्' धातूला 'ख्या' असा आदेश होऊन तें झालेलें आहे, असें '**चक्षिङो वा०**' या भाष्यानें सांगतात. कारण उपसर्गासह वरील 'ख्या-'धातूचा प्रयोग उक्त नाहीं—]

**भाष्यं—चक्षिङो वा ख्याञादिष्टस्य व्याङ्पूर्वस्य व्यक्तवाक्कर्मण एतद्रूपम् । तत्र वर्णोऽकारादिः । स्वर उदात्तादिः । मात्रा ह्रस्वाद्याः । बलं प्रयत्नविशेषः । साम वर्णानां मध्यमवृत्त्योच्चारणं समता संतानः संततिः संहितेत्यर्थः । एष हि शिक्षितव्योऽर्थः । शिक्षा यस्मिन्नध्याये सोऽयं शीक्षाध्याय इत्येवमुक्त उदितः । उक्त इत्युपसंहार उत्तरार्थः।। (इति शांकरभाष्ये द्वितीयोऽनुवाकः ।। २)**

**भाष्यार्थ**—किंवा व्यक्त वाणी करणें या अर्थी असलेल्या चक्षिङ्-धातूला आर्धधातुक प्रकारांत ' ख्यात् ' असा जो आदेश होतो म्हणून सांगितलें आहे त्या ' वि ' व ' आ ' या उपसर्गयुक्त धातूचें हें रूप आहे. त्यांतील अकरादि ' वर्ण ' उदात्तादि ' स्वर ऱ्हस्वादिक ' मात्रा ' विशेष प्रकारचा प्रयत्न हें ' बल ' वर्णांचें मध्यमवृत्तीनें उच्चार करणें हें ' साम म्ह० समता--' संतति हेंच ' संतान ' अर्थात् संहिता; हाच अवश्य शिकण्यासारखा अर्थ आहे. ' इति उक्तः शीक्षाध्यायः '—अशा प्रकारची शिक्षा ज्या अध्यायांत आहे तो हा शीक्षाध्याय, अशा प्रकारें सांगितला आहे. येथें ' उक्तः ' असें म्हणून जो उपसंहार केला आहे तो पुढच्या ग्रंथासाठीं आहे. इति द्वितीयोऽनुवाकः २.

**श्रुतिः—सह नौ यशः । सह नौ ब्रह्मवर्चसम् ॥**

**अर्थ**—आम्हां शिष्याचार्यांना यश एकाच वेळीं प्राप्त होवो. त्या निमित्तानें प्राप्त होणारें ब्रह्मवर्चस तेजहि आम्हांला सह—एकदाच प्राप्त होवो.

**भाष्यं—अधुना संहितोपनिषदुच्यते । तत्र संहिताद्युपनिषत्परिज्ञाननिमित्तं यद्यशः प्रार्थ्यते तन्नावावयोः शिष्याचार्ययोः सहैवास्तु । तन्निमित्तं च यद्ब्रह्मवर्चसं तेजस्तच्च सहैवास्त्विति शिष्यवचनमाशीः । शिष्यस्य ह्यकृतार्थत्वात्प्रार्थनोपपद्यते नाऽऽचार्यस्य । कृतार्थत्वात् । कृतार्थो ह्याचार्यो नाम भवति ॥**

**भाष्यार्थ**—आतां संहितेसंबंधीं वर्णांची उपासना प्रथम सांगितली जाते. [ संहिता म्हणजे वर्णांचा अतिशय संनिधि. उपासनेकरितां आपापल्या शाखेची संहिता घ्यावी. ' शं नो मित्रः० ' इत्यादि जो शांतिरूप अशीर्वाद आहे तो सर्व उपनिषदांचा शेष—भाग आहे. यास्तव आतां येथें अगोदर या संहितोपनिषदाशींच संबंध ठेवणारा, त्याचा एकशेष—भाग, अशा प्रकारचा दुसरा स्वतंत्र आशीर्वाद सांगतात—]=तिच्या आरंभीं संहितादि उपनिषदाच्या म्ह० उपासनेच्या परिज्ञानामुळें प्राप्त होणाऱ्या ज्या यशाची प्रार्थना केली जाते—' यशः नौ सह '—तें यश आम्हां दोघांना म्ह० शिष्य व आचार्य या दोघांना एकाच वेळीं प्राप्त होवो. तसेंच ' ब्रह्मवर्चसं '—त्या उपासनेच्या निमित्तानें प्राप्त होणारें जें ' ब्रह्मवर्चस ' या नांवाचें तेज तेंहि ' नौ सह '—आम्हां उभयतांना एकाच वेळीं प्राप्त होवो. हा आशीर्वाद, हें शिष्याचें वचन आहे. कारण शिष्य कृतार्थ झालेला नसल्यामुळें त्याचीच अशी प्रार्थना उपपन्न होते. आचार्य कृतार्थ असल्यामुळें त्याची अशी प्रार्थना उपपन्न होत नाहीं. कारण जो कृतार्थ असतो तोच आचार्य होऊं शकतो.

**श्रुतिः—अथातः सꣳहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः । पञ्चस्वधिकरणेषु ।**

**अर्थ**—अध्ययनाच्या विधानानंतर ज्याअर्थी ग्रंथपाठाविषयींच्या भावनेनें अतिशय भावित झालेली बुद्धि—ग्रंथपाठाविषयींच्या वासनेनें वासित झालेली बुद्धि एकाएकीं

अर्थज्ञानांत प्रवृत्त होत नाहीं. त्याअर्थी संहितेचें उपनिषद्–संहिताविषयकदर्शन अगदीं स्पष्टपणें सांगतों. कोठें? पांच अधिकरणांमध्यें–आश्रयांमध्यें--ज्ञानविषयांमध्यें असा भावार्थ. ( ज्ञानाचे विषय होणारे जे पांच आश्रय त्यांत संहिताविषयक दृष्टि कशी ठेवावी तें सांगतों. )

**भाष्यं—अथानन्तरमध्ययनलक्षणविधानस्य, यतोऽत्यर्थं ग्रन्थभाविता बुद्धिर्न शक्यते सहसाऽर्थज्ञानविषयेऽवतारयितुमित्यतः संहिताया उपनिषदं संहिताविषयं दर्शनमित्येतद्ग्रन्थसंनिकृष्टामेव व्याख्यास्यामः। पञ्चस्वधिकरणेष्वाश्रयेषु ज्ञानविषयेष्वित्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—'अथ'–अध्ययनरूप विधानानंतर; [ 'अतः' या शब्दानें वस्तूची उपासना सोडून प्रथम शब्दाच्या उपासनेचें विधान करण्याचें कारण सांगतात–] 'अतः'–ज्या अर्थी ग्रंथाच्या पाठाविषयींच्या भावनेनें अतिशय भावित झालेली बुद्धि अर्थज्ञानविषयामध्यें सहसा प्रवृत्त करितां येत नाहीं त्याअर्थी 'संहितायाः उपनिषदं'–संहिताविषयक दर्शन–या ग्रंथाशीं अगदीं संनिकृष्ट असलेलीच उपासना 'व्याख्यास्यामः'–अगदीं स्पष्टपणें सांगतों. 'पंचसु अधिकरणेषु'–ती पांच अधिकरणांमध्यें म्ह० पांच आश्रयांनीं –ज्ञानविषयांनीं असा भावार्थ; सांगतों. (ज्ञानाचे विषय होणारे जे पांच आश्रय त्यांनीं संहिताविषयक दृष्टि कशी करावी तें सांगतों. )

**श्रुतिः—अधिलोकमधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम्। ता महासꣳहिता इत्याचक्षते॥**

**अर्थ**—लोकांविषयींचें जें दर्शन तें अधिलोकदर्शन. तसेंच ज्योतिःसंबंधीं दर्शन, विद्येसंबंधीं दर्शन, प्रजेसंबंधीं दर्शन व शरीरसंबंधीं दर्शन. या पांच उपासनांचे विषय लोकादि महावस्तु व संहिता हा असल्यामुळें त्यांना वेदवेत्ते महासंहिता असें म्हणतात.

**भाष्यं—कानि तानीत्याह–अधिलोकं लोकेष्वधि यद्दर्शनं तदधिलोकम्। तथाऽधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्ममिति। ता एताः पञ्चविषया उपनिषदो लोकादिमहावस्तुविषयत्वात्संहिताविषयत्वाच्च महत्यश्च ताः संहिताश्च महासंहिता इत्याचक्षते कथयन्ति वेदविदः॥**

**भाष्यार्थ**—तीं पांच अधिकरणें कोणतीं तेंच सांगतात–'अधिलोकं'–लोकांविषयींचें जें दर्शन तें अधिलोकदर्शन. लोकांचें ग्रहण करून ध्यानाचा विषय होणें, हें अधिलोक होय. अधिज्यौतिष, अधिविद्य, अधिप्रज व अध्यात्म यांचाहि असाच अर्थ समजावा. ज्या या पांच विषयांविषयींच्या उपासना,'ता महा०'–त्यांना लोकादि महावस्तुविषयत्व व

संहिताविषयत्व असल्यामुळें म्ह० त्यांचा विषय लोक, ज्योति, विद्या, प्रजा व आत्मा असा मोठा असल्यामुळें व संहिता हाहि त्यांचा विषय असल्यामुळें वेदवेत्ते त्यांना 'महा-संहिता' म्हणतात. मोठ्या अशा संहिता, असा 'महासंहिता' या सामासिक पदाचा विग्रह करावा. (त्यांतील विद्याशब्दानें विद्येनें प्रतिबद्ध झालेले आचार्यादि घ्यावे. तसेच प्रजाशब्दानें प्रजाप्रतिबद्ध पित्रादिक विवक्षित आहेत. आत्मा म्ह० भोक्ता. त्याला उद्देशून असलेलें जें जिह्वादि, तें सर्व येथें अध्यात्मशब्दानें विवक्षित आहे. या सर्व उपासनांमध्यें त्या त्या विषयाच्या अभिमानी देवता घ्याव्या. कारण देवतांवाचून दुसऱ्या कोणाला उपास्यत्व संभवत नाहीं. 'त्या ह्या महासंहिता आहेत,' हा विधीचा शेष–अर्थवाद आहे. 'संहितोपासना कराव्या,' हा उत्पत्तिविधि आहे. 'त्या कशा कराव्या' अशी आकांक्षा झाली असतां विनियोगविधि सांगतात. पण कर्ता एक असून अनुष्ठेय उपासना अनेक असल्यामुळें त्या क्रमानेंच होणार हें उघड आहे. यास्तव त्या क्रमाविषयीं विशेष नियम करण्यासाठीं 'अथ-'शब्दाचा उपयोग करून त्या विधीस आरंभ करितात–

**श्रुतिः—अथाधिलोकम् । पृथिवी पूर्वरूपम् । द्यौरुत्तररूपम् । आकाशः संधिः (१) । वायुः संधानम् । इत्यधिलोकम् ॥**

**अर्थ**—आतां अगोदर लोकांतील दर्शन सांगितलें जातें. संधातील पूर्ववर्णाचे ठिकाणीं पृथिवीदृष्टि करावी. त्याच्या उत्तरवर्णाचे ठिकाणीं द्युलोकाची दृष्टि करावी. पूर्वोत्तरवर्णाच्या मध्य संधीचे ठिकाणीं अन्तरिक्षलोकाची दृष्टि करावी. ज्याच्या योगानें संधि होतो तें संधान. त्या संधानामध्यें वायुदृष्टि करावी. अशा रीतीनें हें अधिलोकदर्शन सांगितलें.

**श्रुतिः—अथाधिज्यौतिषं । अग्निः पूर्वरूपम् । आदित्य उत्तररूपम् । आपः संधिः । वैद्युतः संधानम् । इत्यधिज्यौतिषम् ॥**

**अर्थ**—त्यानंतर आतां ज्योतींतील दर्शन सांगितलें जातें. संहितेच्या पूर्ववर्णाचे ठिकाणीं अग्निदृष्टि करावी. संहितेच्या उत्तरवर्णाचे ठिकाणीं आदित्यदृष्टि करावी. संधीमध्यें आप्-दृष्टि करावी. संधानामध्यें विद्युद्-दृष्टि करावी. हें ज्योतिर्विषयक संहितादर्शन आहे.

**श्रुतिः—अथाधिविद्यम् । आचार्यः पूर्वरूपम् (२) । अन्तेवास्युत्तररूपम् । विद्या संधिः । प्रवचनꣳसंधानम् । इत्यधिविद्यम् ॥**

**अर्थ**—ज्योतिःसंबंधी उपासनावयवांचें व्याख्यान केल्यानंतर विद्येसंबंधी ध्यान सांगतात–संहितेच्या पूर्ववर्णाचे ठिकाणीं आचार्यदृष्टि; उत्तरवर्णाचे ठिकाणीं शिष्यदृष्टि; मध्यप्रदेशीं विद्यादृष्टि व संहितारूप संधानाचे ठिकाणीं प्रवचनाची दृष्टि ठेवावी. हें विद्याविषयक संहिताध्यान आहे.

**श्रुतिः—अथाधिप्रजम् । माता पूर्वरूपम् । पितोत्तररूपम् । प्रजा संधिः । प्रजननꣳसंधानम् । इत्यधिप्रजम् ( ३ ) ॥**

**अर्थ**—आतां प्रजासंबंधी ध्यानाचें व्याख्यान करितात—पूर्ववर्णाचे ठिकाणीं मातृदृष्टि, उत्तरवर्णाचे ठिकाणीं पितृदृष्टि, मध्यप्रदेशीं पुत्रदृष्टि व संहितास्वरूपांत प्रजननदृष्टि ठेवावी; असें हें प्रजासंबंधीं संहितादर्शन आहे.

**श्रुतिः—अथाध्यात्मम् । अधरा हनुः पूर्वरूपम् । उत्तरा हनुरुत्तररूपम् । वाक्संधिः । जिह्वा संधानम् । इत्यध्यात्मम् ॥**

**अर्थ**—आतां आत्मसंबंधी—शरीरेंद्रियसंघातसंबंधी उपासनेचे अवयव सांगतात—पूर्ववर्णाचे ठिकाणीं खालच्या हनुवटीची दृष्टि ठेवावी. उत्तरवर्णाच्या ठिकाणीं वरच्या हनुवटीची, संधीमध्यें वाग्दृष्टि व संधानामध्यें जिह्वादृष्टि करावी. असें हें अध्यात्मदर्शन आहे.

**भाष्यं—अथ तासां यथोपन्यस्तानामधिलोकं दर्शनमुच्यते । दर्शनक्रमविवक्षार्थोऽथशब्दः सर्वत्र । पृथिवी पूर्वरूपं पूर्वो वर्णः पूर्वरूपम् । संहितायाः पूर्वे वर्णे पृथिवीदृष्टिः कर्तव्येत्युक्तं भवति । तथा चोत्तररूपमाकाशोऽन्तरिक्षलोकः । संधिर्मध्यं पूर्वोत्तररूपयोः संधीयेते अस्मिन्पूर्वोत्तररूपे इति ॥ वायुः संधानम् । संधीयतेऽनेनेति संधानम् । इत्याधिलोकं दर्शनमुक्तम् ॥ अथाधिज्यौतिषमित्यादि समानम् ॥**

**भाष्यार्थ**—आतां वर त्यांचा जसा उपन्यास केला आहे, तशाच त्या उपसनांतील अधिलोकदर्शन सांगितलें जातें. या प्रकरणांत सर्वच ठिकाणीं दर्शनाचा क्रम सांगण्याच्या इच्छेनें 'अथ-'शब्द योजला आहे. संहितेचें पूर्वरूप पृथिवी आहे. पूर्ववर्ण हेंच पूर्वरूप आहे. संहितेच्या पूर्ववर्णाच्या ठिकाणीं पृथिवीदृष्टि करावी, असें येथें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें तिचें उत्तररूप आकाश म्ह० अन्तरिक्षलोक आहे. संधि म्हणजे पूर्व व उत्तर रूपांचा मध्य; ज्यांत पूर्वोत्तर रूपांचें संधान केलें जातें; ज्यांत पूर्व व उत्तररूप एकत्र केलें जातें तो संधि. वायु हें संधान आहे. म्ह० ज्याच्या योगानें त्यांचें संधान होतें तें संधान. अशा रीतीनें हें अधिलोकदर्शन सांगितलें. 'अथाधिज्यौतिषं' इत्यादि पुढील पर्यायांचा अर्थ असाच करावा.

**श्रुतिः—इतीमा महा सꣳहिताः । य एवमेता महा सꣳहिता व्याख्याता वेद । संधीयते प्रजया पशुभिः । ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥ ( ३ )**

**अर्थ**—अशा या महासंहिता आहेत. जो कोणी या अशा प्रकारें व्याख्यान केलेल्या महासंहितांना जाणतो—त्यांची उपासना—ध्यान करितो, तो प्रजा, पशु, **ब्रह्मवर्चस तेज,**

व्रीहि-यवादि अन्न व स्वर्गलोक यांनीं संयुक्त केला जातो. त्या उपासकाला प्रजादि-स्वर्गान्त फल प्राप्त होतें. ( ३ )

**भाष्यं—इतीमा इत्युक्ता उपप्रदर्श्यन्ते । यः कश्चिदेवमेता महासंहिता व्याख्याता वेदोपास्ते । वेदेत्युपासनं स्याद्विज्ञानाधिकारात् "इति प्राचीनयोग्योपास्स्व" इति च वचनात् । उपासनं च यथाशास्त्रं तुल्यप्रत्ययसंततिरसंकीर्णा चातत्प्रत्ययैः शास्त्रोक्तालम्बनविषया च । प्रसिद्धश्चोपासनशब्दार्थो लोके गुरुमुपास्ते राजानमुपास्त इति । यो हि गुर्वादीन्संततमुपचरति स उपास्त इत्युच्यते । स च फलमाप्नोत्युपासनस्य । अतोऽत्रापि च य एवं वेद संधीयते प्रजादिभिः स्वर्गान्तैः । प्रजादिफलान्याप्नोतीत्यर्थः ॥ (इति शांकरभाष्ये तृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥)**

**भाष्यार्थ**—( 'हृदयाच्या अग्रभागीं कापतो, नंतर जिह्वाग्रीं, त्यानंतर वक्षःस्थलाच्या अग्रभागीं' या परामर्शाप्रमाणें )='इति' व 'इमाः' या शब्दांनीं पूर्वोक्त उपासनांचें उपप्रदर्शन—परामर्श—केला जातो. [ अधिकारविधीचें प्रदर्शन करण्यासाठीं जसे दर्शादि सहा याग मिळून एका फलाचें साधन होतात, कारण अधिकारांशानें त्यांचा अभेद—ऐक्य असतें, त्याप्रमाणें ज्याला प्रजादिफलाची कामना असते त्यानें या पांच उपासना समुच्चयानें कराव्या असें '**यः कश्चित्**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=जो कोणी अशा रीतीनें या वर व्याख्यान केलेल्या महासंहिता जाणतो म्ह० त्यांची उपासना करतो; येथें 'वेद' या शब्दाचा उपासन हा अर्थ होतो. कारण येथील हा अधिकार—प्रकरणारंभ विज्ञानाचा म्ह० उपासनेचा आहे. ज्ञानाचा नाहीं. तसेंच पुढें 'इति प्राचीनयोग्योपास्स्व' म्ह० हे प्राचीनयोग्य शिष्या, अशा प्रकारें तूं उपासना कर, असें वचन आहे. उपासना म्ह० यथाशास्त्र समान प्रत्ययाची—तुल्यप्रत्ययाची संतति. एकाच विषयाच्या प्रत्ययाची संतति—एकाच विषयाच्या प्रत्ययाचा अविच्छिन्न प्रवाह. परंतु ती अतत्प्रत्ययांनीं म्ह० त्या प्रत्ययाहून निराळ्या जातीच्या प्रत्ययांनीं संकीर्ण न झालेली असली पाहिजे व शास्त्रोक्त आलंबन हा त्या उपासनेचा विषय असला पाहिजे. ( अर्थात् शास्त्रोक्त आलंबनविषयक व भिन्न जातीय प्रत्ययांनीं असंकीर्ण अशा प्रकारच्या समान प्रत्ययाचा अविच्छिन्न प्रवाह ही उपासना होय.)=व्यवहारांत गुरूची उपासना करतो, राजाची उपासना करतो इत्यादि वाक्यांत 'उपासना-'शब्दाचा अर्थ प्रसिद्ध आहे. कारण जो गुरु, राजा, इत्यादिकांची सतत परिचर्या करतो तोच उपासना करतो, असें म्हणतात; आणि त्यालाच उपासनेचें फल मिळतें. यास्तव या संहितांमध्येंहि जो अशा रीतीनें उपासना करतो तो प्रजादि-स्वर्गान्त फलांशीं संयुक्त केला जातो, म्ह० प्रजेपासून स्वर्गापर्यंत जेवढीं फलें आहेत तेवढीं सर्व त्याला प्राप्त होतात; असा याचा भावार्थ. ( फलाची इच्छा

करणाऱ्या पुरुषाकडून केलें जाणारें संहितोपासन इष्ट फल द्यावयास समर्थ होतें. पण फलाची इच्छा न करणाऱ्या पुरुषाकडून केलें जाणारें तें ब्रह्मविद्येला कारण होतें. ज्याला मेधा म्ह० धारणाशक्ति नसते त्याला ब्रह्मज्ञान होऊं शकत नाहीं. यास्तव मेधाप्राप्ती-करितां केलेला जपहि ब्रह्मविद्येच्या उपयोगी आहे. ज्याच्यापाशीं संपत्ति नसते त्याला चित्तशुद्धीकरितां यागादिकांचें अनुष्ठान करतां येत नाहीं. यास्तव संपत्तीची इच्छा कर-णारासाठीं पुढें सांगितलेला होमहि परंपरेनें ब्रह्मविद्येच्या उपयोगी आहे; असें या मुख्य ब्रह्मविद्येच्या समीप सांगितलेल्या उपासनादिकांचें महत्तात्पर्य जाणावें. ) इति शीक्षा-ध्याये तृतीयोऽनुवाकः ॥ ३.

**श्रुतिः—यश्छन्दसामृषभो विश्वरूपः । छन्दोभ्योऽध्यमृतात्संबभूव । स मेन्द्रो मेधया स्पृणोतु । अमृतस्य देव धारणो भूयासम् । शरीरं मे विचर्षणम् ॥**

**अर्थ—**जो वेदांतील ऋषभासारखा आहे, सर्वरूप आहे; छंदांपासून म्ह० वेदां-पासून; वेदच अमृत आहे, त्या अमृतापासून तो आधिक्यानें प्रादुर्भूत झाला. तो अशा प्रकारचा ओंकार, इंद्र—सर्व कामांचा ईश, परमेश्वर मला मेधेनें म्ह० प्रज्ञेनें प्रसन्न करो, किंवा बलयुक्त करो. हे देवा, मीं अमृताचा म्हणजे अमृतत्वाला कारण होणाऱ्या ब्रह्मज्ञानाचा, 'धारणः' म्ह० धारण करणारा व्हावें. तसेंच माझें शरीर विचर्षण—विचक्षण—योग्य होवो.

**भाष्यं—यश्छन्दसामिति । मेधाकामस्य श्रीकामस्य च तत्प्राप्तिसाधनं जप-होमावुच्येते । " स मेन्द्रो मेधया स्पृणोतु " " ततो मे श्रियमावह " इति च लिङ्गदर्शनात् । यश्छन्दसां वेदानामृषभ इवर्षभः प्राधान्यात् । विश्वरूपः सर्व-रूपः सर्ववाग्व्याप्तेः । " तद्यथा शङ्कुना " इत्यादि श्रुत्यन्तरात् । अत एवर्षभ-त्वमोंकारस्य । ओंकारो ह्यत्रोपास्य इति ऋषभादिशब्दैः स्तुतिर्न्याय्यैवोंकारस्य । छन्दोभ्यो वेदेभ्यो वेदा ह्यमृतं तस्मादमृतादधिसंबभूव ॥**

**भाष्यार्थ—**आतां अवान्तर तात्पर्याच्या आशयानें श्रुति ' यच्छन्दसां० ' इत्यादि सांगते. ज्याला मेधेची व श्रीची कामना आहे त्याला त्याच्या प्राप्तीचें साधन—जप व होम सांगितला जातो. कारण त्यांत 'तो इंद्र मला मेधा देवो;' आणि 'नंतर मला श्री दे;' असें लिंग दिसतें. 'यः छंदसां ऋषभः'—जो वेदांतील ऋषभासारखा आहे, कारण त्याला प्राधान्य आहे; 'विश्वरूपः'—सर्वरूप आहे; कारण त्यानें सर्व वाणीला व्यापलें आहे. याविषयीं 'ज्याप्रमाणें देंठानें—शिरांनीं सर्व पान व्यापलेलें असतें त्याप्र-माणें ओंकारानें सर्व वाणी व्यापलेली आहे,' अशा अर्थाची 'तद्यथा शङ्कुना०' इत्यादि दुसरी श्रुति आहे.—छां. भा. २.२३.३. सु. उ. पृ. ३४५.—म्हणूनच ओंकाराला

ऋषभत्व आहे. ओंकारच येथें–या प्रकरणांत उपास्य आहे. यास्तव ऋषभादि-शब्दांनीं ओंकाराची स्तुति करणें न्याय्यच आहे. छन्दोभ्यः–छंदांपासून–वेदांपासून; वेदच अमृत आहे. 'अमृतात्'–त्या अमृतापासून तो 'अधि संबभूव'–आधिक्यानें प्रादुर्भूत झाला.

**भाष्यं—लोकदेववेदव्याहृतिभ्यः सारिष्ठं जिघृक्षोः प्रजापतेस्तपस्यत ओंकारः सारिष्ठत्वेन प्रत्यभादित्यर्थः । न हि नित्यस्योंकारस्याञ्जसैवोत्पत्तिरेव कल्प्यते । स एवंभूत ओंकार इन्द्रः सर्वकामेशः परमेश्वरो मा मां मेधया प्रज्ञया स्पृणोतु प्रीणयतु बलयतु वा । प्रज्ञाबलं हि प्रार्थ्यते । अमृतस्यामृतत्वहेतुभूतस्य ब्रह्मज्ञानस्य तदधिकारात् । हे देव धारणो धारयिता भूयासं भवेयम् । किंच शरीरं मे मम विचर्षणं विचक्षणं योग्यमित्येतत् । भूयादिति प्रथमपुरुषविपरिणामः ॥**

**भाष्यार्थ—**लोक, देव, वेद व व्याहृति यांपासून त्यांतील सर्वोत्कृष्ट सार काढून घेण्याची इच्छा करणाऱ्या व तप करणाऱ्या प्रजापतीला ओंकार अत्यंत साररूपानें भासला, असा याचा अर्थ. ( ओंकार उत्पन्न झाला, असा 'सं बभूव' या पदाचा अर्थ न करितां तो प्रजापतीला भासला, असा करावा. )=कारण नित्य ओंकाराची साक्षात् उत्पत्तिच झाली, अशी कल्पना करतां येत नाहीं. 'सः इन्द्रः'–तो अशा प्रकारचा ओंकार, इंद्र–सर्व कामांचा ईश–परमेश्वर 'मा'–मला 'मेधया'–मेधेनें म्ह० प्रज्ञेनें 'स्पृणोतु'–प्रसन्न करो, किंवा बलयुक्त करो. येथें प्रज्ञाबलाची प्रार्थना केली जात आहे. 'हे देव अमृतस्य धारणः भूयासं'–हे देवा, मीं अमृताचा म्हणजे अमृतत्वाला कारण होणाऱ्या ब्रह्मज्ञानाचा, कारण ब्रह्मज्ञानप्रकरणाचा आरंभ झालेला आहे. 'धारणः' म्ह० धारण करणारा व्हावें. तसेंच 'मे शरीरं विचर्षणं'–माझें शरीर विचर्षण म्ह० विचक्षण–योग्य होवो. पूर्ववाक्यांत 'भूयासं' असें जें उत्तम पुरुषीं पद आहे त्याचाच येथें 'भूयात्' असा प्रथम पुरुष करून घ्यावा.

**श्रुतिः—जिह्वा मे मधुमत्तमा । कर्णाभ्यां भूरि विश्रुवम् । ब्रह्मणः कोशोऽसि मेधया पिहितः । श्रुतं मे गोपाय । आवहन्ती वितन्वाना ( १ )। कुर्वाणाऽचीरमात्मनः । वासाꣳसि मम गावश्च । अन्नपाने च सर्वदा । ततो मे श्रियमावह । लोमशां पशुभिः सह स्वाहा । आ माऽऽयन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । वि माऽऽयन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । प्र माऽऽयन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । दमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ( २ ) ॥**

**अर्थ—**माझी जिह्वा मधुमत्तमा म्ह० अतिशय मधुर भाषण करणारी असो; दोन कांनांनीं म्ह० श्रोत्रेंद्रियांनीं मीं पुष्कळ ऐकावें. हे ओंकारा, तूं ब्रह्माचा–परमात्म्याचा कोश आहेस. मेधेनें म्ह० लौकिक प्रज्ञेनें आच्छादित झालेला तो तूं सामान्य बुद्धीमानांना

ज्ञाततत्त्व होणारा नाहींस. म्ह० तुझें तत्त्व त्यांना ज्ञात झालेलें नाहीं. श्रुत म्हणजे श्रवणपूर्वक आत्मज्ञानादिक. माझ्या श्रुताचें तूं रक्षण कर. मला वस्त्रें, गायी व अन्नपान हीं सर्वदा सत्त्वर आणून देणारी, त्यांचा विस्तार करणारी व तें सर्व मजपाशीं चिरकाल राहील असें करणारी जी श्री त्या श्रीला मेधा दिल्यानंतर मजपाशीं आण. (कारण ज्याला मेधा नाहीं त्याला प्राप्त झालेली श्री अनर्थालाच कारण होते. आतां ती श्री कशा प्रकारची तें सांगतात–)'लोमशां पशुभिः सह स्वाहा'–बकरी, मेंढी इत्यादिकांनीं युक्त; त्याचप्रमाणें अन्य पशूंनीं युक्त अशा श्रीला आण. 'स्वाहा' असा जो स्वाहाकार आहे तो होमासाठीं असलेल्या मंत्राचा शेवट झाला हें सुचविण्यासाठीं आहे. वैदिक–विद्याभ्यासपरायण शिष्य मज संप्रदायप्रवर्तक आचार्याकडे येवोत. मला असले शिष्य मिळोत; या सर्व वाक्यांतील 'स्वाहा-'शब्द होमसूचक आहे. शिष्य मजपाशीं पशु, स्वर्ग, ब्रह्मलोक, मोक्ष या विविध फलासाठीं येवोत. विद्याग्रहणाची उत्कृष्ट प्रज्ञा ज्यांना आहे असे शिष्य येवोत. बाह्येंद्रियचेष्टारूप बाललीलेपासून निवृत्त झालेले शिष्य येवोत. शं–शांति, क्रोधादि चित्तदोपराहित्य, त्यानें युक्त असलेले शिष्य येवोत.

**भाष्यं—जिह्वा मे मधुमत्तमा मधुमत्यतिशयेन मधुरभाषिणीत्यर्थः । कर्णाभ्यां श्रोत्राभ्यां भूरि** बहु **विश्रवं व्यश्रवं [?] श्रोता भूयासमित्यर्थः । आत्मज्ञानयोग्यः कार्यकरणसंघातोऽस्त्विति वाक्यार्थः । मेधा च तदर्थमेव हि प्रार्थ्यते ब्रह्मणः परमात्मनः कोशोऽसि । असेरिवोपलब्ध्यधिष्ठानत्वात् । त्वं हि ब्रह्मणः प्रतीकं त्वयि ब्रह्मोपलभ्यते । मेधया लौकिकप्रज्ञया पिहित आच्छादितः स त्वं सामान्यप्रज्ञैरविदिततत्त्व इत्यर्थः । श्रुतं श्रवणपूर्वकमात्मज्ञानादिकं मे गोपाय रक्ष । तत्प्राप्त्यविस्मरणादि कुर्वित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—'मे जिह्वा मधुमत्तमा'–माझी जिह्वा मधुमत्तमा म्ह० अतिशय मधुर भाषण करणारी असो; 'कर्णाभ्यां भूरि विश्रुवं'–दोन कानांनीं म्ह० श्रोत्रेंद्रियांनीं मीं पुष्कळ ऐकावें. म्ह०मीं श्रोता व्हावें, असा भावार्थ. शरीर व इंद्रियें यांचा संघात–समुदाय आत्मज्ञानाला योग्य होवो, असा वाक्यार्थ. मेधाहि त्याचसाठीं प्रार्थिली जाते. हे ओंकारा, 'ब्रह्मणः कोशः असि'–तूं ब्रह्माचा–परमात्म्याचा कोश आहेस. कारण तरवारीच्या म्यानाप्रमाणें तूं त्याच्या उपलब्धीचें अधिष्ठान आहेस. तूंच ब्रह्माचें प्रतीक आहेस. तुजमध्यें ब्रह्म उपलब्ध होतें. ( वाच्य ब्रह्म व वाचक ओंकार यांचा अभेद आहे,असें सांगण्याच्या इच्छेनें त्या अचेतन शब्दाची प्रार्थना केली आहे व त्याला 'इंद्र' असें वर म्हटलें आहे. मग असें जर आहे म्हणजे प्रणव ब्रह्माहून भिन्न नसल्यामुळें इष्टफल देण्यास जर समर्थ आहे तर सर्वच त्याची उपासना कां करीत नाहींत, असें कोणी

विचारील म्हणून म्हणतात--)' मेधया पिहितः'--मेधेनें म्ह० लौकिक प्रज्ञेनें आच्छादित झालेला तो तूं सामान्य बुद्धिमानांना ज्ञाततत्त्व होणारा नाहींस. म्ह० तुझें तत्त्व त्यांना ज्ञात झालेलें नाहीं, असा भावार्थ.'श्रुतं'—श्रवणपूर्वक आत्मज्ञानादिक. ' मे श्रुतं गोपाय '—माझ्या श्रुताचें तूं रक्षण कर. त्याची प्राप्ति, अविस्मरण इत्यादि कर, असा याचा भावार्थ.

**भाष्यं—जपार्था एते मन्त्रा मेधाकामस्य। होमार्थास्त्वधुना श्रीकामस्य मन्त्रा उच्यन्ते । आवहन्त्यानयन्ती । वितन्वाना विस्तारयन्ती । तनोतेस्तत्कर्मत्वात्। कुर्वाणा निर्वर्तयन्ती । अचीरमचिरं क्षिप्रमेव । छान्दसो दीर्घः । चिरं वा कुर्वाणा । आत्मनो मम, किमित्याह—वासांसि वस्त्राणि मम गावश्च गाश्चेति यावत् । अन्नपाने च सर्वदैवमादीनि कुर्वाणा श्रीर्या तां ततो मेधानिर्वर्तनात्परमावहाऽऽनय । अमेधसो हि श्रीरनर्थायैवेति । किंविशिष्टाम् । लोमशामजाव्यादियुक्तामन्यैश्च पशुभिः संयुक्तामावहेत्यधिकारादोंकार एवाभिसंबध्यते । स्वाहा, स्वाहाकारो होमार्थमन्त्रान्तज्ञापनार्थः । आयन्तु मामिति व्यवहितेन संबन्धः । ब्रह्मचारिणो वि माऽऽयन्तु प्रमाऽऽयन्तु दमायन्तु शमायन्त्वित्यादि ॥**

**भाष्यार्थ—**ज्याला मेधेची इच्छा असते त्याच्या जपासाठीं हे वरील मंत्र आहेत. आतां ज्याला श्रीची इच्छा असते त्याच्या होमाकरितां हे मंत्र सांगितले जातात—' आवहन्ती ' —आणणारी 'वितन्वाना'—विस्तृत करणारी. कारण 'तनु-'धातूचा विस्तार करणें हा अर्थ आहे आणि ' कुर्वाणा '—करणारी. ' अचिरं '—सत्वरच. येथें ' अचीरं ' असें जें दीर्घत्व आहे तें छान्दस आहे. किंवा ' चीरं—चिरं ' कुर्वाणा ' आत्मनः '—मला वस्त्रें, गायी इत्यादि दीर्घकाल करणारी. ' मम वासांसि, च गावः, च अन्नपाने सर्वदा आवहन्ती च वितन्वाना आत्मनः अचीरं कुर्वाणा '—मला वस्त्रें, गायी व अन्नपान हीं सर्वदा सत्वर आणून देणारी, त्यांचा विस्तार करणारी व तें सर्व मजपाशीं चिरकाल राहील असें करणारी जी श्री त्या ' श्रियं '—श्रीला 'ततः'—मेधा दिल्यानंतर ' आवह '—आण. कारण ज्याला मेधा नाहीं त्याला प्राप्त झालेली श्री अनर्थालाच कारण होत असते. आतां ती श्री कशा प्रकारची—कोणत्या विशेषणांनीं विशिष्ट, तें सांगतात—' लोमशां '—केंसाळ बकरी, मेंढी इत्यादिकांनीं युक्त; त्याचप्रमाणें ' पशुभिः'—अन्य पशुंनीं युक्त अशा श्रीला आण. अशा रीतीनें प्रकरणाच्या आरंभावरून ओंकाराचाच संबंध लाविला जातो. ' स्वाहा '—हा स्वाहाकार होमासाठीं असलेल्या मंत्राचा शेवट झाला हें सुचविण्यासाठीं आहे. ( यापुढील स्वाहाशब्दाहि होमार्थ मंत्रांचा अन्त सुचविणारे आहेत, असें जाणावें.) ' मा ब्रह्मचारिणः आयन्तु, वि-आयन्तु, प्र-आयन्तु, ' असा मधील

'मा' या पदाला सोडून 'आ, वि व प्र' यांचा संबंध 'आ यन्तु' या क्रियापदाशीं लावावा.

**श्रुतिः—यशो जनेऽसानि स्वाहा। श्रेयान्वस्यसोऽसानि स्वाहा। तं त्वा भग प्रविशानि स्वाहा। स मा भग प्रविश स्वाहा। तस्मिन्त्सहस्रशाखे। नि भगाहं त्वयि मृजे स्वाहा। यथाऽऽपः प्रवता यन्ति यथा मासा अहर्जरम्। एवं मां ब्रह्मचारिणः। धातरायन्तु सर्वतः स्वाहा। प्रतिवेशोऽसि प्र मा भाहि प्र मा पद्यस्व (३)॥ ४**

**अर्थ**—मीं जनसमूहांत यशस्वी व्हावें. मीं वसुतर किंवा वसुमत्तर यांहून अतिशय प्रशस्य व्हावें. तसेंच हे भगवन्, त्या ब्रह्माच्या कोशभूत अशा तुला–तुजमध्यें मीं प्रवेश करावा व प्रवेश करून, अनन्य–एकरूप–त्वद्रूपच व्हावें, असा याचा अर्थ. भगवन्, तो तूंहि मजमध्यें प्रवेश कर. म्हणजे आम्हां उभयतांचें एकत्वच असो. त्या तुज सहस्र-शाखायुक्त म्ह० बहु भेदयुक्त प्रणवामध्यें हे भगवन्, मी आपल्या पापाचरणाचें शोधन करतों. ज्याप्रमाणें व्यवहारांत जल सखल प्रदेशाकडे जातें, किंवा जसे महिने अहर्जरास–संवत्सरास त्याप्रमाणें मजकडे ब्रह्मचारी हे धात्या, हे सर्वांच्या विधात्या, सर्व दिशांनीं, सर्व बाजूंनीं येवोत. प्रतिवेश म्ह० श्रम घालविण्याचें स्थान, शेजारचें घर, असा याचा भावार्थ. तसाच तूं प्रतिवेशासारखा प्रतिवेश आहेस. तुझें परिशीलन करणाऱ्या पुरुषांचें सर्व पाप व दुःख यांच्या निरसनाचें तूं स्थान आहेस. यास्तव मला आपलें स्वरूप प्रकट कर व मला प्राप्त हो.

**भाष्यं—यशो यशस्वी जने जनसमूहेऽसानि भवानि। श्रेयान्प्रशस्यतरो वस्यसो वसुतराद्वसुमत्तराद्वाऽसानीत्यन्वयः। किं च तं ब्रह्मणः कोशभूतं त्वा त्वां हे भग भगवन्पूजावन्प्रविशानि प्रविश्य चानन्यस्त्वदात्मैव भवानीत्यर्थः। स त्वमपि मा मां भग भगवन्पूजावन्प्रविशाऽऽवयोरेकत्वमेवास्तु। तस्मिंस्त्वयि सहस्रशाखे बहुभेदे निमृजे शोधयाम्यहं पापकृत्याम्। यथा लोक आपः प्रवता प्रवणवता निम्नवता देशेन यन्ति गच्छन्ति। यथा च मासा अहर्जरं संवत्सरोऽहर्जरः। अहोभिः परिवर्तमानो लोकाञ्जरयतीत्यहानि वाऽस्मिञ्जीर्यन्त्यन्तर्भवन्तीत्यहर्जरः। तं च यथा मासा यन्त्येवं मां ब्रह्मचारिणो हे धातः सर्वस्य विधातः मामायन्त्वागच्छन्तु सर्वतः सर्वदिग्भ्यः॥**

**भाष्यार्थ**—'अहं जने यशः असानि'—मीं जनसमूहांत यशस्वी व्हावें. 'अहं वस्यसः श्रेयान् असानि'—मी वसुतर किंवा वसुमत्तर यांहून अतिशय प्रशस्य व्हावें.

('वस्'–राहणें किंवा आच्छादन करणें या धातूला शील या अर्थी 'उ' प्रत्यय होऊन 'वसु' असा शब्द झाला आहे. त्याचा अर्थ क्रमानें वसनशील किंवा पराच्छादनशील असा आहे. वसुतर म्ह० अतिशय वसु व वसुमत्तर म्ह० अतिशय वसुमान्)=तसेंच 'तं त्वा'–त्या ब्रह्माच्या कोशभूत अशा तुला 'हे भग'–भगवन्, पूजावन्–पूज्य, 'प्रविशानि'–मीं प्रवेश करावा. तुजमध्यें प्रवेश करून, अनन्य एकरूप होऊन त्वद्रूपच व्हावें, असा याचा अर्थ. हे भग–भगवन्, पूजावन् 'स मा प्राविश'–तो तूंहि मजमध्यें प्रवेश कर. म्हणजे आह्मां उभयतांचें एकत्वच असो. 'तस्मिन् त्वयि सहस्रशाखे'–त्या तुज सहस्रशाखायुक्त म्ह० बहु भेदयुक्त प्रणवामध्यें मी 'निमृजे'–आपल्या पापचरणाचें शोधन करतों. 'यथा आपः प्रवता यन्ति'–ज्याप्रमाणें व्यवहारांत जल सखल प्रदेशानें जातें, किंवा 'यथा मासाः अहर्जरं'–जसे महिने अहर्जरास प्राप्त होतात; अहर्जर म्ह० संवत्सर; दिवसांच्या योगानें परिवर्तन पावणारा संवत्सर लोकांना जीर्ण करतो; किंवा अहर् म्ह० दिवस त्यांत जिरतात, अन्तर्भूत होतात ह्मणून तो अहर्जर होय. त्या अहर्जराला मास जसे जातात 'एवं मां ब्रह्मचारिणः'–त्याप्रमाणें मजकडे ब्रह्मचारी 'धातर्'–हे धात्या, हे सर्वांच्या विधात्या, 'सर्वतः आयन्तु'–सर्व दिशांनीं, सर्व बाजूंनीं येवोत.

**भाष्यं—प्रतिवेशः–श्रमापनयनस्थानमासन्नगृहमित्यर्थः । एवं त्वं प्रतिवेश इव प्रतिवेशस्त्वच्छीलिनां सर्वपापदुःखापनयनस्थानमसि, अतो मा मां प्रति प्रभाहि प्रकाशयाऽऽत्मानं प्रपद्यस्व च । मां रसविद्धमिव लोहं त्वन्मयं त्वदात्मानं कुर्वित्यर्थः । श्रीकामोऽस्मिन्विद्याप्रकरणेऽभिधीयमानो धनार्थः । धनं च कर्मार्थम् । कर्म चोपात्तदुरितक्षयाय । तत्क्षये हि विद्या प्रकाशते । तथा च स्मृतिः "ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः । यथाऽऽदर्शतले प्रख्ये पश्यन्त्यात्मानमात्मनि ॥" इति ॥ ( इति शीक्षाध्यायभाष्ये चतुर्थोऽनुवाकः । )**

**भाष्यार्थ**—'प्रतिवेशः'–श्रम घालविण्याचें स्थान, शेजारचें घर, असा याचा भावार्थ. तसाच तूं प्रतिवेशासारखा प्रतिवेश 'असि'–आहेस. तुझें परिशीलन करणाऱ्या पुरुषांचें सर्व पाप व दुःख यांच्या निरसनाचें स्थान आहेस. यास्तव 'मा प्रभाहि'–मला आपलें स्वरूप प्रकट कर व 'मा प्रपद्यस्व'–मला प्राप्त हो. रसायनक्रियेनें–रस करून एकरूप केलेल्या धातूप्रमाणें मला त्वन्मय–त्वद्रूप कर, असा याचा भावार्थ. या विद्याप्रकरणामध्यें श्रीकामाचें जें कथन केलें आहे तें धनासाठीं आहे. धन कर्मासाठीं आहे, कर्म संचित पापक्षयार्थ आहे; आणि संचित पापाचा क्षय झाला असतां विद्या प्रकाशमान होते. याच अर्थी–'पापकर्मांचा क्षय झाल्यामुळें पुरुषांना ज्ञान होतें. ज्याप्रमाणें स्वच्छ

आरशाच्या तलावर—आरशांत तोंड पाहतात त्याप्रमाणें ते आत्म्याला आपल्या अन्तःकरणांत पाहतात.' अशी स्मृति प्रमाण आहे. (इति शीक्षाध्याये चतुर्थोऽनुवाकः) ४

**भाष्यं—संहिताविषयमुपासनमुक्तं तदनु मेधाकामस्य श्रीकामस्य मन्त्रा अनुक्रान्तास्ते च पारम्पर्येण विद्योपयोगार्था एव। अनन्तरं व्याहृत्यात्मनो ब्रह्मणोऽन्तरुपासनं स्वाराज्यफलं प्रस्तूयते ॥**

**भाष्यार्थ**—संहिताविषयक उपासन सांगितलें. त्यानंतर मेधेची कामना करणारा व श्रीची कामना करणारा, यांच्या साठीं मंत्र सांगावयास आरंभ केला. पण ते मंत्रहि परंपरेनें विद्येच्या उपयोगाकरितांच आहेत. त्यानंतर आतां स्वाराज्य हें ज्याचें फल आहे, असें व्याहृतिरूप ब्रह्माचें अन्तरुपासन सांगावयास आरंभ करितात. (म्ह० व्याहृति हेंच ज्याचें शरीर आहे अशा हिरण्यगर्भसंज्ञक ब्रह्माचा—हृदयांतील ध्यानाचा विषय—या रूपानें उपदेश करितात.)

**श्रुतिः—भूर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतयः। तासामु ह स्मैतां चतुर्थीम्। माहाचमस्यः प्रवेदयते। मह इति। तद्ब्रह्म। स आत्मा। अङ्गान्यन्या देवताः। भूरिति वा अयं लोकः। भुव इत्यन्तरिक्षम्। सुवरित्यसौ लोकः (१)। मह इत्यादित्यः। आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते। भूरिति वा अग्निः। भुव इति वायुः। सुवरित्यादित्यः। मह इति चन्द्रमाः। चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतीꣳषि महीयन्ते। भूरिति वा ऋचः। भुव इति सामानि। सुवरिति यजूꣳषि (२) मह इति ब्रह्म। ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयन्ते। भूरिति वै प्राणः। भुव इत्यपानः। सुवरिति व्यानः। मह इत्यन्नम्। अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते। ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा। चतस्रश्चतस्रो व्याहृतयः। ता यो वेद। स वेद ब्रह्म। सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति (३)॥ ५॥**

**अर्थ**—'भूः भुवः सुवः' अशा या तीन व्याहृति आहेत; त्यांतीलच चवथी 'महः' ही व्याहृति आहे. महाचमस्याचा पुत्र—माहाचमस्य, तो या चवथ्या व्याहृतीला जाणतो. 'महः' अशी जी चवथी व्याहृति तें ब्रह्म आहे. तो आत्मा आहे. इतर देवता अंगें—अवयव आहेत. 'भूः' ही व्याहृति हा लोक आहे, 'भुवः' हा अंतरिक्षलोक आहे, 'सुवर्' हा स्वर्ग लोक आहे. 'महः' हा आदित्य आहे. आदित्याच्या योगानेंच सर्व लोक वृद्धि पावतात. 'भूः' हाच अग्नि आहे, 'भुवः' हा वायु आहे, 'सुवर्' हा आदित्य आहे. 'महः' चंद्रमा आहे. चंद्राच्या योगानें सर्व ज्योति वृद्धि पावतात. 'भूः' या ऋचा आहेत 'भुवः' हीं सामें आहेत, 'सुवर्' हीं यजुषें आहेत. 'महः' हा

ओंकार आहे. ओंकारानेंच सर्व वेद वृद्धि पावतात. 'भूः' हाच प्राण आहे. 'भुवः' हा अपान आहे 'सुवर्' हा व्यान आहे. 'महः' हें अन्न आहे. अन्नानेंच सर्व प्राण वृद्धि पावतात, त्याच ह्या चार व्याहृति प्रत्येकीं चार चार प्रकारच्या होतात. त्या व्याहृतींना जो जाणतो तो ब्रह्माला जाणतो. सर्व अंगभूत देव या विद्वानाला स्वाराज्यप्राप्ति झाली असतां बलि आणून देतात. ५

**भाष्यं—भूर्भुवः सुवरित्युक्तोपप्रदर्शनार्थः। एतास्तिस्र इति प्रदर्शिताना परामर्शार्थः परामृष्टाः स्मार्यन्ते वा इत्यनेन। तिस्र एताः प्रसिद्धा व्याहृतयः स्मार्यन्ते तावत्। तासामियं चतुर्थी व्याहृतिर्मह इति। तामेतां चतुर्थीं महाचमसस्यापत्यं माहाचमस्यः प्रवेदयते। उ ह स्म इत्येतेषां वृत्तानुकथनार्थत्वाद्विदितवान्ददर्शेत्यर्थः। माहाचमस्यग्रहणमार्षानुस्मरणार्थम्। ऋषिस्मरणमप्युपासनाङ्गमिति गम्यत इहोपदेशात्॥**

भाष्यार्थ—'भूः भुवः, सुवः' हा उल्लेख उक्त व्याहृतींच्या उपप्रदर्शनार्थ आहे. 'एताः तिस्रः' हा उल्लेख 'भूः भुवः' इत्यादिकांनीं उपप्रदर्शित केलेल्या त्यांच्या परामर्शाकरितां आहे. 'वै' या पदानें त्या परामृष्ट व्याहृतींचेंच स्मरण करविलें जातें; या तीन प्रसिद्ध व्याहृती प्रथम स्मरण करविल्या जातात. त्यांतील 'महः' ही चवथी व्याहृति आहे. त्या चवथ्या व्याहृतीला महाचमस्याचा पुत्र माहाचमस्य मुनि जाणतो. पण 'उ ह स्म' हे तीन निपात मागील घडलेल्या वर्तमानाचें अनुकथन करण्यासाठीं असल्यामुळें माहाचमस्य त्यांना जाणता झाला, पाहता झाला, असा अर्थ जाणावा. 'महः' या चवथ्या व्याहृतीच्या ऋषीचें अनुस्मरण करण्यासाठीं 'माहाचमस्य' या नांवाचें ग्रहण केलें आहे. येथें त्याचा उपदेश केलेला असल्यामुळें ऋषीचें स्मरणहि उपासनेचें अंग आहे असें वाटतें.

**भाष्यं—येयं माहाचमस्येन दृष्टा व्याहृतिर्मह इति तद्ब्रह्म महद्धि ब्रह्म। महश्च व्याहृतिः। किं पुनस्तत्। स आत्मा। आप्नोतेर्व्याप्तिकर्मणः। आत्मेतराश्च व्याहृत्यो लोका देवा वेदाः प्राणाश्च मह इत्यनेन व्याहृत्यात्मनाऽऽदित्यचन्द्रब्रह्मान्नभूतेन व्याप्यन्ते यतः अतोऽङ्गान्यवयवा अन्या देवताः। देवताग्रहणमुपलक्षणार्थं लोकादीनाम्। मह इत्येतस्य व्याहृत्यात्मनो देवलोकादयः सर्वेऽवयवभूताः। यत आहाऽऽदित्यादिभिर्लोकादयो महीयन्त इति। आत्मना ह्यङ्गानि महीयन्ते महनं वृद्धिरुपचयो महीयन्ते वर्धन्त इत्यर्थः। अयं लोकोऽग्निर्ऋग्वेदः प्राण इति प्रथमा व्याहृतिर्भूरिति। एवमुत्तरोत्तरैकैका चतुर्धा भवति॥**

भाष्यार्थ—ही जी 'महः' अशी माहाचमस्यानें पाहिलेली व्याहृति तें ब्रह्म आहे. कारण ब्रह्म महत् आहे व व्याहृति 'महः' आहे. पण तें ब्रह्म काय आहे? तोच

आत्मा आहे. कारण ' आप् ' हा धातु व्याप्ति हें कार्य या अर्थी आहे. आत्म्याहून भिन्न असलेल्या व्याहृति, लोक, देव, वेद व प्राण ' महः ' या आदित्य, चंद्र ब्रह्म व अन्नभूत अशा व्याहृत्यात्म्याकडून ज्याअर्थी व्यापल्या जातात त्या अर्थी इतर देवता अंगें म्ह० अवयव आहेत. येथील देवता हा शब्द लोकादिकांच्या उपलक्षणार्थ आहे. देव, लोक, इत्यादि सर्व ' महः ' या व्याहृत्यात्म्याच्या अवयवभूत आहेत. कारण आदित्यादिकांच्या योगानें लोकादिक वृद्धि पावतात, असें सांगितलें आहे. आत्म्याचीं अंगेंच वाढतात. ' महीयन्ते ' यांतील महन म्ह० वृद्धि, उपचय; आणि महीयन्ते म्ह० वृद्धि पावतात. हा लोक, अग्नि, ऋग्वेद व प्राण हें सर्व पहिली ' भूः ' ही व्याहृति आहे. अशाच रीतीनें उत्तरोत्तर एकेक व्याहृति चार चार प्रकारची होते.

**भाष्यं—मह इति ब्रह्म । ब्रह्मेत्योंकारः । शब्दाधिकारेऽन्यस्यासंभवात् । उक्तार्थमन्यत् । ता वा एताश्चतस्रश्चतुर्धेति । ता वा एता भूर्भुवः-सुवर्मह इति चतस्र एकैकशश्चतुर्धा चतुष्प्रकाराः । धाशब्दः प्रकारवचनः । चतस्रश्चतस्रः सत्यश्चतुर्धा भवन्तीत्यर्थः । तासां यथाक्लृप्तानां पुनरुपदेशस्तथैवोपासननियमार्थः ॥**

**भाष्यार्थ**—' मह ' हें ब्रह्म आहे. पण येथें ब्रह्म म्ह० ओंकार. कारण शब्दाधिकारामध्यें ओंकारावांचून अन्य ब्रह्माचा संभव नाहीं. बाकीच्या सर्व वाक्यांचा अर्थ वर सांगितला आहे. ( ' ब्रह्मणा वाव ' येथून ' अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते ' येथवर जीं वाक्यें आहेत त्यांचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणेंच समजावा. एकेक व्याहृति जेव्हां चार प्रकारें चिंतन केली जाते तेव्हां षोडशकलांनीं युक्त असलेला पुरुषच उपासित—उपासना केलेला असा होतो, ती त्याचीच उपासना होते, अशा आशयानें ' ता वा एताः ' या भाष्यानें संक्षेप सांगतात—)='ता वा एताः०'—त्या या चार व्याहृती चार प्रकारच्या आहेत. म्ह० भूः, भुवः, सुवर् व महः, या चार व्याहृती प्रत्येकीं 'चतुर्धा'—चार प्रकारच्या आहेत. ' चतुर्धा ' यांतील ' धा ' हा शब्द प्रकारवाचक आहे. त्या चार चार असून त्यांतील प्रत्येक चार प्रकारच्या होतात, असा याचा भावार्थ. त्यांची वर जशी कल्पना केली आहे तशीच उपासना करावी, असा नियम करण्यासाठीं हा पुनः उपदेश आहे.

**भाष्यं—ता यथोक्तव्याहृतीर्यो वेद स वेद विजानाति । किं ब्रह्म । ननु तद्ब्रह्म स आत्मेति ज्ञाते ब्रह्मणि न वक्तव्यमविज्ञातवत्स वेद ब्रह्मेति । न । तद्विशेषविवक्षुत्वाददोषः । सत्यं विज्ञातं चतुर्थव्याहृत्यात्मा ब्रह्मेति न तु तद्विशेषो हृदयान्तरुपलभ्यत्वं मनोमयत्वादिश्च । 'शान्तिसमृद्धम्' इत्येवमन्तो**

**विशेषणविशेष्यरूपो धर्मपूगो विज्ञायत इति तद्विवक्षु हि शास्त्रमविज्ञातमिव ब्रह्म मत्वा स वेद ब्रह्मेत्याह। अतो न दोषः ॥**

**भाष्यार्थ**—त्या वर सांगितलेल्या व्याहृतींना जो जाणतो तो जाणतो; काय ? ब्रह्म 'अहोपण वर म्हटल्याप्रमाणें तें 'महः-च ब्रह्म; व तोच आत्मा,' असें ब्रह्माला जाणलें असतां पुनः त्याला न जाणल्याप्रमाणेंच 'तो ब्रह्माला जाणतो' असें सांगणें उचित नाहीं,' अशी शंका कोणी घेईल पण ती बरोबर नाहीं. कारण 'तद्ब्रह्म स आत्मा' या वाक्यावरून सामान्य ज्ञान जरी झालें तरी त्याचा विशेष सांगण्याची इच्छा असल्यामुळें 'स वेद ब्रह्म' असें म्हणण्यांत कांहीं दोष नाहीं. चतुर्थ व्याहृतिरूप ब्रह्म आहे, असें जाणलें हें खरें; पण हृदयामध्यें उपलब्ध होणें, मनोमयत्वादि, हा त्याचा विशेष जाणलेला नाहीं. पुढच्या सहाव्या अनुवाकांतलि 'शान्तिसमृद्धं' या वाक्यापर्यंतच्या पुढील ग्रंथानें विशेषण-विशेष्यरूप धर्मसमूह जाणला जातो. यास्तव त्याला सांगण्याची इच्छा करणारें शास्त्र ब्रह्म जणुंकाय अज्ञातच आहे, असें मानून 'तो ब्रह्म जाणतो' असें म्हणत आहे. यास्तव त्यांत कांहीं दोष नाहीं.

**भाष्यं—यो हि वक्ष्यमाणेन धर्मपूगेन विशिष्टं ब्रह्म वेद स वेद ब्रह्मेत्यभिप्रायः। अतो वक्ष्यमाणानुवाकेनैकवाक्यताऽस्योभयोर्ह्यनुवाकयोरेकमुपासनं लिङ्गाच्च। भूरित्यग्नौ प्रतितिष्ठतीत्यादिकं लिङ्गमुपासनैकत्वे। विधायकाभावाच्च। न हि वेद उपासितव्य इति विधायकः कश्चिच्छब्दोऽस्ति। व्याहृत्यनुवाके 'ता यो वेद' इति च वक्ष्यमाणार्थत्वान्नोपासनभेदकः। वक्ष्यमाणार्थत्वं च तद्विशेषविवक्षुत्वादित्यादिनोक्तम्। सर्वे देवा अस्मा एवं विदुषेऽङ्गभूता आवहन्त्यानयन्ति बलिं स्वाराज्यप्राप्तौ सत्यामित्यर्थः ॥ ( इति शीक्षाध्यायभाष्ये पंचमोऽनुवाकः )५**

**भाष्यार्थ**—जो पुढें सांगितलेल्या धर्मसमूहानें विशिष्ट, असें ब्रह्म जाणतो 'तो ब्रह्माला जाणतो' असा याचा अभिप्राय. यास्तव पुढच्या अनुवाकाशीं या अनुवाकाची एकवाक्यता आहे. कारण दोन्ही अनुवाकांमध्यें एकच उपासना आहे; [व्याहृति ज्याचे अवयव आहेत असें ब्रह्मच जर पुढील अनुवाकांतील उपास्य असेल तरच उपासक प्रथम व्याहृतिरूप अग्नींत प्रतिष्ठित होतो, असें म्हणणें युक्त होईल; आणि तसें म्हणणें हेंच दोन्ही अनुवाकांतील उपासना एक आहे, असें समजण्यास सबल कारण आहे, असें 'लिङ्गाच्च' या भाष्यानें सांगतात–]= आणि असें समजण्यास लिंग–ज्ञापकहि आहे. 'भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति' म्ह० भूः या व्याहृतीचें ध्यान करून उपासक अग्नीमध्यें प्रतिष्ठित होतो, इत्यादि फलश्रुति, हेंच पांचव्या व सहाव्या अनुवाकांतील उपासना एक आहे, असें समजण्यास लिंग आहे. (तसेंच एका अनुवाकामध्यें प्रधानविधि व दुसऱ्या

अनुवाकांत गौणविधि अशी भिन्न अनुवाकांची व्यवस्था लावितां येत असल्यामुळें या दोन अनुवाकांमध्यें दोन भिन्न उपासना सांगितल्या आहेत, असें म्हणतां येत नाहीं.) =शिवाय तसें विधान करणारें वाक्य नाहीं. [ 'वेद, उपासितव्यः' अशा प्रकारचा एखादाहि विधायक–भिन्न विद्याबोधक शब्द त्यांत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ]=आतां या पांचव्या व्याहृत्यनुंवाकांत 'ता यो वेद' असा'वेद-'शब्द आहे. पण तो पुढील उपासनेकरितांच असल्यामुळें तो उपासनेचा भेद करणारा म्ह० त्या उपासनेला पुढच्या उपासनेहून पृथक् करणारा नाहीं. आतां 'त्यांतील 'वेद' हा शब्द पुढील उपासनेकरितांच आहे, म्हणून कशावरून' असें म्हणाल तर त्याचें उत्तर वर 'तद्विशेषविवक्षुत्वात्' इत्यादि वाक्यानें दिलें आहे. सर्व अंगभूत देव अशाप्रकारें उपासना करणाऱ्या या उपासकाला बलि आणून देतात. उपासनेचें फळ–स्वाराज्यप्राप्ति झाली असतां बलि आणतात, असा याचा भावार्थ. ( इति पंचमोऽनुवाकः ) ५

**भाष्यम्—भूर्भुवःसुवःस्वरूपा मह इत्येतस्य व्याहृत्यात्मनो ब्रह्मणोऽङ्गान्यन्या देवता इत्युक्तम् । यस्य ता अङ्गभूतास्तस्यैतस्य ब्रह्मणः साक्षादुपळब्ध्यर्थमुपासनार्थं च हृदयाकाशः स्थानमुच्यते शालग्राम इव विष्णोः । तस्मिन्हि तद्ब्रह्मोपास्यमानं मनोमयत्वादिधर्मविशिष्टं साक्षादुपलभ्यते । पाणाविवामलकम् । मार्गश्च सर्वात्मभावप्रतिपत्तये वक्तव्य इत्यनुवाक आरभ्यते—**

**भाष्यार्थ—**'महः' या व्याहृतिरूप ब्रह्माचीं–भूः, भुवः, सुवर् या स्वरूपाच्या अन्य देवता हीं–अंगें आहेत, असें 'अङ्गान्यन्या देवताः' या वाक्यानें सांगितलें. आतां ज्याच्या त्या अंगभूत देवता आहेत त्या ह्या ब्रह्माच्या साक्षात् ज्ञानाकरितां व उपासनेकरितां हृदयाकाश हें स्थान सांगितलें जातें. शालग्राम हें जसें विष्णूचें स्थान (त्याप्रमाणें हृदयाकाश हें ब्रह्माच्या ज्ञानादिकांचें स्थान आहे.)=कारण त्या हृदयाकाशांत मनोमयत्वादि धर्मांनीं विशिष्ट असें ब्रह्म उपासना केलें जाऊं लागलें असतां साक्षात् उपलब्ध होतें म्ह० हातावरील आवळा जसा साक्षात् दिसतो त्याप्रमाणें. तसाच सर्वात्मभाव प्राप्त होण्यासाठीं मार्गहि सांगावा, या उद्देशानें हा पुढील सहावा अनुवाक आरंभिलेला आहे.

**श्रुतिः—स य एषोऽन्तर्हृदय आकाशः । तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः । अमृतो हिरण्मयः । अन्तरेण तालुके । य एष स्तन इवावलम्बते । सेन्द्रयोनिः । यत्रासौ केशान्तो विवर्तते । व्यपोह्य शीर्षकपाले । भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति । भुव इति वायौ (१) सुवरित्यादित्ये । मह इति ब्रह्मणि । आप्नोति स्वाराज्यम् । आप्नोति मनसस्पतिम् । वाक्पतिश्चक्षुष्पतिः । श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः । एतत्ततो भवति ।**

**आकाशशरीरं ब्रह्म । सत्यात्म प्राणारामं मनआनन्दम् । शान्तिसमृद्धममृतम् । इति प्राचीनयोग्योपास्स्व (२) ॥ ६ ॥**

अर्थ—जो हा हृदयामध्यें–शुभ्रकमलाकार मांसपिंडांत आकाश–अवकाश आहे त्यांत तो हा पुरुष मनोमय–विज्ञानमय आहे. तसाच तो पुरुष अमृत–अमरणधर्मी व हिरण्मय म्ह० ज्योतिर्मय आहे. हृदयापासून 'सुषुम्ना-'नांवाची नाडी वर प्रवृत्त झाली आहे. ती दोन्ही तालूंच्या मध्यभागीं शिरली आहे. त्या दोन्हीं तालूंच्या मध्यें जो हा स्तनासारखा मांसखंड–पडजीभ लोंबत आहे, त्यांतून ती नाडी वर शिरून ज्या मूर्ध-प्रदेशीं हा केशान्त–केंसांचें मूळ विभागानें राहिलें आहे, त्या प्रदेशास प्राप्त होऊन तेथून ती बाहेर पडली आहे. याप्रमाणें मस्तकाच्या कपालांना विदीर्ण करून बाहेर निघालेली जी सुषुम्ना ती इंद्रयोनि आहे, इंद्राची म्ह० ब्रह्माची योनि–मार्ग–स्वरूपप्राप्तीचें द्वार आहे, असा याचा भावार्थ. असें चिंतन करणारा–मनोमय आत्म्याची उपासना करणारा त्या सुषुम्नानाडीनें मस्तकांतून निघून या लोकाचा अधिष्ठाता, भूःव्याहृतिरूप व महद्ब्रह्माचा अंगभूत असा जो अग्नि त्यामध्यें प्रतिष्ठित होतो. तो अग्निरूपानें या लोकास व्यापतो, असा याचा भावार्थ. तसाच 'भुवः' या व्याहृतीच्या ध्यानानें वायूमध्यें प्रतिष्ठित होतो. 'सुवर्' या व्याहृतीच्या ध्यानानें तृतीय व्याहृतिरूप आदित्यांत प्रतिष्ठित होतो. 'महः' या चतुर्थ व्याहृतीच्या ध्यानानें चतुर्थ व्याहृतिरूप अंगी ब्रह्मामध्यें उपासक प्रतिष्ठित होतो. तो याप्रमाणें ब्रह्मभूत होऊन स्वाराज्यास–स्वराड्भावास प्राप्त होतो. मनाच्या पतीला प्राप्त होतो. तसेंच तो वाक्पति म्ह० सर्व वाणींचा पति होतो, चक्षूंचा पति होतो, श्रोत्रांचा पति होतो व सर्व विज्ञानांचा पति होतो. याहूनहि तें अधिक होतें. (तें काय?) आकाश ज्याचें शरीर आहे किंवा आकाशाप्रमाणें ज्याचें शरीर सूक्ष्म आहे तें आकाशशरीर, (पण तें काय?) तर हें प्रकृत ब्रह्म. सत्य म्ह० मूर्तामूर्त–अमिथ्यास्वरूप हाच ज्याचा आत्मा म्ह० स्वभाव आहे, तें हें सत्यात्म आहे. प्राणामध्यें ज्याचें आरमण म्ह० आक्रीडा आहे तें प्राणाराम, किंवा ज्यांत प्राणांचा आराम आहे हें प्राणाराम. ज्याचें मन आनन्दभूत म्ह० सुखकरच आहे तें मनआनन्द. शांति म्ह० उपशम. शांति तेंच समृद्ध, किंवा शांतीनें समृद्ध ब्रह्म उपलब्ध होतें, ह्मणून शांतिसमृद्ध. अमरणधर्मी. हे प्राचीनयोग्य शिष्या, अशा रीतीनें मनोमयत्वादि धर्मांनीं विशिष्ट असलेल्या यथोक्त ब्रह्माची तूं उपासना कर. ही आचार्यवचनरूप उक्ति आदरार्थ आहे. ६

**भाष्यं—स इति व्युत्क्रम्य 'अयं पुरुषः' इत्यनेन संबध्यते । य एषोऽन्तर्हृदये हृदयस्यान्तर्हृदयमिति पुण्डरीकाकारो मांसपिण्डः प्राणायतनोऽनेकनाडीसुषिर ऊर्ध्वनालोऽधोमुखो विशस्यमाने पशौ प्रसिद्ध उपलभ्यते तस्यान्तर्य एष**

**आकाशः प्रसिद्ध एव करकाकाशवत्। तस्मिन्सोऽयं पुरुषः। पुरि शयनात्पूर्णो वा भूरादयो लोका येनेति पुरुषो मनोमयः। मनो विज्ञानम्। मनुतेर्ज्ञानकर्मण-स्तन्मयस्तदुपलभ्यत्वात्। मनुतेऽनेनेति वा मनोऽन्तःकरणं तदभिमानी तन्मय-स्तल्लिङ्गो वा अमृतोऽमरणधर्मा हिरण्मयो ज्योतिर्मयः॥**

**भाष्यार्थ**—'सः' हें पहिलें पद पाठक्रम सोडून 'अयं पुरुषः' या पुढील पदांशीं संबद्ध होतें. 'यः एषः अन्तर्हृदये आकाशः'—जो हा अन्तर्हृदयांत—हृदयामध्यें, हृदय म्हणजे शुभ्रकमलाकार मांसाचा गोळा. तो प्राणाचें आयतन—स्थान आहे, त्याला अनेक नाडीच्छिद्रें आहेत, त्याचें नाल वर व मुख खालीं आहे. तो हृदयसंज्ञक मांसपिंड पशूची हिंसा—आलभन करीत असतांना उपलब्ध होतो. त्या हृदयाच्या आंत जो हा कमं-डलूंतील आकाशासारखा प्रसिद्ध आकाश आहे त्यांत 'सः अयं पुरुषः'—तो हा पुरुष आहे. (पुरुष या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारांनीं संभवते. एक—)=शरीराख्य पुरींत शयन केल्यामुळें—राहिल्यामुळें पुरुष किंवा ज्यानें भूरादि लोकांना भरून सोडलें आहे, पूर्ण केलें आहे तो पुरुष. '**मनोमयः**'—मन म्ह० विज्ञान; कारण 'मन्' हा धातु ज्ञान या अर्थी आहे. पुरुष तन्मय म्ह० विज्ञानमय आहे. कारण ज्ञानाकार परिणत झालेल्या मनांतच तो उपलब्ध होतो. किंवा जीव ज्याच्या योगानें मनन करतो तें मन म्ह० अंतः-करण. त्याचा अभिमानी, म्हणून पुरुष तन्मय अथवा तल्लिंग आहे. ( शास्त्रांत मन सर्व इंद्रियांचें अधिष्ठातृ म्हणून प्रसिद्ध आहे. यास्तव पुरुष मनोलिंग आहे. म्हणजे मन हें त्याचें लिंग आहे. मनाच्या प्रवृत्तीवरून त्याच्या नियामकाचा बोध होतो. म्हणून तो तल्लिंग आहे. )='अमृतः हिरण्मयः'—तसाच तो अमृत म्ह० अमरणधर्मा व हिर-ण्मय म्ह० ज्योतिर्मय आहे.

**भाष्यं—तस्यैवंलक्षणस्य हृदयाकाशे साक्षात्कृतस्य विदुष आत्मभूतस्येंद्र-स्येदृशस्वरूपप्रतिपत्तये मार्गोऽभिधीयते। हृदयादूर्ध्वं प्रवृत्ता सुषुम्ना नाम नाडी योगशास्त्रेषु च प्रसिद्धा। सा चान्तरेण मध्ये प्रसिद्धे तालुके तालुकयोर्गता। यश्चैष तालुकयोर्मध्ये स्तन इवावलम्बते मांसखण्डस्तस्य चान्तरेणेत्येतत्। यत्र च केशान्तः केशानामन्तोऽवसानं मूलं केशान्तो विवर्तते विभागेन वर्तते मूर्ध-प्रदेश इत्यर्थः। तं देशं प्राप्य तत्र विनिःसृता। व्यपोह्य विभज्य विदार्य शीर्षक-पाले शिरःकपाले विनिर्गता या सेन्द्रयोनिरिन्द्रस्य ब्रह्मणो योनिर्मार्गः स्वरूप-प्रतिपत्तिद्वारमित्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—त्या अशा लक्षणाच्या हृदयाकाशांत साक्षात् जाणलेल्या आत्मभूत व इंद्र अशा विद्वानाला अशा प्रकारच्या स्वरूपाची प्राप्ति होण्यासाठीं मार्ग सांगितला

जातो–हृदयापासून सुषुम्नानांवाची नाडी वर प्रवृत्त झाली आहे व ती योगशास्त्रांतहि प्रसिद्ध आहे. 'अन्तरेण तालुके'–ती दोन्ही तालूंच्या मध्यें शिरली आहे. 'यः एषः स्तनः इव अवलंबते'–दोन्ही तालूंच्या मध्यें जो हा स्तनासारखा मांसखंड खालीं लोंबत आहे,–ज्याला व्यवहारांत पडजीभ म्हणतात, त्याच्या आंतून, असा भावार्थ, आणि 'यत्र असौ केशान्तो विवर्तते'–जेथें–ज्या मूर्धप्रदेशीं असा याचा भावार्थ–केंशांचा अन्त–मूळ अगदीं पृथक् होऊन राहिलें आहे त्या प्रदेशास प्राप्त होऊन तेथून ती बाहेर पडली आहे. 'व्यपोह्य शीर्षकपाले'–मस्तकाच्या कपालांना विदीर्ण करून बाहेर निघालेली जी सुषुम्ना 'सा इंद्रयोनिः'–ती इंद्रयोनि आहे. इंद्राची म्ह० ब्रह्माची योनि ह्म० मार्ग, स्वरूपप्राप्तीचें द्वार आहे, असा याचा भावार्थ.

**भाष्यं—तयैवंविद्वान्मनोमयात्मदर्शी मूर्ध्नो विनिष्क्रम्यास्य लोकस्याधिष्ठाता भूरिति व्याहृतिरूपो योऽग्निर्महतो ब्रह्मणोऽङ्गभूतस्तस्मिन्नग्नौ प्रतितिष्ठत्यग्न्यात्मनेमं लोकं व्याप्नोतीत्यर्थः। तथा भुव इति द्वितीयव्याहृत्यात्मनि वायौ। प्रतितिष्ठतीत्यनुवर्तते। सुवरिति तृतीयव्याहृत्यात्मन्यादित्ये। मह इत्यङ्गिनि चतुर्थव्याहृत्यात्मनि ब्रह्मणि प्रतितिष्ठति॥**

**भाष्यार्थ**—असें जाणणारा ह्म० मनोमय आत्म्याची उपासना करणारा त्या सुषुम्ना नाडीनें मस्तकांतून निघून 'भूः इति अग्नौ प्रतितिष्ठति'–या लोकाचा अधिष्ठाता, 'भूः' या व्याहृतिरूप व महत् ब्रह्माचा अंगभूत जो अग्नि त्या अग्नीमध्यें प्रतिष्ठित होतो. अग्निरूपानें या लोकास व्यापतो, असा याचा भावार्थ. तसाच 'भुवः इति वायौ'–'भुवः' या द्वितीय व्याहृतिरूप वायूंत प्रतिष्ठित होतो; अशा रीतीनें पुढील पर्यायांतहि 'प्रतितिष्ठति' या पदाची अनुवृत्ति करावी. 'सुवर्०'–या तृतीय व्याहृतिरूप आदित्यांत आणि 'महः०'–या चतुर्थव्याहृतिरूप अंगी ब्रह्मांत उपासक प्रतिष्ठित होतो.

**भाष्यं—तेष्वात्मभावेन स्थित्वाऽऽप्नोति ब्रह्मभूतः स्वाराज्यं स्वराड्भावं स्वयमेव राजाऽधिपतिर्भवति। अङ्गभूतानां देवानां यथा ब्रह्म। देवाश्च सर्वेऽस्मै बलिमावहन्त्यङ्गभूता यथा ब्रह्मणे। आप्नोति मनसस्पतिम्। सर्वेषां हि मनसां पतिः सर्वात्मकत्वाद्ब्रह्मणः। सर्वैर्हि मनोभिस्तन्मनुते। तदाप्नोत्येवं विद्वान्। किंच वाक्पतिः सर्वासां वाचां पतिर्भवति। तथैव चक्षुष्पतिश्चक्षुषां पतिः। श्रोत्रपतिः श्रोत्राणां पतिः। विज्ञानपतिर्विज्ञानानां च पतिः। सर्वात्मकत्वात्सर्वप्राणिनां करणैस्तद्वान्भवतीत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—त्यांमध्यें आत्मभावानें स्थित होऊन, ब्रह्मभूत होऊन 'स्वाराज्यं आप्नोति'–स्वाराज्यास ह्म० स्वराड्भावास प्राप्त होतो. स्वतःच राजा–अधिपति होतो.

अंगभूत देवांचें (अंगी) ब्रह्म जसें अधिपति आहे त्याप्रमाणें तो अधिपति होतो. सर्व अंगभूत देव जसे ब्रह्माला तसेच त्यालाहि बलि आणून देतात. 'मनसस्पतिं आप्नोति' —मनाच्या पतीला प्राप्त होतो. ब्रह्म सर्वात्मक असल्यामुळें तें सर्वांच्या मनांचें अधिपति आहे. सर्व मनांनींच तें ब्रह्म मनन करतें. असें जाणणारा उपासक त्याला प्राप्त होतो. तसेंच, 'वाक्पतिः०'—तो वाक्पति म्ह० सर्व वाणींचा पति होतो. त्याचप्रमाणें 'चक्षुष्पतिः'—चक्षूंचा पति होतो, 'श्रोत्रपतिः'—श्रोत्रांचा पति होतो व 'विज्ञानपतिः'—सर्व विज्ञानांचा पति होतो. तो सर्वात्मक असल्यामुळें सर्व प्राण्यांच्या इंद्रियांनीं इंद्रियवान् होतो, असा याचा भावार्थ.

**भाष्यं—किंच ततोऽप्यधिकतरमेतद्भवति । किं तत् । उच्यते । आकाशशरीरमाकाशः शरीरमस्याऽऽकाशवद्वा सूक्ष्मं शरीरमस्येत्याकाशशरीरम् । किं तत् । प्रकृतं ब्रह्म । सत्यात्म सत्यं मूर्तामूर्तमवितथं स्वरूपं चाऽऽत्मा स्वभावोऽस्य तदिदं सत्यात्म । प्राणारामं प्राणेष्वाराम आक्रीडा यस्य तत्प्राणारामम् । प्राणानां वाऽऽरामो यस्मिंस्तत्प्राणारामम् । मनआनन्दम् । आनन्दभूतं सुखकृदेव यस्य मनस्तन्मनआनन्दम् । शान्तिसमृद्धं शान्तिरुपशमः, शान्तिश्च तत्समृद्धं च शान्तिसमृद्धम् । शान्त्या वा समृद्धं तदुपलभ्यत इति शान्तिसमृद्धम् । अमृतममरणधर्मि । एतच्चाधिकतरं विशेषणं तत्रैव मनोमय इत्यादौ द्रष्टव्यमिति । एवं मनोमयत्वादिधर्मैर्विशिष्टं यथोक्तं ब्रह्म हे प्राचीनयोग्य, उपास्स्वेत्याचार्यवचनोक्तिरादरार्था ॥ ( इति शीक्षाध्यायभाष्ये षष्ठोऽनुवाकः ॥ )**

**भाष्यार्थ**—फार काय पण त्याहूनहि हें अधिक होतें. तें काय? ह्मणून विचाराल तर सांगतों—'आकाश-शरीरं'—आकाश ज्याचें शरीर आहे किंवा आकाशाप्रमाणें ज्याचें सूक्ष्म शरीर आहे तें आकाश-शरीर. पण तें काय ? तर हें प्रकृत 'ब्रह्म.' 'सत्यात्म'—सत्य म्ह० मूर्तामूर्त व अमिथ्या स्वरूप हाच ज्याचा आत्मा म्ह० स्वभाव आहे, तें हें सत्यात्म आहे. 'प्राणारामम्'—प्राणामध्यें ज्याचें आरमण म्ह० आक्रीडा आहे तें प्राणाराम, किंवा ज्यामध्यें प्राणांचा आराम आहे तें प्राणाराम. 'मनआनन्दम्' —आनन्दभूत म्ह० सुखकरच मन आहे ज्याचें तें मन-आनन्द. 'शान्तिसमृद्धम्'— शांति म्ह० उपशम, शांति तेंच समृद्ध; किंवा शांतीनें समृद्ध असें तें ब्रह्म उपलब्ध होतें, म्हणून शांतिसमृद्ध. 'अमृतम्'—अमरणधर्मी. हें सर्वांहून अधिक असलेलें विशेषण त्याच मनोमय इत्यादिकांमध्यें पहावें. हे 'प्राचीनयोग्य' शिष्या, 'इति उपास्स्व'—अशा रीतीनें मनोमयत्वादि धर्मांनीं विशिष्ट असलेल्या यथोक्त ब्रह्माची तूं उपासना कर. ही आचार्यवचनाची उक्ति आदरार्थ आहे. (इति षष्ठोऽनुवाकः) ६

**भाष्यं—यदेतद्व्याहृत्यात्मकं ब्रह्मोपास्यमुक्तं तस्यैवेदानीं पृथिव्यादिपाङ्क्तस्वरूपेणोपासनमुच्यते । पञ्चसंख्यायोगात्पङ्क्तिच्छन्दःसंपत्तिः । ततः पाङ्क्तत्वं सर्वस्य । पाङ्क्तश्च यज्ञः । "पञ्चपदा पङ्क्तिः । पाङ्क्तो यज्ञः" इति श्रुतेः । तेन यत्सर्वं लोकाद्यात्मान्तं च पाङ्क्तं परिकल्पयंति यज्ञमेव तत्परिकल्पयति । तेन यज्ञेन परिकल्पितेन पाङ्क्तात्मकं प्रजापतिमभिसंपद्यते । तत्कथं पाङ्क्तमिदं सर्वमित्यत आह—**

**भाष्यार्थ**—जें हें व्याहृत्यात्मक ब्रह्म उपास्य म्हणून सांगितलें आहे त्याचेंच आतां पृथिव्यादि पांक्तरूपानें उपासन सांगितलें जात आहे. पांच या संख्येच्या संबंधानें पंक्तिछंदाची संपत्ति त्यांत आहे. त्यामुळें पृथिव्यादि पुढें सांगितलेल्या सर्वांला पाङ्क्तत्व आहे आणि यज्ञ पांक्त आहे. कारण "पंक्ति पंचपदा आहे. यज्ञ पांक्त आहे" अशी श्रुति आहे. त्यामुळें हा विधि लोकापासून आत्म्यापर्यंत हें सर्व पांक्त आहे, अशी जी कल्पना करवितो, ती तो सर्व यज्ञाचीच परिकल्पना करवितो. त्या परिकल्पित यज्ञानें उपासक पाङ्क्तरूप प्रजापतीला प्राप्त होतो. यास्तव हें सर्व पांक्त कसें, तेंच सांगतात—

**श्रुतिः—पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशाः । अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणि । आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मा इत्यधिभूतम् ॥**

**अर्थ**—पृथिवी, अन्तरिक्ष, द्यौः, दिशा व अवान्तरदिशा हें लोकपांक्त; अग्नि, वायु, आदित्य, चन्द्रमा व नक्षत्रें, हें देवतापांक्त; आप, ओषधि, वनस्पति, आकाश व आत्मा हें भूतपांक्त; असें हें अधिभूत आहे.

**भाष्यं—पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशा इति लोकपाङ्क्तं । अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणीति देवतापाङ्क्तम् । आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मेति भूतपाङ्क्तम् । आत्मेति विराड् भूताधिकारात् । इत्यधिभूतमित्यधिलोकाधिदैवतपाङ्क्तद्वयोपलक्षणार्थम् । लोकदेवतापाङ्क्तयोश्चाभिहितत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—पृथिवी, अन्तरिक्ष, द्यौः, दिशा व अवान्तर दिशा हें लोकपांक्त; अग्नि, वायु, आदित्य, चन्द्रमा, व नक्षत्रें हें देवतापांक्त; आप, ओषधि, वनस्पति, आकाश व आत्मा हें भूतपांक्त; येथें आत्मा म्ह० विराट्. कारण हा भूताधिकार–भूतप्रकरण आहे. असें हें अधिभूत आहे. 'इत्यधिभूतं' हें वाक्य अधिलोक व अधिदैव या दोन पांक्तांच्या उपलक्षणार्थ आहे. कारण येथें लोकपांक्त व देवतापांक्त या दोन्हींचें कथन केलें आहे.

**श्रुतिः—अथाध्यात्मम् । प्राणो व्यानोऽपान उदानः समानः । चक्षुः श्रोत्रं मनो वाक्त्वक् । चर्म माꣳसꣳस्नावास्थि मज्जा । एतदधिविधाय ऋषिरवोचत् । पाङ्क्तं वा इदꣳसर्वम् । पाङ्क्तेनैव पाङ्क्तꣳस्पृणोतीति (१)**

**अर्थ**—आतां यापुढें अध्यात्म पांक्तत्रय सांगितलें जातें. त्यांतील प्राणादि हें वायु-पांक्त, चक्षुःश्रोत्रादि हें इंद्रियपांक्त, व चर्मादि हें धातुपांक्त आहे. अशी परिकल्पना करून ऋषि म्ह० वेद किंवा या दर्शनानें संपन्न असलेला कोणी ऋषि म्हणाला. काय ? 'हें सर्व पांक्त आहे. या आध्यात्मिक पांक्तानेंच बाह्य पांक्ताला पूर्ण करतो.' असें म्हणाला.

**भाष्यं—अथानन्तरमध्यात्मं पाङ्क्तत्रयमुच्यते--प्राणादि वायुपाङ्क्तम् । चक्षुरादीन्द्रियपाङ्क्तम् । चर्मादि धातुपाङ्क्तम् । एतावद्धीदं सर्वमध्यात्मम्, बाह्यं च पाङ्क्तमेवेत्येतदेवमधिविधाय परिकल्प्यर्षिर्वेद एतद्दर्शनसंपन्नो वा कश्चिदृषिरवोचदुक्तवान् । किमित्याह--पाङ्क्तं वा इदं सर्वं पाङ्क्तेनैवाऽऽध्यात्मिकेन संख्यासामान्यात्पाङ्क्तं बाह्यं स्पृणोति बलयति पूरयति । एकात्मतयोपलभ्यत इत्येतत् । एवं पाङ्क्तमिदं सर्वमिति यो वेद स प्राजापत्यात्मैव भवतीत्यर्थः ॥ इति सप्तमोनुवाकः ।**

**भाष्यार्थ**—आतां यापुढें अध्यात्म पांक्तत्रय सांगितलें जातें. त्यांतील प्राणादि हें वायुपांक्त, चक्षुरादि हें इंद्रियपांक्त, व चर्मादि हें धातुपांक्त आहे. हें सर्व अध्यात्म एवढेंच आहे व बाह्य पांक्तच आहे, असा भावार्थ. अशी परिकल्पना करून ऋषि म्ह० वेद किंवा या दर्शनानें संपन्न असलेला कोणी ऋषि म्हणाला. काय म्हणाला, तें सांगतात. हें सर्व पांक्त आहे. या आध्यात्मिक पांक्तानेंच बाह्य पांक्ताला पूर्ण करतो. कारण पांच ही संख्या दोन्ही ठिकाणीं समान आहे. म्ह० बाह्य व अध्यात्म यांना एकरूपानें पाहतो; आध्यात्मिक पांक्तत्रय बाह्य पांक्तरूपानें पाहतो, असा भावार्थ. याप्रमाणें हें सर्व पांक्त आहे, असें जो जाणतो तो प्राजापत्यात्माच होतो, असा ह्याचा अर्थ. ( इति सप्तमोऽनुवाकः )

**भाष्यं—व्याहृत्यात्मनो ब्रह्मण उपासनमुक्तम् । अनन्तरं च पाङ्क्तस्वरूपेण तस्यैवोपासनमुक्तम् । इदानीं सर्वोपासनाङ्गभूतस्योंकारस्योपासनं विधित्स्यते । परापरब्रह्मदृष्ट्या उपास्यमान ओंकारः शब्दमात्रोऽपि परापरब्रह्मप्राप्तिसाधनं भवति । स ह्यालम्बनं ब्रह्मणः परस्यापरस्य च । प्रतिमेव विष्णोः । "एतेनैवाऽऽयतनेनैकतरमन्वेति" इति श्रुतेः ॥**

**भाष्यार्थ**—प्रथम व्याहृत्यात्मक ब्रह्माची उपासना सांगितली. त्यानंतर पांक्तस्वरूपानें त्याचेंच उपासन सांगितलें. आतां सर्व उपासनांच्या अंगभूत ओंकाराच्या उपासनेचें विधान केलें जातें. ( वेदवेत्त्यांच्या सर्व क्रिया ओंकार उच्चारूनच प्रवृत्त होतात. म्हणून ओंकार त्यांच्याकडून श्रद्धेनें ग्रहण केला गेलेला असल्यामुळें त्याच्या परिहारानें—त्याला सोडून उपदेशिलेलें ब्रह्म बुद्धीवर आरूढ होणार नाहीं. म्हणून ओंकाराचा स्वीकार करूनच उपासनेचें विधान केलें जातें, असा याचा भावार्थ.—" अह्योपण शब्द-

मात्र ओंकार अचेतन–जड असल्यामुळें त्याला ‘ यानें माझी उपासना केली आहे ’ असें ज्ञान नसतें. तेव्हां तशा ज्ञानाच्या अभावीं त्याला फलदातृत्व कसें असेल ” अशी आशंका घेऊन ‘ **परापर०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–)=कारण परब्रह्म व अपर ब्रह्म यांच्या दृष्टीनें उपासना केला जाणारा ओंकार शब्दमात्र जरी असला तरी पर व अपर ब्रह्माच्या प्राप्तीचें साधन होतो. कारण प्रतिमा हें जसें विष्णूचें आलंबन आहे त्याचप्रमाणें ओंकार पर व अपर ब्रह्माचें आलंबन आहे. कारण “याच प्रणवरूप आलंबनानें उपासक अपर व पर यांतील एका ब्रह्माला प्राप्त होतो,” अशी श्रुति आहे. प्र. भा.५.२. सु. उ. पृ. ११९ (प्रतिमादि पूजेप्रमाणें सर्वत्र ईश्वरच फलदाता आहे, असा भावार्थ.)

**श्रुतिः—ओमिति ब्रह्म । ओमितीदꣳ सर्वम् ॥**

**अर्थ**—‘ ओं ’ हें शब्दस्वरूप ब्रह्म आहे. कारण ‘ ओं’च हें सर्व आहे.

**भाष्यं—ओमिति । इतिशब्दः स्वरूपपरिच्छेदार्थः । ओमित्येतच्छब्दरूपं ब्रह्मेति मनसा धारयेदुपासीत । यत ओमितीदं सर्वं हि शब्दरूपमोंकारेण व्याप्तम् । “ तद्यथा शङ्कुना ” इति श्रुत्यन्तरात् । अभिधानतन्त्रं ह्यभिधेयमित्यत इदं सर्वमोंकार इत्युच्यते ॥**

**भाष्यार्थ**—‘ ओमिति ’ येथील ‘ इति ’ हा शब्द स्वरूपाचा परिच्छेद करण्यासाठीं आहे. ओं हें शब्दस्वरूप ब्रह्म आहे, असें मनानें धारण करावें म्ह० उपासना करावी. [ “ पण ओंकारामध्यें ब्रह्मत्वाचा अध्यास करण्यास सादृश्य कोणतें ? ” याचें उत्तर ‘ओमितीदं०’ या श्रुतीनें देतात–]=कारण हें सर्व ‘ ओं ’ च आहे. (सर्वाधारत्व हें ओंकाराचें ब्रह्माशीं सादृश्य आहे, असा भावार्थ.)=सर्व शब्दरूप ओंकारानें व्याप्त आहे. ‘ ज्याप्रमाणें देंठानें सर्व पान व्याप्त असतें ’छां. भा. २.२३.३सु.उ.पृ.३४५अशी याविषयीं दुसरी श्रुति आहे. सर्व अभिधेय म्ह० वाच्य अभिधानतंत्र असतें. (अर्थ शब्दाच्या अधीन असतो, असा न्याय आहे.)=यास्तव हें सर्व ओंकारच आहे, असें म्हटलें जातें.

**श्रुतिः—ओमित्येतदनुकृति ह स्म वा अप्यो श्रावयेत्याश्रावयन्ति । ओमिति सामानि गायन्ति । ओꣳ शोमिति शस्त्राणि शꣳसन्ति । ओमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति । ओमिति ब्रह्मा प्रसौति । ओमित्यग्निहोत्रमनुजानाति । ओमिति ब्राह्मणः प्रवक्ष्यन्नाह । ब्रह्मोपाप्नवानीति । ब्रह्मैवोपाप्नोति ( १ ) ॥**

**अर्थ**—‘ ओं ’ ही अनुकृति म्ह० अनुकरण आहे, हें प्रसिद्ध आहे. ‘ ओ श्रावय ’ असें प्रैषपूर्वक प्रतिश्रवण करवितात. ‘ ओं ’ असें म्हणून सामें गातात. यज्ञांत शस्त्रांचें शंसन करणारेहि ‘ ओं ’ असें म्हणूनच शस्त्रें म्हणतात. तसाच अध्वर्यु ‘ ओं ’ असें म्हणून प्रतिगरास उद्देशून प्रतिगृणन करतो. म्ह० प्रतिशंसन उच्चारतो. ‘ ओं ’ असें

म्हणून ब्रह्मा अनुज्ञा देतो. प्रैषपूर्वक ऐकवितो. 'ओं' असें म्हणून अग्निहोत्रास अनुज्ञा देतो. प्रवचन करणारा–अध्ययन करणारा ब्राह्मण 'ओं' असेंच म्हणतो. ब्रह्म म्ह० वेद त्याला मीं प्राप्त व्हावें, त्याचें मी ग्रहण करीन, असें म्हणून वेद ग्रहण करतोच. किंवा ब्रह्म म्ह० परमात्मा. त्याला मी प्राप्त होतों, असें म्हणून आत्म्याला ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवीत असतां 'ओं' असें म्हणतो व तो ब्रह्माला प्राप्त होतोच. ८

**भाष्यं—ओंकारस्तुत्यर्थमुत्तरो ग्रन्थः। उपास्यत्वात्तस्य। ओमित्येतदनुकृतिरनुकरणम्। करोमि यास्यामि चेति कृतमुक्तमोमित्यनुकरोत्यन्यः। अत ओंकारोऽनुकृतिः। ह स्म वा इति प्रसिद्धावद्योतकाः। प्रसिद्धं ओंकारस्यानुकृतित्वम्। अपि च "ओ श्रावय" इति प्रैषपूर्वकमाश्रावयन्ति प्रतिश्रावयन्ति। तथोमिति सामानि गायन्ति सामगाः। ओमिति शस्त्राणि शंसन्ति शस्त्रशंसितारोऽपि। तथोमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति। ओमिति ब्रह्मा प्रसौत्यनुजानाति प्रैषपूर्वकमाश्रावयति। ओमित्यग्निहोत्रमनुजानाति। जुहोमीत्युक्त ओमित्येवानुज्ञां प्रयच्छति। ओमित्येव ब्राह्मणः प्रवक्ष्यन्प्रवचनं करिष्यन्नध्येष्यमाण ओमित्येवाह। ओमिति प्रतिपद्यतेऽध्येतुमित्यर्थः। ब्रह्म वेदमुपाप्नवानीति प्राप्नुयां ग्रहीष्यामीति। उपाप्नोत्येव ब्रह्म॥**

**भाष्यार्थ**—ओंकाराच्या स्तुतीकरितां यापुढील ग्रंथ आहे. कारण त्याला उपास्यत्व आहे. म्ह० तो उपासनेचा विषय आहे. 'ओं' हें अनुकृति म्ह० अनुकरण आहे. मी करतों व मी जाईन असें जें केलेलें किंवा म्हटलेलें त्याचें दुसरा 'ओं' असें अनुकरण करतो. म्हणून ओंकार अनुकृति आहे. 'ह स्म वा' हे तीन निपात त्याची प्रसिद्धि व्यक्त करणारे आहेत. ओंकाराचें अनुकृतित्व प्रसिद्ध आहे. तसेंच 'ओ श्रावय' असें प्रैषपूर्वक प्रतिश्रवण करवितात. त्याचप्रमाणें सामगान करणारे 'ओं' असें म्हणून सामें गातात. यज्ञांत शस्त्रांचें शंसन करणारेहि 'ओं' असें म्हणूनच शस्त्रें म्हणतात. शस्त्रें म्हणजे गीतिरहित ऋचा. तसाच अध्वर्यु 'ओं' असें म्हणून प्रतिगरास उद्देशून प्रतिगृणन करतो. म्ह० प्रतिशंसन उच्चारतो. 'ओं' असें म्हणून ब्रह्मा अनुज्ञा देतो. प्रैषपूर्वक ऐकवितो. 'ओं' असें म्हणून अग्निहोत्रास अनुज्ञा देतो. म्ह० मी हवन करतों असें यजमानानें म्हटलें असतां 'ओं' असें म्हणून अनुज्ञा देतो. प्रवचन करणारा, अध्ययन करणारा ब्राह्मण 'ओं' असेंच म्हणतो. 'ओं' असें म्हणून अध्ययनास आरंभ करतो, असा याचा इत्यर्थ. ब्रह्म म्ह० वेद. त्याला मीं प्राप्त व्हावें, त्याचें मी ग्रहण करीन, असें म्हणून वेदग्रहण करतोच.

**भाष्यं—अथवा ब्रह्म परमात्मा तमुपाप्रवानीत्यात्मानं प्रवक्ष्यन्प्रापयिष्यन्नोमित्येवाऽऽह । स च तेनोंकारेण ब्रह्म प्राप्नोत्येव । ओंकारपूर्वं प्रवृत्तानां क्रियाणां फलवत्त्वं यस्मात्तस्मादोंकारं ब्रह्मेत्युपासीतेति वाक्यार्थः ॥**

**भाष्यार्थ**—किंवा ब्रह्म म्ह० परमात्मा. त्याला मी प्राप्त होतों, असें म्हणून आत्म्याला ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवीत असतां 'ओं' असेंच म्हणतो; आणि तो त्या ओंकारानें ब्रह्माला प्राप्त होतोच. ज्या अर्थी ओंकारपूर्वक आरंभिलेल्या क्रियांना फलवत्त्व असतें म्ह० त्याच क्रिया सफल होतात त्या अर्थी ओंकाराची ब्रह्मरूपानें उपासना करावी. असा वाक्यार्थ. (येथें 'प्रवक्ष्यन्' याचे दोन अर्थ केले आहेत. त्यांतील पहिल्या म्ह० प्रवचन करणारा या अर्थी तें 'वच्' या धातूचें व दुसऱ्या म्ह० 'ब्रह्मापाशीं नेऊन पोंचविणें' या अर्थी 'वह्' या धातूचें रूप आहे. ( इति अष्टमोऽनुवाकः ॥ )

**श्रुतिः—ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च । तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च । शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च । अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च । मानुषं च स्वाध्यायप्रवचने च । प्रजा च स्वाध्यायप्रवचने च । प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च । प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च । सत्यमिति सत्यवचा राथीतरः । तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः । स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः । तद्धि तपस्तद्धि तपः ॥ ९**

**अर्थ**—ऋत–सत्य, स्वाध्याय म्ह० अध्ययन व प्रवचन म्ह० अध्यापन किंवा ब्रह्मयज्ञ. या ऋतादिकांचें अनुष्ठान करावें, असा वाक्यशेष लावावा. सत्य भाषण. तप म्ह० कृच्छ्रादिक. दम म्ह० बाह्य इंद्रियांचा उपशम. शम म्ह० अंतःकरणाचा उपशम. आधानास योग्य असलेले अग्नी, हवन करण्यास उचित असलेलें अग्निहोत्र; पूज्य अतिथि; मानुष म्हणजे लौकिक विवाहादि उत्तम व्यवहार; तें मानुष जसें प्राप्त असेल तसेंच त्याचें अनुष्ठान करावें. प्रजा उत्पन्न करावी. प्रजन म्ह० ऋतुकालीं भार्यागमन; प्रजाति म्हणजे पुत्रोत्पत्ति. या सर्वांबरोबर स्वाध्यायप्रवचन करावें. सत्याचेंच अनुष्ठान करावें; असें ज्याचें वचन सत्यच आहे तो किंवा 'सत्यवचाः' हें ज्याचें नांव आहे तो राथीतर आचार्य मानतो. तपच करावें, असें 'तपोनित्य'–तपामध्यें नित्य तत्पर असलेला तपःपरायण पौरुशिष्टि आचार्य मानतो. स्वाध्याय व प्रवचन यांचेंच अनुष्ठान करावें, असें 'नाक-' नांवाचा व मुद्गलाचें अपत्य–मौद्गल्य आचार्य मानतो. तेंच तप आहे; तेंच तप आहे. ९.

**भाष्यं—विज्ञानादेवाऽऽप्नोति स्वाराज्यमित्युक्तत्वाच्छ्रौतस्मार्तानां कर्मणामानर्थक्यं प्राप्तमित्यतस्तन्मा प्रापदिति कर्मणां पुरुषार्थं प्रति साधनत्वप्रदर्शनार्थ-**

**मिहोपन्यासः । ऋतमिति व्याख्यातम् । स्वाध्यायोऽध्ययनम् । प्रवचनमध्यापनं ब्रह्मयज्ञो वा । एतान्यृतादीन्यनुष्ठेयानीति वाक्यशेषः । सत्यं च सत्यवचनं यथाव्याख्यातार्थं वा । तपः कृच्छ्रादि । दमो बाह्यकरणोपशमः । शमोऽन्तःकरणोपशमः । अग्नय आधातव्याः । अग्निहोत्रं च होतव्यम् । अतिथयश्च पूज्याः । मानुषमिति लौकिकः संव्यवहारः । तच्च यथाप्राप्तमनुष्ठेयम् । प्रजा चोत्पाद्या । प्रजनश्च प्रजननमृतौ भार्यागमनमित्यर्थः । प्रजातिः पौत्रोत्पत्तिः पुत्रो निवेशयितव्य इत्येतत् ॥**

**भाष्यार्थ**—विज्ञानामुळेंच स्वाराज्याला प्राप्त होतो, असें मागील सहाव्या अनुवाकांत सांगितलेलें असल्यामुळें श्रौत-स्मार्त कर्मांचें आनर्थक्य प्राप्त झालें. म्ह० तीं कर्में व्यर्थ आहेत, असें ठरण्याचा प्रसंग आला. पण तीं तशीं व्यर्थ ठरूं नयेत म्हणून कर्में पुरुषार्थाचीं साधनें आहेत, असें दाखविण्यासाठीं येथें त्यांचा उपन्यास केला आहे. [ अपर विद्येच्या सहकारित्वामुळें तिच्या फलानेंच फलवत्त्व सिद्ध होण्यासाठीं पुढील अनुवाकाचा आरंभ केला जातो, असा भावार्थ. ]=ऋत म्हणजे काय तें वर सांगितलें आहे. स्वाध्याय म्ह० अध्ययन व प्रवचन म्ह० अध्यापन किंवा ब्रह्मयज्ञ. या ऋतादिकांचें अनुष्ठान करावें, असा वाक्यशेष लावावा. म्ह० एवढे शब्द वाक्यपूर्तीकरितां अधिक जोडावे. सत्य म्ह० सत्य भाषण किंवा वर जसें व्याख्यान केलें आहे, तसा त्याचा अर्थ समजावा. तप म्ह० कृच्छ्रादिक. दम म्ह० बाह्य इंद्रियांचा उपशम. शम म्ह० अन्तःकरणाचा उपशम. आधानास योग्य असलेले अग्नी; हवन करण्यास उचित असलेलें अग्निहोत्र; पूज्य अतिथी; मानुष म्हणजे लौकिक विवाहादि उत्तम व्यवहार. तें मानुष जसें प्राप्त असेल तसेंच त्याचें अनुष्ठान करावें. प्रजा उत्पन्न करावी; प्रजन म्ह० प्रजनन, ऋतुकालीं भार्यागमन; प्रजाति म्ह० पौत्रोत्पत्ति. पुत्राचें निवेशन करावें, असा याचा भावार्थ. [त्याला विद्या व शील यांनीं संपन्न करून गृहस्थपदीं स्थापावें, असा भावार्थ. पुनः पुनः स्वाध्यायप्रवचनांचें ग्रहण करण्याचें तात्पर्य '**सर्वैरेतैः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—सर्वैरेतैः कर्मभिर्युक्तस्यापि स्वाध्यायप्रवचने यत्नतोऽनुष्ठेये इत्येवमर्थं सर्वेण सह स्वाध्यायप्रवचनग्रहणम् । स्वाध्यायाधीनं ह्यर्थज्ञानम् । अर्थज्ञानायत्तं च परं श्रेयः प्रवचनं च तदविस्मरणार्थं धर्मप्रवृद्ध्यर्थं च । अतः स्वाध्यायप्रवचनयोरादरः कार्यः ॥**

**भाष्यार्थ**—या सर्व कर्मांनीं युक्त असलेल्या पुरुषालाहि स्वाध्याय व प्रवचन यांचें यत्नपूर्वक अनुष्ठान करणें उचित आहे, असें सांगण्यासाठीं वरील ऋतादि प्रत्येक साधनाबरोबर स्वाध्याय व प्रवचन यांचें ग्रहण केलें आहे. ( 'पण तीं यत्नतः अनुष्ठेय कां आहेत?'

'स्वाध्यायाधीनं०' इत्यादि भाष्यानें उत्तर–)=कारण अर्थज्ञान स्वाध्यायाच्या अधीन असतें व परम श्रेय अर्थज्ञानाच्या अधीन असतें; आणि प्रवचन त्याचें विस्मरण होऊं नये व धर्माची अतिशय वृद्धि व्हावी, यांसाठीं आहे. यास्तव स्वाध्याय व प्रवचन यांचा आदर करावा. ( तीन ऋषींच्या मतभेदाचा उपन्यास करून स्वाध्याय-प्रवचना-विषयींचा आदरच 'सत्यं०' इत्यादि भाष्यानें विशद करितात—)

**भाष्यं—सत्यमिति सत्यमेवानुष्ठातव्यमिति सत्यवचाः सत्यमेव वचो यस्य सोऽयं सत्यवचा नाम वा तस्य । राथीतरो रथीतरस्य गोत्रो राथीतराचार्यो मन्यते । तप इति तप एव कर्तव्यमिति तपोनित्यस्तपसि नित्यस्तपःपरस्तपोनित्य इति वा नाम । पौरुशिष्टिः पुरुशिष्टस्यापत्यं पौरुशिष्टिराचार्यो मन्यते । स्वाध्याय-प्रवचने एवानुष्ठेये इति नाको नामतो मुद्गलस्यापत्यं मौद्गल्य आचार्यो मन्यते । तद्धि तपस्तद्धि तपः । हि यस्मात्स्वाध्यायप्रवचने एव तपस्तस्मात्ते एवानुष्ठेये इति । उक्तानामपि सत्यतपःस्वाध्यायप्रवचनानां पुनर्ग्रहणमादरार्थम् ॥ ९॥**

**भाष्यार्थ**—'सत्यमिति' म्ह० सत्याचेंच अनुष्ठान करावें असें 'सत्यवचाः'—सत्य हेंच ज्याचें वचन आहे तो किंवा 'सत्यवचाः' हें ज्याचें नांव आहे तो राथीतर आचार्य मानतो. रथीतराचा जो गोत्र तो राथीतर. गोत्र म्ह० पौत्रापासून पुढील वंश. अर्थात् रथीतर वंशांतील राथीतर आचार्य सत्याचेंच अनुष्ठान करावें, असें समजतो. तपच करावें, असें 'तपोनित्यः' म्ह० तपामध्यें नित्य असलेला तपःपरायण किंवा 'तपोनित्य' या नांवाचा पुरुशिष्टीचें अपत्य—पौरुशिष्टि आचार्य मानतो. स्वाध्याय व प्रवचन यांचेंच अनुष्ठान करावें, असें 'नाक-'नांवाचा मुद्गलाचें अपत्य—मौद्गल्य आचार्य मानतो. तेंच तप आहे; तेंच तप आहे म्ह० ज्या अर्थी स्वाध्याय व प्रवचन हेंच तप आहे त्या अर्थी त्यांचेंच अनुष्ठान करावें. पूर्वी एकदा सांगितलेल्याहि सत्य, तप, स्वाध्याय व प्रवचन यांचें पुनः ग्रहण आदरार्थ केलें आहे. ( मुमुक्षूनें त्यांचा अतिशय आदर करावा, असा भावार्थ.) इति शीक्षाध्याये नवमोऽनुवाकः ॥ ९

**श्रुतिः—अहं वृक्षस्य रेरिवा । कीर्तिः पृष्ठं गिरेरिव । ऊर्ध्वपवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि । द्रविणꣳसवर्चसम् । सुमेधा अमृतोक्षितः । इति त्रिशङ्कोर्वेदा-नुवचनम् ॥ ( १० )**

**अर्थ**—मी वृक्षाचा—उच्छेदरूप संसारवृक्षाचा अन्तर्यामिरूपानें प्रेरयिता—प्रेरणा कर-णारा आहें. माझी कीर्ति पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें उंच आहे. मी ऊर्ध्वपवित्र आहें. अन्न-वान् सूर्यामध्यें श्रुति-स्मृतिप्रसिद्ध विशुद्ध अमृत जसें आहे तसेंच तें मजमध्यें आहे. मी विशुद्ध अमृत आहें. तेंच अमृत आत्मतत्त्व मी दीप्तियुक्त धन आहें. मी 'सुमेधाः'

—सर्वज्ञरूप मेधावान् आहें. अमरधर्मा व अव्यय आहें. किंवा 'अमृतोक्षितः'—अमृतानें सिक्त आहें. हें त्रिशंकु ऋषीचें वेदानुवचन आहे. १०

**भाष्यं—अहं वृक्षस्य रेरिवेति स्वाध्यायार्थो मन्त्राम्नायः। स्वाध्यायश्च विद्योत्पत्तये। प्रकरणात्। विद्यार्थं हीदं प्रकरणम्। न चान्यार्थत्वमवगम्यते। स्वाध्यायेन च विशुद्धसत्त्वस्य विद्योत्पत्तिरवकल्प्यते॥**

**भाष्यार्थ**—'अहं वृक्षस्य रेरिवा०' हा स्वाध्यायार्थ—जपासाठीं मन्त्राम्नाय आहे. स्वाध्याय विद्योत्पत्तीकरितां आहे. कारण हें प्रकरण विद्येचें आहे. हें प्रकरण विद्येकरितां आहे, हें प्रसिद्ध आहे. तें दुसऱ्या कशाकरितां आहे, असें अवगत होत नाहीं. [कारण त्याचा कर्मादिकांत विनियोग करणारें श्रुत्यादिप्रमाण उपलब्ध होत नाहीं. 'अक्षितमसि०' इत्यादिकांप्रमाणें त्याला उपासनाविधिशेषत्व आहे, असेंहि सांगतां येत नाहीं. कारण ज्ञानसाधन कर्मविधीचा उपक्रम झाला आहे.)=आणि स्वाध्यायानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे त्याच्या ठिकाणीं विद्येची उत्पत्ति होऊं शकते.

**भाष्यं—अहं वृक्षस्योच्छेदात्मकस्य संसारवृक्षस्य रेरिवा प्रेरयिताऽन्तर्याम्यात्मना। कीर्तिः ख्यातिर्गिरेः पृष्ठमिवोच्छ्रिता मम। ऊर्ध्वपवित्र ऊर्ध्वकारणं पवित्रं पावनं ज्ञानप्रकाश्यं पवित्रं परमं ब्रह्म यस्य सर्वात्मनो मम सोऽहमूर्ध्वपवित्रः। वाजिनीव वाजवतीव। वाजमन्नं तद्वति सवितरीत्यर्थः। यथा सवितर्यमृतमात्मतत्त्वं विशुद्धं प्रसिद्धं श्रुतिस्मृतिशतेभ्य एवं स्वमृतं शोभनं विशुद्धमात्मतत्त्वमस्मि भवामि। द्रविणं धनं सवर्चसं दीप्तिमत्तदेवाऽऽत्मतत्त्वमस्मीत्यनुवर्तते॥**

**भाष्यार्थ**—'अहं वृक्षस्य'—मी वृक्षाचा म्ह० उच्छेदरूप संसारवृक्षाचा 'रेरिवा' —अन्तर्यामिरूपानें प्रेरयिता—प्रेरणा करणारा आहें. माझी कीर्ति—ख्याति 'गिरेः इव'— पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें उंच आहे. मी 'ऊर्ध्वपवित्र' आहें. ज्या मज सर्वात्म्याचें पवित्र— पावन—ज्ञानप्रकाश्य ऊर्ध्वकारण पवित्र परम ब्रह्म आहें तो मी ऊर्ध्वपवित्र होय. 'वाजिनि इव'—वाज म्ह० अन्न, त्यानें युक्त असलेल्या वाजवानामध्यें—सूर्यामध्यें असा भावार्थ; ज्या प्रमाणें शेंकडों श्रुति-स्मृतींवरून प्रसिद्ध असलेलें विशुद्ध, अमृत, आत्मतत्त्व सवित्यामध्यें आहे त्याप्रमाणें मीहि 'स्वमृतं'—शोभन विशुद्ध आत्मतत्त्व आहें. तेंच आत्मतत्त्व मी दीप्तियुक्त धन आहें, अशी 'अस्मि' या क्रियापदाची अनुवृत्ति होते.

**भाष्यं—ब्रह्मज्ञानं वाऽऽत्मतत्त्वप्रकाशकत्वात्सवर्चसम्। द्रविणमिव द्रविणं मोक्षसुखहेतुत्वात्। अस्मिन्पक्षे प्राप्तं मयेत्यध्याहारः कर्तव्यः। सुमेधाः शोभना**

**मेधा सर्वज्ञलक्षणा यस्य मम सोऽहं सुमेधाः । संसारस्थित्युत्पत्त्युपसंहारकौशल-योगात्सुमेधस्त्वम् । अत एवामृतोऽमरणधर्माऽक्षितोऽक्षीणोऽव्ययः ॥**

**भाष्यार्थ**—अथवा ब्रह्मज्ञान आत्मतत्त्वप्रकाशक असल्यामुळें 'सवर्चस'—दीप्तियुक्त आहे.तें जणुं काय धनासारखें आहे. कारण तें मोक्षसुखाचें निमित्त आहे.पण या दुसऱ्या पक्षीं वरील 'अस्मि' या पदाची अनुवृत्ति न करतां तें धनासारखें दीप्तियुक्त आत्मज्ञान मला प्राप्त झालें आहे, असा अध्याहार करावा. 'सुमेधाः'—शोभना सर्वज्ञलक्षणा मेधा ज्याची आहे तो मी 'सुमेधाः' आहें. संसारस्थिति, उत्पत्ति व संहार यांचें कौशल असल्यामुळें मला सुमेधस्त्व आहे. म्हणूनच मी 'अमृतः' म्ह० अमरणधर्मा व 'अक्षितः' म्ह० अक्षीण, अव्यय आहें.

**भाष्यं—उक्षितो वाऽमृतेन वोक्षितः सिक्तः । "अमृतोक्षितोऽहम्" इत्यादि ब्राह्मणम् । इत्येवं त्रिशङ्कोर्ऋषेर्ब्रह्मभूतस्य ब्रह्मविदो वेदानुवचनं वेदो वेदनमात्मैकत्वविज्ञानं तस्य प्राप्तिमनु वचनं वेदानुवचनम् । आत्मनः कृतकृत्यताख्यापनार्थं वामदेववत्त्रिशङ्कुनाऽऽर्षेण दर्शनेन दृष्टो मन्त्राम्नाय आत्मविद्याप्रकाशक इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—किंवा 'उक्षितः' असें पद तोडावें. अर्थात् 'किंवा मी अमृतानें 'उक्षित' म्ह० सिक्त—सिंचला गेलेला—आहें.' कारण 'अमृतोक्षितोऽहम्' इत्यादि ब्राह्मण आहे. असें हें त्रिशंकु-ऋषीचें—ब्रह्मभूत ब्रह्मवेत्त्या मुनीचें—वेदानुवचन आहे. वेद म्ह० वेदन. आत्म्याचें एकत्वविज्ञान त्याच्या प्राप्तीनंतरचें जें वचन, तें वेदानुवचन. आपली कृतकृत्यता प्रकट करण्यासाठीं वामदेवाप्रमाणें(ऐ.भा.४सु.उ.पृ.२७९)त्रिशंकूनें आर्ष—दिव्य दर्शनानें पाहिलेला हा मन्त्राम्नाय आत्मविद्याप्रकाशक आहे, असा याचा भावार्थ.

**भाष्यं—अस्य च जपो विद्योत्पत्त्यर्थोऽवगम्यते । ऋतं चेत्यादिकर्मोपन्यासादनन्तरं च वेदानुवचनपाठादेतदवगम्यत एवं श्रौतस्मार्तेषु नित्येषु कर्मसु युक्तस्य निष्कामस्य परं ब्रह्म विविदिषोरार्षाणि दर्शनानि प्रादुर्भवन्त्यात्मादिविषयाणीति ॥( इति शांकरभाष्ये दशमोऽनुवाकः )**

**भाष्यार्थ**—याचा जप विद्योत्पत्तीकरितां आहे, असेंहि यावरून समजतें. [ 'अहं वृक्षस्य०' या मंत्राचा ऋषि त्रिशंकु, परमात्मा देवता, ब्रह्मविद्येसाठीं जो जप त्यांत विनियोग. केवल याचाच जप विद्येसाठीं आहे असें नाहीं. तर पूर्वोक्त कर्मेंहि विद्येसाठीं आहेत, असें 'ऋतं च०' इत्यादि भाष्यानें सांगतात—] 'ऋतं च०' इत्यादि अनुवाकांत कर्मांचा उपन्यास केल्यानंतर या वेदानुवचनाचा पाठ केलेला असल्यामुळें त्यावरून

'अशा प्रकारें श्रौत-स्मार्त नित्य कर्मांमध्यें युक्त असलेल्या, निष्काम व परब्रह्माला जाणण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला आत्मा, इत्यादिकांविषयीं अशीं आर्ष (अतींद्रियविषयक) दर्शनें प्रादुर्भूत होतात;' ही गोष्ट कळते (इति दशमोऽनुवाकः) १०

**श्रुतिः—वेदमनूच्याऽऽचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति ।**

**अर्थ**—वेद शिकवून आचार्य शिष्याला अनुशासन करितो.

**भाष्यं—वेदमनूच्येत्येवमादिकर्तव्यतोपदेशारम्भः प्राग्ब्रह्मविज्ञानान्नियमेन कर्तव्यानि श्रौतस्मार्तकर्माणीत्येवमर्थः । अनुशासनश्रुतेः पुरुषसंस्कारार्थत्वात् । संस्कृतस्य हि विशुद्धसत्त्वस्याऽऽत्मज्ञानमञ्जसैवोत्पद्यते । "तपसा कल्मषं हन्ति विद्ययाऽमृतमश्नुते" इति स्मृतिः । वक्ष्यति च—"तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व" इति । अतो विद्योत्पत्त्यर्थमनुष्ठेयानि कर्माणि । अनुशास्तीत्यनुशासनशब्दादनुशासनातिक्रमे हि दोषोत्पत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—[ 'वेदमनूच्य०' इत्यादि भाष्यानें पुढील अनुवाकाचें तात्पर्य–]= 'वेदमनूच्य०' इत्यादि हा कर्तव्यतेच्या उपदेशाचा आरंभ आहे. ब्रह्मविज्ञानाच्या पूर्वी श्रौत-स्मार्त कर्में नियमानें करावीं, असें सांगण्यासाठीं तो आहे. कारण 'अनुशास्ति' अशी जी अनुशासनाची श्रुति आहे ती पुरुषसंस्कारार्थ आहे. कारण जो संस्कृत व त्यामुळेंच विशुद्धचित्त पुरुष असतो त्याला आत्मज्ञान अनायासानेंच होतें. याविषयीं 'तपानें पापाचा नाश करतो व विद्येनें मोक्षाचा अनुभव घेतो,' अशी स्मृति आहे. या उपनिषदांतहि 'तपानें ब्रह्माला विशेषतः जाणण्याची इच्छा कर,' असें वरुण पुढें सांगणार आहे. यास्तव विद्योत्पत्तीकरितां कर्मांचें अनुष्ठान करावें. 'अनुशास्ति' असा अनुशासन-शब्द असल्यामुळें अनुशासनाचा अतिक्रम केल्यास दोषाची उत्पत्ति होते. [ विद्योत्पत्तीसाठीं नित्य-नैमित्तिक कर्मांचें अवश्य अनुष्ठान करावें; असा एक नियम सांगितला. आतां तीं कर्में पूर्वींच करावीं; याविषयीं आणखी एक नियम 'प्रागुपन्यासाच्च कर्मणां०' या भाष्यानें या सांगतात–]

**भाष्यं—प्रागुपन्यासाच्च कर्मणां केवलब्रह्मविद्यारम्भाच्च पूर्वं कर्माण्युपन्यस्तानि । उदितायां च विद्यायां "अभयं प्रतिष्ठां विन्दते" "न बिभेति कुतश्चन" "किमहं साधु नाकरवम्" इत्येवमादिना कर्मनैष्किंचन्यं दर्शयिष्यतीत्यतोऽवगम्यते पूर्वोपचितदुरितक्षयद्वारेण विद्योत्पत्त्यर्थानि कर्माणीति ॥**

**भाष्यार्थ**—आणि कर्मांचा उपन्यास पूर्वी केलेला असल्यामुळें ( हीं–कर्में विद्येच्या उत्पत्त्यर्थ आहेत, असा निश्चय होतो. या सूत्ररूप वाक्यांचेंच व्याख्यान 'केवल०'

इत्यादि भाष्यानें करितात–)=केवल ब्रह्मविद्येला आरंभ करण्यापूर्वीं कर्मांचा उपन्यास केला आहे; आणि ब्रह्मविद्या उत्पन्न झाल्यावर वेद ‘ निर्भयपणें प्रतिष्ठेस प्राप्त होतो; तो कोणत्याहि कारणानें भयभीत होत नाहीं; मीं शुभाचरण कां केलें नाहीं; ’ इत्यादि वचनांनीं कर्मांचें अकिंचित्करत्व दाखवील. त्यावरून पूर्वसंचित पापक्षयाच्या द्वारा विद्येच्या उत्पत्तीकरितां कर्में आहेत, असें ज्ञात होतें.

**भाष्यं—मन्त्रवर्णाच्च—“अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ” इति । ऋतादीनां पूर्वत्रोपदेश आनर्थक्यपरिहारार्थः । इह तु ज्ञानोत्पत्त्यर्थत्वात्कर्तव्यनियमार्थः । वेदमनूच्याध्याप्याऽऽचार्योऽन्तेवासिनं शिष्यमनुशास्ति ग्रन्थग्रहणादनु पश्चाच्छास्ति तदर्थं ग्राहयतीत्यर्थः । अतोऽवगम्यतेऽधीतवेदस्य धर्मजिज्ञासामकृत्वा गुरुकुलान्न समावर्तितव्यमिति । “ बुद्ध्वा कर्माणि चाऽऽरभेत् ” इति स्मृतेश्च । कथमनुशास्तीत्याह—**

**भाष्यार्थ**—‘कर्मांच्या योगानें अधर्माचें उल्लंघन करून ज्ञानानें–उपासनेनें पुरुष अमृताचा अनुभव घेतो;’ असा मंत्रवर्णहि आहे. पूर्वीं–अनु. ९–ऋतादिकांचा जो उपदेश केला आहे तो त्यांच्या आनर्थक्याचा परिहार करण्यासाठीं आहे. ह्म० ऋतादि पूर्वोक्त साधनांचा उपदेश तीं व्यर्थ आहेत, असें कोणाला वाटूं नये म्हणून केला आहे व येथें त्यांना ज्ञानोत्पत्त्यर्थत्व असल्यामुळें ह्म० तीं ज्ञानोत्पत्त्यर्थ असल्यामुळें त्यांच्या कर्तव्याचा नियम करण्यासाठीं उपदेश केला आहे. असो; ‘ वेदं अनुच्य०’–वेद शिकवून आचार्य शिष्याला अनुशासन करतो. ह्म० ग्रंथग्रहणानंतर उपदेश करतो; त्याच्या अर्थाचें ग्रहण करवितो, असा याचा भावार्थ. यावरून ज्यानें वेदाध्ययन केलेलें आहे त्यानें धर्मजिज्ञासा केल्यावांचून गुरुकुलांतून परत येऊं नये, असें ज्ञात होतें. ‘ कर्मांचें यथावत् ज्ञान करून घेऊन नंतर त्यांच्या अनुष्ठानास आरंभ करावा, ’ अशी स्मृतिहि आहे. आतां आचार्य कसें अनुशासन करतो तें वेद सांगतो—

**श्रुतिः—सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । ( १ ) ॥**

**अर्थ**—सत्य भाषण कर. धर्माचें आचरण कर. स्वाध्यायापासून प्रमाद करूं नको–अध्ययनाकडे दुर्लक्ष करूं नको. विद्यानिष्क्रयासाठीं आचार्याला इष्ट धन आणून देऊन त्याच्या अनुज्ञेनें प्रजातंतूचा विच्छेद करूं नको. सत्यापासून प्रमाद युक्त होऊं नये. धर्मापासून

प्रमाद पावूं नये. कुशल कर्मापासून प्रमत्त होऊं नये. ऐश्वर्य देणाऱ्या मंगल कर्मापासून प्रमत्त होऊं नये. स्वाध्याय-प्रवचनापासून प्रमत्त होऊं नये.

**भाष्यं—सत्यं वद यथाप्रमाणावगतं वक्तव्यं तद्वद । तद्वद्धर्मं चर । धर्म इत्यनुष्ठेयानां सामान्यवचनं सत्यादिविशेषनिर्देशात् । स्वाध्यायादध्ययनान्मा प्रमदः प्रमादं मा कार्षीः । आचार्यायाऽऽचार्यार्थं प्रियमिष्टं धनमाहृत्याऽऽनीय दत्त्वा विद्यानिष्क्रयार्थम् । आचार्येण चानुज्ञातोऽनुरूपान्दारानाहृत्य प्रजातन्तुं प्रजासंतानं मा व्यवच्छेत्सीः । प्रजासंततेर्विच्छित्तिर्न कर्तव्या । अनुत्पद्यमानेऽपि पुत्रे पुत्रकाम्यादिकर्मणा तदुत्पत्तौ यत्नः कर्तव्य इत्यभिप्रायः । प्रजा-प्रजनन-प्रजातित्रयनिर्देशसामर्थ्यात् । अन्यथा प्रजननश्चेत्येतदेकमेवावक्ष्यत् ॥**

**भाष्यार्थ—**'सत्यं वद'—सत्य भाषण कर. प्रमाणतः जसें अवगत झालें असेल तसेंच जें बोलावयाचें असेल तें बोल. तसेंच 'धर्मं चर'—धर्माचें आचरण कर. 'धर्म' हें अनुष्ठान करण्यास उचित असलेल्या सामान्य कर्मांचें—आचरणांचें नांव आहे. कारण सत्यादि विशेष धर्मांचा पृथक् निर्देश केला आहे. 'स्वाध्यायात् मा प्रमदः'—स्वाध्याय म्ह० अध्ययन. त्यापासून प्रमाद पावूं नको. त्याविषयीं अनवधान करूं नको. 'आचार्याय'—विद्यानिष्क्रयार्थ आचार्याकरितां 'प्रियं धनं आहृत्य'—इष्ट धन आणून देऊन आचार्यांनें अनुज्ञा दिली असतां अनुरूप भार्येचें पाणिग्रहण करून 'प्रजातंतु मा व्यवच्छेत्सीः'—प्रजातंतूचा—प्रजेच्या संतानाचा—व्यवच्छेद करूं नको. प्रजासंततीचा विच्छेद करूं नये. पुत्र जर उत्पन्न होत नसेल तर पुत्रकाम्यादि कर्मानें त्याला उत्पन्न करण्याविषयीं यत्न करावा, असा याचा अभिप्राय. कारण वर—अनु० ९—प्रजा, प्रजनन व प्रजाति या त्रयाचा निर्देश आहे. त्याच सामर्थ्यावरून असें ह्मणतां येतें. नाहींतर 'प्रजनन' असें एकच साधन तेथें सांगितलें असतें.

**भाष्यं—सत्यान्न प्रमदितव्यं प्रमादो न कर्तव्यः । सत्याच्च प्रमदनमनृतप्रसङ्गः प्रमादशब्दसामर्थ्यात् । विस्मृत्याप्यनृतं न वक्तव्यमित्यर्थः । अन्यथाऽसत्यवदनप्रतिषेध एव स्यात् । धर्मान्न प्रमदितव्यम् । धर्मशब्दस्यानुष्ठेयविषयत्वादननुष्ठानं प्रमादः स न कर्तव्यः । अनुष्ठातव्य एव धर्म इति यावत् । एवं कुशलादात्मरक्षार्थात्कर्मणो न प्रमदितव्यम् । भूतिर्विभूतिस्तस्यै भूत्यै भूत्यर्थान्मङ्गलयुक्तात्कर्मणो न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । स्वाध्यायोऽध्ययनं प्रवचनमध्यापनं ताभ्यां न प्रमदितव्यम् । ते हि नियमेन कर्तव्ये इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—**'सत्यात् न प्रमदितव्यं'—सत्यापासून प्रमादयुक्त होऊं नये. सत्याविषयीं प्रमाद करूं नये. सत्यापासून प्रमदन ह्मणजे असत्याचा प्रसंग. कारण प्रमाद या

शब्दाच्या सामर्थ्यावरूनच तसें ठरतें, विस्मरणानेंहि—चुकूनहि अनृत भाषण करूं नये, असा याचा अर्थ. नाहींतर तो असत्यभाषणाचा नुस्ता प्रतिषेधच होईल. पण त्यांत कांहीं मोठासा अर्थ नाहीं. 'धर्मात् न प्रमदितव्यं'—धर्मापासून प्रमाद पावूं नये. धर्म-शब्द अनुष्ठेयविषय असल्यामुळें त्याचें अननुष्ठान हाच प्रमाद आहे. पण तो करूं नये. ह्मणजे धर्माचें अनुष्ठान करावेंच, असा याचा भावार्थ. त्याचप्रमाणें 'कुशलात् न प्रमदितव्यं'—आत्मरक्षणार्थ जें कुशल कर्म त्यापासून प्रमाद पावूं नये. 'भूत्यै०'—भूति ह्म० विभूति—ऐश्वर्य; त्या भूतीसाठीं असलेलें जें मंगलयुक्त कर्म त्यापासून प्रमाद पावूं नये. 'स्वाध्याय०'—स्वाध्याय म्ह० स्वतः अध्ययन करणें व प्रवचन म्ह० अध्यापन, यांपासून प्रमाद पावूं नये. तीं दोन्हीं नियमानें करावीं असा याचा अर्थ.

**श्रुतिः—देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकꣳसुचरितानि । तानि त्वयोपास्यानि (२) नो इतराणि ॥**

**अर्थ**—देवकार्य व पितृकार्य यांपासून प्रमाद पावूं नये. माता हाच ज्याचा देव आहे, असा तूं मातृदेव हो. पितृदेव हो. आचार्यदेव हो. अतिथिदेव हो. आमचीं जीं अनिंद्य कर्में असतील तींच तूं आचरावींस. निंद्य कर्में आचरूं नयेस. आमचीं जीं सुचरितें—शुभ कर्में असतील तींच तूं उपासावींस. आमचीं इतर—अशुभ कर्में तूं आचरूं नयेस.

**भाष्यं—तथा देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । दैवपित्र्ये कर्मणी कर्तव्ये । मातृदेवो माता देवो यस्य स त्वं मातृदेवो भव स्याः । एवं पितृदेव आचार्यदेवो भव । देवतावदुपास्या एत इत्यर्थः । यान्यपि चान्यान्यनवद्यान्यनिन्दितानि शिष्टाचारलक्षणानि कर्माणि तानि सेवितव्यानि कर्तव्यानि त्वया । नो अकर्तव्यानीतराणि सावद्यानि शिष्टकृतान्यपि । यान्यस्माकमाचार्याणां सुचरितानि शोभनचरितान्याम्नायाद्यविरुद्धानि तान्येव त्वयोपास्यान्यदृष्टार्थान्यनुष्ठेयानि, नियमेन कर्तव्यानीति यावत् । नो इतराणि विपरीतान्याचार्यकृतान्यपि ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें देवकार्य व पितृकार्य यांपासून प्रमाद पावूं नये. म्ह० दैव कर्म व पित्र्यकर्म अवश्य करावें. माताच ज्याचा देव आहे असा तूं मातृदेव हो. तसाच पितृदेव, आचार्यदेव व अतिथिदेव हो. या सर्वांची देवतांप्रमाणें उपासना करावी, असा याचा अर्थ. तशींच जीं दुसरीं अनवद्य म्ह० अनिंदित शिष्टाचारलक्षण कर्में तीं सेवावीं. तूं तीं करावींस. दुसरीं सदोष अकर्तव्यें शिष्टकृत जरी असलीं तरी करूं नये. शिष्टांचींहि अकार्यें करूं नयेत. जीं आह्मां आचार्यांचीं सुचरितें—शोभन

आचरणें—शास्त्रादिकांच्या विरुद्ध नसलेलीं कर्में तींच तूं उपासावींस. अदृष्टाकरितां तूं त्यांचें अनुष्ठान करावेंस. नियमानें तींच करावींस, असें तात्पर्य. आचार्यांनीं केलेलींहि इतर म्ह० विपरीत कर्में तूं करूं नयेस.

**श्रुतिः—ये के चास्मच्छ्रेयाꣳसो ब्राह्मणाः। तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यम् ॥**

**अर्थ**—जे कोणी आचार्यादि धर्मांनीं विशिष्ट असलेले—आम्हांहून अधिक प्रशस्त असलेले ब्राह्मण, त्यांचा तूं आसनानें प्रश्वास करावास—आसनादि देऊन त्यांच्या श्रमाचा परिहार करावास.

**भाष्यं—ये के च विशेषिता आचार्यत्वादिधर्मैरस्मदस्मत्तः श्रेयांसः प्रशस्यतरास्ते च ब्राह्मणा न क्षत्रियादयस्तेषामासनेनाऽऽसनदानादिना त्वया प्रश्वसितव्यम्। प्रश्वसनं प्रश्वासः श्रमापनयः। तेषां श्रमस्त्वयाऽपनेतव्य इत्यर्थः। तेषां चाऽऽसने गोष्ठीनिमित्ते समुदिते तेषु न प्रश्वसितव्यं प्रश्वासोऽपि न कर्तव्यः केवलं तदुक्तसारग्राहिणा भवितव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—जे कोणी आचार्यादि धर्मांनीं विशेषित—विशिष्ट असलेले 'अस्मत्'—आम्हांहून अधिक प्रशस्त व तेहि ब्राह्मण, क्षत्रियादिक नव्हेत, त्यांना आसनानें ह्म० आसन देणें इत्यादि उपचारांनीं तूं प्रश्वसित करावेंस. प्रश्वसन म्ह० प्रश्वास; श्रमांचा अपनय—श्रमपरिहार. त्यांचा श्रम तूं घालवावास,असा भावार्थ आणि त्यांच्या आसनानंतर म्ह०ते बसल्यावर गोष्टींचें निमित्त उद्भवलें असतां त्यांच्या ठिकाणीं प्रश्वसित होऊं नये म्हणजे प्रश्वासहि करूं नये. श्वास घेण्यासाठीं म्हणूनहि त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करूं नये. तर ते जें बोलतील त्याचें केवल सार ग्रहण करणारा, असें तूं व्हावेंस म्ह० त्यांच्या भाषणाकडे थोडेंसुद्धां दुर्लक्ष न करितां त्यांतील सार ग्रहण करावें.

**श्रुतिः—श्रद्धया देयम्। अश्रद्धयाऽदेयम्। श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम्। अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ( ३ )। ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तत्र वर्तेरन्। तथा तत्र वर्तेथाः। अथाभ्याख्यातेषु। ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तेषु वर्तेरन्। तथा तेषु वर्तेथाः ॥**

**अर्थ**—श्रद्धेनें द्यावें. अश्रद्धेनें देऊं नये. ऐश्वर्यानुसार द्यावें. लज्जेनें द्यावें. भीतीनें द्यावें. मित्रादिकांना कार्याच्या निमित्तानें द्यावें. तुला कदाचित् कर्म किंवा आचार यांविषयीं जर संशय आला तर तेथें त्यावेळीं जे विचारक्षम, नियुक्त किंवा अनियुक्त, अरूक्ष, धर्मकाम ब्राह्मण, ते जसे वागत असतील तसाच तूं वाग. एखाद्या दोषारोप आलेल्या

पुरुषाशीं वागण्याचा प्रसंग आला असतां पूर्वोक्त ब्राह्मण त्याच्याशीं जसे वागतील तसा तूं वाग.

**भाष्यं—किंच यत्किंचिद्देयं तच्छ्रद्धयैव दातव्यम् । अश्रद्धयाऽदेयं न दातव्यम् । श्रिया विभूत्या देयं दातव्यम् । ह्रिया लज्जया च देयम् । भिया च भयेन देयम् । संविदा च । संविन्मित्रादिकार्यम् । अथैवं वर्तमानस्य यदि कदाचित्ते तव श्रौते स्मार्ते वा कर्मणि वृत्ते वाऽऽचारलक्षणे विचिकित्सा संशयः स्यात् । ये तत्र तस्मिन्देशे काले वा ब्राह्मणास्तत्र कर्मादौ युक्ता इति व्यवहितेन संबन्धः कर्तव्यः । संमर्शिनो विचारक्षमाः । युक्ता अभियुक्ताः कर्मणि वृत्ते वा । आयुक्ता अपरप्रयुक्ताः । अलूक्षा अरूक्षा अक्रूरमतयः । धर्मकामा अदृष्टार्थिनोऽकामहता इत्येतत्स्युर्भवेयुः । ते यथा येन प्रकारेण ब्राह्मणास्तत्र तस्मिन्कर्मणि वृत्ते वा वर्तेरंस्तथा त्वमपि वर्तेथाः । अथाभ्याख्यातेष्वभ्युक्ता दोषेण संदिह्यमानेन संयोजिताः केनचित्तेषु च यथोक्तं सर्वमुपनयेद्ये तत्रेत्यादि ॥**

**भाष्यार्थ—**तसेंच जें कांहीं द्यावयाचें असेल तें श्रद्धेनेंच द्यावें. अश्रद्धेनें देऊं नये. 'श्रिया'–विभूतीनें द्यावें, ऐश्वर्याला शोभेल असें द्यावें. आपल्या शक्तीप्रमाणें द्यावें; लज्जेनें द्यावें; भीतीनें द्यावें; संविद् म्ह० मित्रादिकांचें कार्य. त्या कार्याच्या निमित्तानें द्यावें. अशा रीतीनें सर्व व्यवहार करणाऱ्या तुला जर कदाचित्–एखादे वेळीं श्रौत किंवा स्मार्त कर्म अथवा आचारलक्षण वृत्त, यांविषयीं संशय आला तर त्या देशांत किंवा त्या कालीं जे ब्राह्मण त्या कर्मादिकांत 'युक्त' असतात, 'तत्र' याचा 'युक्ताः' या पुढच्या पदाशीं संबंध लावावा. 'संमर्शिनः'–विचार करण्यास समर्थ असतात; युक्त म्ह० कर्म किंवा वृत्त–आचरण यांत सर्व प्रकारें निमग्न झालेले व आयुक्त म्ह० दुसऱ्याकडून प्रेरित न झालेले स्वतंत्र, 'अलूक्ष' म्ह० अरूक्ष, अक्रूरमती–ज्यांची बुद्धि क्रूर नाहीं, 'धर्मकामाः' म्ह० अदृष्टाची–पुण्याची इच्छा करणारे, कामानें हत–विवेकरहित न झालेले, असा याचा भावार्थ, जे असे असतात ते ब्राह्मण त्या कर्मांत किंवा आचारांत ज्या प्रकारें वागतील तसाच तूंहि त्या कर्मादिकांत वाग. त्याचप्रमाणें अभ्याख्यात पुरुषांमध्यें म्ह० ज्यांच्यावर कोणी संदिग्ध दोषारोप केला आहे अशा पुरुषांशीं व्यवहार करावयाचा प्रसंग आला असतां त्या देशांत किंवा त्या समयीं जे विचारी, कर्मप्रधान, स्वतंत्र, अरूक्ष व धर्माची इच्छा करणारे ब्राह्मण असतील ते त्यांच्याशीं जसा व्यवहार करतील तसाच तूं वाग, असें 'ये तत्र०' इत्यादि सर्व पूर्वोक्त वाक्य जाणावें.

**श्रुतिः— एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमु चैतदुपास्यम् ( ४ )**

**अर्थ**—हा आदेश–विधि आहे. हा उपदेश आहे. हें वेदरहस्य आहे. हें ईश्वर-वचन आहे. याप्रमाणेंच उपासन–आचरण करावें. असेंच हें करावें.

**भाष्यं**—**एष आदेशो विधिः । एष उपदेशः पुत्रादिभ्यः पित्रादीनाम् । एषा वेदोपनिषद्वेदरहस्यं वेदार्थ इत्येतत् । एतदेवानुशासनमीश्वरवचनम् । आदेश-वाक्यस्य विधेरुक्तत्वात्सर्वेषां वा प्रमाणभूतानामनुशासनमेतत् । यस्मादेवं तस्मादेवं यथोक्तं सर्वमुपासितव्यं कर्तव्यम् । एवमु चैतदुपास्यमुपास्यमेव चैत-न्नानुपास्यमित्यादरार्थं पुनर्वचनम् ॥ (इति शांकरभाष्ये एकादशोऽनुवाकः । )**

**भाष्यार्थ**—हा आदेश म्ह० विधि आहे. हा पुत्रादिकांस पित्रादिकांचा उपदेश आहे. ही वेदोपनिषद् म्ह० वेदरहस्य, वेदार्थ असा भाव, आहे. हेंच अनुशासन म्ह० ईश्वरवचन आहे. किंवा आदेशवाक्य असा जो विधि त्याचें कथन वर केलेलें असल्या-मुळें हें सर्व प्रमाणभूत उपदेशकांचें अनुशासन आहे, असें तात्पर्य. ज्या अर्थी असें आहे त्या अर्थी वर जसें सांगितलें आहे तसें सर्व ' उपासितव्यं'–करावें. असेंच हें करावें आणि तें करावेंच, त्याला कधींहि सोडूं नये; असें आदरार्थ पुनः सांगितलें आहे. ( इति शीक्षा-ध्याये एकादशोऽनुवाकः ) ११

**श्रुतिः**—**शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् । ऋतमवादिषम् । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥१२**

**भाष्यं**—**अतीतविद्याप्राप्त्युपसर्गशमनार्थं शान्तिं पठति—'शं नो मित्रः०'इति व्याख्यातमेतत्पूर्वम् ।**

**भाष्यार्थ**—मागील विद्याप्राप्तीचे उपसर्ग शांत व्हावे, म्हणून 'शं नो मित्रः०' ही शांति येथें पढली आहे. पूर्वी (पृष्ठ १२) या शांतीचा अर्थ होऊन गेला आहे. पण येथें विद्या संपलेली असल्यामुळें ' अवादिषम् ' ' तन्मामावीत्, तद्वक्तारमावीत्' इत्यादि भूतकाळीं प्रयोग केले आहेत. आरंभींच्या शांतींत ' वदिष्यामि ' व 'अवतु' असे भविष्य-त्काळीं व प्रार्थना या अर्थी प्रयोग केले होते. यास्तव येथें ' तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हटलें, मी ऋत बोललों, सत्य बोललों, तें–अपरब्रह्म माझें–अपरब्रह्मोपासकाचें रक्षण करतें झालें' इत्यादि अर्थ करावा.

**भाष्यं**—**अत्रैतच्चिन्त्यते विद्याकर्मणोर्विवेकार्थं किं कर्मभ्य एव केवलेभ्यः परं श्रेय उत विद्यासव्यपेक्षेभ्य आहोस्विद्विद्याकर्मभ्यां संहताभ्यां विद्याया वा कर्मा-पेक्षाया उत केवलाया एव विद्याया इति । तत्र केवलेभ्य एव कर्मभ्यः स्यात् ।**

**समस्तवेदार्थज्ञानवतः कर्माधिकारात्। "वेदः कृत्स्नोऽधिगन्तव्यः सरहस्यो द्विजन्मना" इति स्मरणात्। अधिगमश्च सहोपनिषदर्थेनाऽऽत्मज्ञानादिना। "विद्वान्यजते" "विद्वान्याजयति" इति च विदुष एव कर्मण्यधिकारः प्रदर्श्यते सर्वत्र "ज्ञात्वा चानुष्ठानम्" इति च। कृत्स्नश्च वेदः कर्मार्थ इति हि मन्यन्ते केचित् कर्मभ्यश्चेत्परं श्रेयो नावाप्यते वेदोऽनर्थकः स्यात्॥**

**भाष्यार्थ**---[पहिल्या अनुवाकांत केवल विद्येलाच निःश्रेयससाधनत्व आहे, असें जरी सांगितलें आहे तरी तेंच स्पष्ट करण्यासाठीं येथें कर्मविधि पाहून प्रसंगानें पुनः 'अत्रैतच्चिन्त्यते०' इत्यादि भाष्यानें विचार करण्यास आरंभ करितात---]=आतां येथें विद्या व कर्म यांच्या विवेकार्थ म्ह०त्यांचें फल पृथक् आहे, असें ज्ञान करून देण्यासाठीं या गोष्टीचें चिंतन केलें जातें-१ केवल कर्मांपासूनच परम श्रेय होतें कीं २ज्यांना विद्येची अपेक्षा आहे अशा कर्मांपासून तें होतें; कीं ३ विद्या व कर्म यांच्या समुच्चयानें तें होतें, किंवा ४ कर्मांची जिला अपेक्षा आहे अशा विद्येपासून तें होतें कीं, ५ नुसत्या विद्येपासून होतें? (असे पांच विकल्प संभवतात)=त्यांतील केवल कर्मांपासूनच परम श्रेय होतें (हा पक्ष अगोदर पुढें येतो.)=कारण समस्त वेदार्थ जाणणाऱ्याला कर्मांचा अधिकार असतो. 'द्विजानें रहस्यासह सर्व वेद जाणावा,' असें स्मृतिवचन आहे. आत्मज्ञानादि उपनिषदर्थांसह त्याचें ज्ञान होणें, हाच अधिगम आहे. 'विद्वान् यजन करतो,' 'विद्वान् यजन करवितो' अशा रीतीनें विद्वानाचाच कर्मामध्यें अधिकार आहे, असें सर्व ठिकाणीं दाखविलें जातें. 'आणि जाणूनच अनुष्ठान करावें,' असेंहि म्हटलें आहे. सर्व वेद कर्मांकरितांच आहे, असें कित्येक समजतात, हें प्रसिद्ध आहे. कर्मांपासून जर परम श्रेय प्राप्त होत नसेल तर वेद अनर्थक होईल. ["भूत-सिद्ध वस्तु भव्य-साध्य धर्मासाठीं उपदेशिली जाते," या न्यायानें आत्मज्ञानहि कर्मकर्त्याच्या संस्कारार्थ असल्यामुळें त्याला कर्मविधिशेषत्व आहे. म्हणून आत्मज्ञानाचें श्रुत असलेलेंहि फल अर्थवादमात्र आहे. त्यामुळें कर्मांपासूनच मोक्ष, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. याप्रमाणें पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**न नित्यत्वात्०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त---]

**भाष्यं---न। नित्यत्वान्मोक्षस्य। नित्यो हि मोक्ष इष्यते। कर्मकार्यस्यानित्यत्वं प्रसिद्धं लोके। कर्मभ्यश्चेच्छ्रेयो नित्यं स्यात्तच्चानिष्टम्। "तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयते" इतिन्यायानुगृहीतश्रुतिविरोधात्॥**

**भाष्यार्थ**---हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण मोक्षाला नित्यत्व आहे. मोक्ष नित्य मानलेला आहे, हें प्रसिद्ध आहे. तसेंच कर्मांचें कार्य अनित्य असतें, हेंहि लोकांमध्यें प्रसिद्ध आहे. कर्मांपासून जर श्रेय होईल तर तें नित्य असेल, पण तें अनिष्ट आहे. कारण

'ज्याप्रमाणें येथें कर्मानें संपादन केलेला लोक—फल क्षीण होतें ( त्याप्रमाणें पुण्यकृत लोक क्षीण होतो )' छां.भा.८.१.६सु.उ.पृ.४६८.या न्यायानुगृहीत श्रुतीशीं विरोध येतो. त्यामुळें कर्मापासून श्रेय होत नाहीं.

**भाष्यं—काम्यप्रतिषिद्धयोरनारम्भादारब्धस्य च कर्मण उपभोगेन क्षयान्नित्यानुष्ठानाच्च ज्ञाननिरपेक्ष एव मोक्ष इति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—काम्य व निषिद्ध कर्मांचा आरंभच न केल्यामुळें व आरब्ध कर्माचा उपभोगानें क्षय झाल्यामुळें आणि नित्य कर्मांचें अनुष्ठान केल्यामुळें ज्ञाननिरपेक्षच मोक्ष होतो, म्ह० तो ज्ञानाची अपेक्षा न करितांच, ज्ञानावांचूनच होतो, असें म्हणाल,

**भाष्यं—तच्च न। शेषकर्मसंभवात्तन्निमित्तशरीरान्तरोत्पत्तिः प्राप्नोतीति प्रत्युक्तम् । कर्मशेषस्य च नित्यानुष्ठानेनाविरोधात्क्षयानुपपत्तिरिति च ॥**

**भाष्यार्थ**—तर तेंहि बरोबर नाहीं. कारण 'अवशिष्ट कर्मांचा संभव असल्यामुळें त्यांच्या निमित्तानें दुसऱ्या शरीराची उत्पत्ति प्राप्त होते.' असें सांगून वर ( पृष्ठ ५ ) त्या म्हणण्याचें प्रत्याख्यान—निराकरण केलें आहे. त्याचप्रमाणें 'अवशिष्ट कर्मांचा नित्य कर्मांच्या अनुष्ठानाशीं अविरोध असल्यामुळें अवशिष्ट कर्मांच्या क्षयाची उपपत्ति लागत नाहीं.' असेंहि वर ( पृष्ठ ७ ) सांगितलें आहे.

**भाष्यं—यदुक्तं समस्तवेदार्थज्ञानवतः कर्माधिकारादित्यादि । तच्च न । श्रुतज्ञानव्यतिरेकादुपासनस्य ॥**

**भाष्यार्थ**—आतां 'ज्याला समस्त वेदार्थांचें ज्ञान असतें त्याचाच कर्मांचे ठिकाणीं अधिकार असतो' इत्यादि जें म्हटलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण गुरुकुलांत ज्याचा विचार केला आहे अशा वाक्यावरून होणाऱ्या कर्मानुष्ठानोपयोगी ज्ञानाहून उपासन निराळें आहे. [ यद्यपि अध्ययनविधीच्या अनुसार प्रत्येकानें सर्व वेदार्थांचा विचार करावा, असें प्राप्त होतें, तथापि प्रत्येक वाक्याचें अध्ययन व प्रत्येक वाक्याचा अर्थविचार हीं दोन्ही एकाच वेळीं होऊं शकत नाहींत. तर एकदा अध्ययन व दुसऱ्यांदा अर्थज्ञान करून घ्यावें लागतें. पण अध्ययनानंतर कर्मोपयोगी वाक्याचें अर्थज्ञान झालें कीं तेवढ्यानेंच पुरुषाला कर्मांचा अधिकार प्राप्त होण्याचा संभव असतो. कारण ब्रह्मसाक्षात्काराचा कर्मांमध्यें कांहीं उपयोग नसतो. यास्तव 'समस्त वेदाचें अर्थज्ञान ज्याला असतें तोच कर्मांचा अधिकारी होतो,' याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं, शिवाय अध्ययनविधीमुळें गुरुकुलांत वेदान्तविचारहि केला, असें जरी समजलें तरी त्यावरून समस्त वेदार्थांचें ज्ञान ज्याला असेल त्यालाच कर्माधिकार आहे, असें होत नाहीं. कारण उपासनेनें साध्य

होणारा जो ब्रह्मसाक्षात्कार तो कर्माहून निराळा आहे. आतां या सूत्ररूप वाक्याचाच 'श्रुतज्ञान०' इत्यादि भाष्यानें विस्तार करितात–]

**भाष्यं—श्रुतज्ञानमात्रेण हि कर्मण्यधिक्रियते नोपासनामेपक्षते। उपासनं च श्रुतज्ञानादर्थान्तरं विधीयते। मोक्षफलमर्थान्तरप्रसिद्धं च स्यात्। "श्रोतव्यः" इत्युक्त्वा तद्व्यतिरेकेण "मन्तव्यो निदिध्यासितव्यः" इति यत्नान्तरविधानात्। मनननिदिध्यासनयोश्च प्रसिद्धं श्रवणज्ञानादर्थान्तरत्वम्॥**

**भाष्यार्थ**—पुरुष नुसत्या श्रुत ज्ञानानेंच ह्म० गुरुकुलांत केलेल्या वाक्यविचारजन्य ज्ञानानेंच कर्माचा अधिकारी होतो. तो कर्माधिकारार्थ उपासनेची अपेक्षा करीत नाहीं. [अध्ययनविधीचा व्यापार समाप्त झाल्यावर अनुष्ठानास योग्य असें ब्रह्मसाक्षात्कार हें फल देणारें ब्रह्मोपासनच नाहीं. कारण त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं, असें म्हणूं नये, असें **'उपासनं च०'** या भाष्यानें सांगतात–]=उपासन श्रुतज्ञानाहून निराळें आहे, असें त्याचें विधान केलें जातें. मोक्ष हें फल पृथक् साधनानेंच सिद्ध होईल. कारण 'श्रोतव्यः' ह्म० श्रवण करावें, असें सांगून त्याहून प्रथक्पणें 'मनन करावें व निदिध्यासन करावें' अशा रीतीनें त्यासाठीं निराळ्या यत्नाचें विधान केलेलें असल्यामुळें मनन व निदिध्यासन यांचें श्रवणज्ञानाहून अर्थान्तरत्व–पृथक्त्व पूर्णपणें सिद्ध आहे. (पण हें सुद्धां आह्मी केवल कर्ममीमांसेच्या न्यायाचा अंगीकार करून सांगितलें आहे. वस्तुतः 'श्रोतव्यः' या विधीमुळेंच उपनिषद्विचाराला आरंभ होतो व तो भिन्न अधिकार आहे. असो; याप्रमाणें केवल कर्म मोक्षसाधन आहे, या पहिल्या पक्षाचें निरसन करून विद्यासमुच्चित कर्म मोक्षसाधन आहे, या दुसऱ्या पक्षाचें निरसन **'एवं तर्हि०'** इत्यादि भाष्यानें करितात–)

**भाष्यं—एवं तर्हि विद्यासव्यपेक्षेभ्यः कर्मभ्यः स्यान्मोक्षः। विद्यासहितानां च कर्मणां भवेत्कार्यान्तरारम्भसामर्थ्यम्। यथा स्वतो मरणज्वरादिकार्यारम्भसामर्थ्यानामपि विषदध्यादीनां मन्त्रशर्करादिसंयुक्तानां कार्यान्तरारम्भसामर्थ्यम्, एवं विद्यासहितैः कर्मभिर्मोक्ष आरभ्यत इति चेत्। न। आरभ्यस्यानित्यत्वादित्युक्तो दोषः॥**

**भाष्यार्थ**— असें जर असेल तर विद्येची ज्यांना अपेक्षा आहे अशा कर्मापासून मोक्ष होईल. विद्यायुक्त कर्माच्या ठिकाणीं निराळ्या कार्याचा आरंभ करण्याचें सामर्थ्य असूं शकेल. ज्यांच्यामध्यें स्वतः मरण, ज्वर इत्यादि कार्याच्या आरंभाचें सामर्थ्य असतें असे–विष, दहीं इत्यादि–पदार्थ मंत्र, शर्करा इत्यादिकांनीं युक्त झाले असतां त्यांच्या मध्यें मरण, ज्वर, इत्यादिकांच्या अगदीं विरुद्ध असें निराळें कार्य आरंभण्याचें सामर्थ्य जसें येतें, त्याप्रमाणें विद्यायुक्त कर्माच्या योगानें मोक्ष आरब्ध होतो, असें जर

ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण आरभ्य पदार्थाला अनित्यत्व असतें, हा त्या पक्षावर येणारा दोष वर सांगितला आहे. (' **वचनात्०** ' इत्यादि भाष्यानें पुनः पूर्वपक्षीयाची शंका घेऊन समाधान करितात— )

**भाष्यं—वचनादारभ्योऽपि नित्य एवेति चेत् । न । ज्ञापकत्वाद्वचनस्य । वचनं नाम यथाभूतस्यार्थस्य ज्ञापकं विद्यमानस्य कर्तृ । न हि वचनशतेनापि नित्यमारभ्यत आरब्धं वाऽविनाशि भवेत् ॥**

**भाष्यार्थ—** अहोपण, ' न स पुनरावर्तते ' म्ह० तो पुनः या संसारांत परत येत नाहीं, असें वचन असल्यामुळें मोक्ष आरभ्य जरी असला तरी नित्यच आहे, ह्मणून जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण वचनाला ज्ञापकत्व आहे. वचन म्हणजे यथाभूत अर्थाचें ज्ञापक. पदार्थ जसा असेल तसें त्याचें ज्ञान करून देणारें आहे. तें विद्यमान वस्तूचें कर्तृ आहे. शेंकडों वचनांनींहि नित्य वस्तूचा आरंभ केला जात नाहीं; किंवा आरब्ध वस्तू अविनाशी—नित्य होत नाहीं. ( आरभ्य ह्म० ज्याचा आरंभ होतो तें. अशा आरभ्य वस्तूमध्यें नित्यत्वयोग्यताच नसते; आणि ती वचनावरून त्यांत येते, ह्मणून जर ह्मटलें तर वचन ज्ञापक नसून कारक आहे, असें होईल आणि वचन असंभाव्य अर्थहि करणारें आहे, असें जर म्हटलें तर मग ' आंधळ्याला रत्न सांपडलें—दिसलें, ' अशा अर्थाच्या वचनावरूनहि आंधळ्याचे ठिकाणीं पाहण्याची योग्यता येते, असें ह्मणावें लागेल. पण तें सयुक्तिक नाहीं. यास्तव वचन ज्ञापक आहे, कारक नाहीं. तें विद्यमान अर्थाचें कर्तृ—करणारें—व्यक्त करणारें आहे. अविद्यमान अर्थाचें कर्तृ नाहीं, असा भावार्थ. याप्रमाणें कर्म प्रधान व विद्या गौण अशा त्यांच्या असम समुच्चयाचें निरसन करून यांच्या सम समुच्चयाचे ठिकाणींहि याच न्यायाचा अतिदेश ' **एतेन०** ' इत्यादि भाष्यानें करितात– )

**भाष्यं—एतेन विद्याकर्मणोः संहतयोर्मोक्षारम्भकत्वं प्रत्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—या अनित्यत्वादि दोषप्रसंगानें संहत म्हणजे सम-प्राधान्यानें समुच्चित विद्याकर्मांना मोक्षारंभकत्व आहे, या पक्षाचेंहि प्रत्याख्यान—निरसन झालें. [ म्ह० कर्म व विद्या यांच्या समुच्चयानें मोक्षाला आरंभ होतो, म्हणून जरी म्हटलें तरी तो आरब्ध मोक्ष अनित्य ठरतो. यास्तव तो पक्षहि अयोग्य आहे, असा भावार्थ.]

**भाष्यं—विद्याकर्मणी मोक्षप्रतिबन्धहेतुनिवर्तके इति चेत् । न । कर्मणः फलान्तरदर्शनात् । उत्पत्तिसंस्कारविकाराप्तयो हि फलं कर्मणो दृश्यते । उत्पत्त्यादिफलविपरीतश्च मोक्षः ॥**

**भाष्यार्थ**—विद्या व कर्म हीं दोन्हीं मोक्षाला प्रतिबंध करणाऱ्या अविद्या, अधर्म इत्यादि कारणांचीं निवर्तक आहेत. [मोक्षाचें स्वरूप उत्पन्न करणारीं नव्हेत; त्यामुळें स्वरूपावस्थानाला नित्यत्व आहे. कारण कृतक प्रध्वंसाचेंहि नित्यत्व प्रसिद्ध आहे. असा भावार्थ.]=म्हणून म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण कर्माचें निराळेंच फळ दिसतें; उत्पत्ति, संस्कार, विकार व आप्ति, असें चार प्रकारचें कर्माचें फल दिसतें; आणि मोक्ष तर उत्पत्त्यादि फलाच्या विपरीत आहे. ['भिद्यते हृदयग्रंथिः'मुं.भा.२.२.८.सु. उ. पृ.१५०इत्यादि श्रुति असल्यामुळें अविद्यानिवृत्ति केवल विद्येनेंच साध्य आहे. तिच्यासाठीं विद्येला सहकारीची अपेक्षा नाहीं. पुरोडाशादिकांची उत्पत्ति; व्रीह्यादिकांचा संस्कार; सोमाचा विकार; व वेदाची आप्ति–प्राप्ति हें कर्माचें फल प्रसिद्ध आहे. पण आत्मस्वरूपभूत मोक्ष अनादि आहे. त्यामुळें त्याच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचें अतिशयत्व –आधिक्य आणतां येत नाहीं; व तो अविकार्य आहे; मोक्ष नित्यप्राप्तच असल्यामुळें त्याला आप्यत्वहि नाहीं. त्यामुळें तो मोक्ष कर्मफलाहून विपरीत आहे. '**गतिश्रुतेः०**' इत्यादि भाष्यानें मोक्ष आप्य आहे, अशी शंका घेऊन तिचें समाधान करितात— ]

**भाष्यं—गतिश्रुतेराप्य इति चेत्। "सूर्यद्वारेण, तयोर्ध्वमायन्" इत्येवमादिगतिश्रुतिभ्यः प्राप्यो मोक्ष इति चेत्। न। सर्वगतत्वाद्गन्तृभिश्चानन्यत्वादाकाशादिकारणत्वात्सर्वगतं ब्रह्म। ब्रह्माव्यतिरिक्ताश्च सर्वे विज्ञानात्मानः। अतो नाऽऽप्यो मोक्षः। गन्तुरन्यद्विभिन्नं देशं प्रति भवति गन्तव्यम्। न हि येनैवाव्यतिरिक्तं यत्तत्तेनैव गम्यते। तदनन्यत्वप्रसिद्धेश्च। "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" "क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि" इत्येवमादिश्रुतिस्मृतिशतेभ्यः॥**

**भाष्यार्थ**—अर्चिरादि मार्गानें गति सांगितलेली असल्यामुळें ( ब्रह्मांडाच्या बाहेर असलेल्या ब्रह्माची प्राप्ति, हाच मोक्ष असल्यामुळें)=मोक्ष आप्य–प्राप्य आहे. त्यामुळें मोक्षाचें नित्य आप्तत्व असिद्ध आहे, असें म्हणाल; म्ह० 'सूर्यद्वारेण' 'तयोर्ध्वमायन्' –सूर्यद्वारानें, त्या सुषुम्ना नाडीनें वर जाणारा अमरणधर्मत्वास प्राप्त होतो. इत्यादि प्रकारच्या गतिश्रुती असल्यामुळें मोक्ष प्राप्य आहे, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं.(म्ह० त्याची संयोगरूप किंवा तादात्म्यरूप प्राप्ति संभवत नाहीं.)=कारण तें ब्रह्म सर्वगत आहे व गमन करणारे जे जीव त्यांच्याशीं त्याचें अनन्यत्व आहे. ब्रह्माला आकाशादिकांचें कारणत्व असल्यामुळें तें सर्वगत आहे व सर्व विज्ञानात्मे ब्रह्माहून व्यतिरिक्त नाहींत. यास्तव मोक्ष आप्य नाहीं. गमन करणाऱ्या पुरुषाहून पृथक् असलेल्या देशालाच गमन करतां येतें. जें ज्याहून पृथक् नसतें तें त्यालाच प्राप्त होत नसतें; तें त्यालाच जात नाहीं. शिवाय 'तें उत्पन्न करून मागून तो त्यांतच प्रवेश करता झाला' व 'क्षेत्रज्ञहि

मलाच जाण; ' इत्यादि शेंकडों श्रुति-स्मृतिवचनांवरून ब्रह्म अनन्य आहे, या गोष्टीची पूर्णपणें सिद्धि होते. [ आतां 'गत्यैश्वर्यादि॰ ' इत्यादि भाष्यानें शंका घेऊन गत्यादि श्रुतींचें तात्पर्य सांगतात—]

**भाष्यं—गत्यैश्वर्यादिश्रुतिविरोध इति चेत् । अथापि स्याद्यद्यप्राप्यो मोक्षस्तदा गतिश्रुतीनां "स एकधा" "स यदि पितृलोककामो भवति" "स्त्रीभिर्वा यानैर्वा" इत्यादिश्रुतीनां च कोपः स्यादिति चेत् । न । कार्यब्रह्मविषयत्वात्तासाम् । कार्ये हि ब्रह्मणि स्त्र्यादयः स्युर्न कारणे । "एकमेवाद्वितीयं" "यत्र नान्यत्पश्यति" "तत्केन कं पश्येत्" इत्यादिश्रुतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—गति, ऐश्वर्य इत्यादिकांचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींशीं विरोध येतो, म्हणून जर म्हणाल म्ह॰ यावर कोणी असेंहि म्हणेल कीं, जर मोक्ष अप्राप्य असेल तर गतिश्रुति (तो आर्चिरादि मार्गानें गमन करतो, अशा अर्थाची श्रुति) व 'तो एकधा होतो,' 'तो जर पितृलोकाची इच्छा करणारा असला तर त्याला तो लोक तत्काल प्राप्त होतो.' 'तो स्त्रियांशीं यानांनीं रममाण होतो ' सु. उ. पृ.४६५-६९-८८ इत्यादि श्रुतींचा कोप —बाध होतो म्हणून जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्या श्रुति कार्यब्रह्मविषय आहेत. ( म्ह॰ त्यांचा विषय कार्यब्रह्मच आहे. ) कार्यब्रह्मामध्येंच स्त्र्यादिक संभवतात, कारणब्रह्मांत त्या संभवत नाहींत. कारण ' एकच व अद्वितीय ' ' जेथें दुसरें कांहीं पहात नाहीं, ' ( जेव्हां सर्वच आत्मा होतो ) ' तेव्हां कोण कोणत्या साधनानें कोणाला पाहणार? ' इत्यादि श्रुतींवरून हें सिद्ध होतें. (समुच्चयाचा अंगीकार करून मोक्षामध्यें कांहीं कर्मकार्य संभवत नाहीं, असें सांगितलें; पण आतां तो समुच्चयच संभवत नाहीं, असें ' **विरोधाच्च**॰' इत्यादि भाष्यानें सांगतात——)

**भाष्यं—विरोधाच्च विद्याकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः । प्रविलीनकर्त्रादिकारकविशेषतत्त्वविषया हि विद्या तद्विपरीतकारकसाध्येन कर्मणा विरुध्यते । न ह्येकं वस्तु परमार्थतः कर्त्रादिविशेषवत्तच्छून्यं चेत्युभयथा द्रष्टुं शक्यते । अवश्यं ह्यन्यतरन्मिथ्या स्यात् । अन्यतरस्य च मिथ्यात्वप्रसङ्गे युक्तं यत्स्वाभाविकाज्ञानविषयस्य द्वैतस्य मिथ्यात्वम् । "यत्र हि द्वैतमिव भवति" "मृत्योः स मृत्युमाप्नोति" "अथ यत्रान्यत्पश्यति तदल्पम्" "अन्योऽसावन्योऽहमस्मि" "उदरमन्तरं कुरुते अथ तस्य भयं भवति" इत्यादिश्रुतिशतेभ्यः ॥**

**भाष्यार्थ**— विद्या व कर्म यांचा विरोध असल्यामुळें त्यांच्या समुच्चयाची अनुपपत्ति आहे. कारण ज्यांत कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकविशेषांचा पूर्णपणें लय झाला

आहे, असें तत्त्व हाच जिचा विषय आहे, अशी विद्या आहे. त्यामुळें त्याहून विपरीत ( म्ह० लीन न झालेल्या ) कारकांनीं साध्य होणाऱ्या कर्माशीं तिचा विरोध आहे. कारण एकच वस्तु परमार्थतः कर्त्रादिविशेषयुक्त आहे व त्यांनीं रहित आहे, अशी दोन्ही प्रकारांनीं पाहतां येणें शक्य नाहीं. त्यांतील कांहीं तरी एक अवश्य मिथ्या असलें पाहिजे; आणि त्यांतील कोणत्या तरी एकाला मिथ्या ठरण्याचा प्रसंग आला असतां स्वाभाविक-अज्ञानविषय द्वैतालाच मिथ्यात्व असणें युक्त आहे. कारण 'ज्यावेळीं द्वैतसें होतें, तेव्हां इतरांपासून आपणाला भिन्न समजणारा एक दुसऱ्याला पाहतो, ऐकतो, इत्यादि ' 'जो या सृष्टींत भेद पाहतो तो मृत्यूच्या परंपरेंत पडतो.' 'जेथें भेद पाहतो तें अल्प ' ' हा निराळा, व मी निराळा आहें; ' ' जो थोडेंसेंहि अंतर पाहतो त्याला मोठें भय होतें, ' इत्यादि अर्थाच्या शेंकडों श्रुती आहेत.

**भाष्यं—सत्यत्वं चैकत्वस्य " एकधैवानुद्रष्टव्यम् " " एकमेवाद्वितीयम् " " ब्रह्मैवेदꣳसर्वम् " " आत्मैवेदꣳसर्वम् " इत्यादिश्रुतिभ्यः । न च संप्रदानादिकारकभेदादर्शने कर्मोपपद्यते । अन्यत्वदर्शनापवादश्च विद्याविषये सहस्रशः श्रूयते । अतो विरोधो विद्याकर्मणोः । अतश्च समुच्चयानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ—**तसेंच एकत्वाचें सत्यत्व युक्त आहे. कारण 'एका प्रकारानेंच अनुभवानुसार पहावें.' 'एकच व अद्वितीय;' 'ब्रह्मच हें सर्व आहे;' 'आत्माच हें सर्व आहे,' इत्यादि श्रुतींवरून त्याची सिद्धि होते. संप्रदानादि कारकभेदांचें अदर्शन झालें असतां कर्म उपपन्न होत नाहीं. ( म्ह० अमुक देवतेला उद्देशून हें अमुक द्रव्य मी देतों, अशा रीतीनें ज्याला द्यावयाचें तें संप्रदान, जें द्यावयाचें तें कर्म व जो देणारा तो कर्ता इत्यादि कारकांचा भेदच जर प्रतीत न झाला तर कर्म उपपन्न होत नाहीं. )=विद्याविषयामध्यें अन्यत्वदर्शनाचा—भेददृष्टीचा अपवाद हजारों ठिकाणीं केलेला आढळतो. यास्तव विद्या व कर्म यांचा विरोध आहे. त्यामुळेंच त्यांच्या समुच्चयाची अनुपपत्ति आहे. ( आतां यावर शंका घेऊन तिचेंच विवरण '**तत्र यदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें करितात—)

**भाष्यं—तत्र यदुक्तं संहताभ्यां विद्याकर्मभ्यां मोक्ष इति । अनुपपन्नं तत् । विहितत्वात्कर्मणां श्रुतिविरोध इति चेत् । यद्यपमृद्य कर्त्रादिकारकविशेषमात्मैकत्वविज्ञानं विधीयते सर्पादिभ्रान्तिविज्ञानोपमर्दकरज्ज्वादिविषयविज्ञानवत्प्राप्तः कर्मविधिश्रुतीनां निर्विषयत्वाद्विरोधः । विहितानि च कर्माणि । स च विरोधो न युक्तः । प्रमाणत्वाच्छ्रुतीनामिति चेन्न पुरुषार्थोपदेशपरत्वाच्छ्रुतीनाम् ॥**

**भाष्यार्थ**—आतां समुचित ज्ञानकर्मांच्या योगानें मोक्ष होतो, म्हणून जें तुम्हीं म्हटलें आहे (पृ. ९) तें अयोग्य आहे. ( जर कर्त्रादिकारकभेदाच्या सत्यांशाचा बाध करून ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला जात असेल तर कर्मविधि मिथ्यार्थ आहेत, असें होऊन त्यांना अप्रामाण्य प्राप्त होईल असें '**विहितत्वात्०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–)=कर्मांना विहितत्व असल्यामुळें श्रुतिविरोध हा दोष येतो, म्हणून म्हणाल तर [ या शंकेचेंच '**यदि०**' इत्यादि भाष्यानें विवरण–]='सर्पादिभ्रांतिविज्ञानाचा बाध करणाऱ्या रज्जुप्रभृतिविषयाच्या ज्ञानाप्रमाणें कर्त्रादिविशेष कारकांचा बाध करून आत्म्याच्या एकत्वज्ञानाचें विधान केलें जातें,' असें जर म्हटलें तर कर्मविधिश्रुतींना निर्विषयत्व येत असल्यामुळें विरोध प्राप्त होतो. पण कर्में विहित आहेत. त्यामुळें तो विरोध येणें युक्त नव्हे. कारण श्रुतींना प्रमाणत्व आहे, असें म्हणाल–तर तें बरोबर नाहीं. कारण श्रुतींना पुरुषार्थोपदेशपरत्व आहे. ( अध्ययनविधीनें ग्रहण केलेल्या श्रुतींचें प्रामाण्य पुरुषार्थोपदेशावर अवलंबून आहे, भेदाच्या सत्यत्वावर अवलंबून नाहीं. त्यामुळें सर्व प्राण्यांच्या प्रसिद्धीनेंच सिद्ध व सफल क्रिया करण्यास समर्थ अशा कारकादि भेदांचा स्वीकार करूनच प्रवृत्त झालेल्या श्रुतिवाक्यांचें प्रामाण्य बाधित होत नाहीं, असा भावार्थ. आतां वरील संक्षिप्त वाक्याचेंच विवरण '**विद्योपदेशपरा०**' इत्यादि भाष्यानें करितात–)

**भाष्यं—विद्योपदेशपरा तावच्छ्रुतिः संसारात्पुरुषो मोक्षयितव्य इति संसारहेतोरविद्याया विद्यया निवृत्तिः कर्तव्येति विद्याप्रकाशकत्वेन प्रवृत्तेति न विरोधः। एवमपि कर्त्रादिकारकसद्भावप्रतिपादनपरं शास्त्रं विरुध्यत एवेति चेन्न। यथाप्राप्तमेव कारकास्तित्वमुपादायोपात्तदुरितक्षयार्थं कर्माणि विदधच्छास्त्रं मुमुक्षूणां फलार्थिनां च फलसाधनं न कारकास्तित्वे व्याप्रियते। उपचितदुरितप्रतिबन्धस्य हि विद्योत्पत्तिर्नावकल्पते। तत्क्षये च विद्योत्पत्तिः स्यात्ततश्चाविद्यानिवृत्तिस्तत आत्यन्तिकः संसारोपरमः॥**

**भाष्यार्थ**—विद्योपदेशपर श्रुति तर पुरुषाला संसारापासून सोडवावें, म्हणून संसाराचा हेतु अशी जी अविद्या तिची विद्येनें निवृत्ति करण्यासाठीं विद्याप्रकाशक या रूपानें प्रवृत्त झाली आहे. त्यामुळें वरील विरोध येत नाहीं. 'अहोपण, असें जरी म्हटलें तरी कर्त्रादि कारकांच्या सद्भावाचें प्रतिपादन करण्यास प्रवृत्त झालेलें शास्त्र विरुद्ध होतेंच ( त्या शास्त्राशीं विरोध येतोच )' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण यथाप्राप्त ( स्वभावतःच प्राप्त ) कारकास्तित्वाचाच अंगीकार करून संचित पापाच्या क्षयाकरितां कर्मांचें विधान करणारें शास्त्र मुमुक्षू व फलेच्छू यांच्या फलाचें साधन आहे. तें कर्ता, कर्म इत्यादि कारकांचें अस्तित्व सिद्ध करावयास प्रवृत्त होत नाहीं. ज्याच्या

ठिकाणीं संचित पापरूप प्रतिबंध असतो त्याच्या ठिकाणीं विद्येची उत्पत्ति होऊं शकत नाहीं व त्या पापाचा क्षय झाला असतां विद्येची उत्पत्ति होते; तिच्यामुळें अविद्येची निवृत्ति होते आणि त्या अविद्यानिवृत्तीमुळें संसाराचा आत्यन्तिक म्ह० सकारण उपरम होतो. ( वर विद्येचा विषय सत्य व कर्मांचा विषय मिथ्या असल्यामुळें विद्या व कर्म यांचा विरोध स्वीकारून समुच्चयाचें निरसन केलें. आतां काम्य व कामी यांचा विषय असल्यामुळें विरोध कसा येतो, तें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–)

**भाष्यं—अपि चानात्मदर्शिनो ह्यनात्मविषयः कामः । कामयमानश्च करोति कर्माणि । ततस्तत्फलोपभोगाय शरीराद्युपादानलक्षणः संसारः । तद्व्यतिरेकेणाऽऽत्मैकत्वदर्शिनो विषयाभावात्कामानुत्पत्तिरात्मनि चानन्यत्वात्कामानुत्पत्तौ स्वात्मन्यवस्थानं मोक्ष इत्यतोऽपि विद्याकर्मणोर्विरोधः । विरोधादेव च विद्या मोक्षं प्रति न कर्माण्यपेक्षते ॥**

**भाष्यार्थ**—दुसरें असें कीं, अनात्मदर्शी जो असतो त्यालाच अनात्मविषयक काम असतो ( म्ह० आत्माभिन्न पदार्थ पाहणारा जो असतो त्यालाच आत्माभिन्न पदार्थांची इच्छा असते, ) आणि जो कामना करणारा असतो तोच कर्में करतो. त्यामुळें त्या कर्मांचें फळ भोगण्यासाठीं शरीरादिकांचें ग्रहण करणें एतद्रूप संसार प्राप्त होतो. पण त्याच्या उलट आत्म्याचें एकत्व पाहणारा जो असतो त्याच्या दृष्टीनें विषयांचाच अभाव झाल्यामुळें कामाची उत्पत्ति होत नाहीं आणि आत्म्यामध्यें अनन्य ( एकरूप ) होऊन राहिल्यामुळें कामाची अनुत्पत्ति झाली असतां स्वात्म्यामध्यें ( स्वरूपांत ) अवस्थित होणें, हाच मोक्ष आहे. त्यामुळेंहि विद्या व कर्म यांचा विरोध आहे [ समसमुच्चयाचें निरसन करून गुण-प्रधानभावानें समुच्चयपक्षाचेंहि निरसन '**विरोधादेव च०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=आणि विरोध असल्यामुळेंच विद्या मोक्ष हें फल देण्यासाठीं कर्मांची अपेक्षा करीत नाहीं. ( तर मग विद्येच्या जवळच म्ह० विद्याप्रकरणांत कर्मांचा पाठ कां केला आहे, असें कोणी विचारील म्हणून '**स्वात्मलाभे०**' इत्यादि सांगतात–)

**भाष्यं—स्वात्मलाभे तु पूर्वोपचितप्रतिबन्धापनयद्वारेण विद्याहेतुत्वं प्रतिपद्यन्ते कर्माणि नित्यानीति । अत एवास्मिन्प्रकरण उपन्यस्तानि कर्माणीत्यवोचाम । एवं चाविरोधः कर्मविधिश्रुतीनाम् । अतः केवलाया एव विद्यायाः परं श्रेय इति सिद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—पण स्वात्मलाभाकरितां पूर्वे संचित प्रतिबंधाचें निरसन करून त्याच्या द्वारा नित्य कर्में विद्येच्या हेतुत्वास प्राप्त होतात. ( म्ह० तीं विद्येचीं कारणें होतात. ) म्हणूनच या प्रकरणांत कर्मांचा उपन्यास केला आहे, असें आम्हीं म्हटलें आहे. अशा

प्रकारें कर्मांचें विधान करणाऱ्या श्रुतींचा आविरोध आहे. यास्तव केवल विद्येच्या योगानेंच परम श्रेय होतें, हें सिद्ध झालें. ( पण कर्मे विद्येचीं साधनें आहेत, असें ऐकून 'तर मग केवल गृहस्थाश्रमाचेंच अनुष्ठान करावें' असें कर्मजड '**एवं तर्हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–)

**भाष्यं—एवं तर्ह्याश्रमान्तरानुपपत्तिः । कर्मनिमित्तत्वाद्विद्योत्पत्तेः । गार्हस्थ्ये च विहितानि कर्माणीत्यैकाश्रम्यमेव । अतश्च यावज्जीवादिश्रुतयोऽनुकूलतराः ॥**

**भाष्यार्थ**—मग असें जर असेल तर गृहस्थावांचून इतर आश्रमांची अनुपपत्ति होते. कारण विद्येची उत्पत्ति कर्मांमुळेंच होते, आणि कर्में गृहस्थाश्रमामध्यें विहित आहेत; त्यामुळें एक-आश्रमत्वच आहे. ( म्ह० गृहस्थ हाच एक आश्रम आहे. ) आणि त्यामुळेंच 'यावज्जीव अग्निहोत्राचें हवन करावें' इत्यादि श्रुती अतिशय अनुकूल आहेत. ( पण श्रुति-स्मृत्यादिप्रमाणग्रंथांत इतर आश्रमांचेंहि विधान केलेलें असल्यामुळें व त्यांच्या कर्मांनाहि गृहस्थांच्या कर्मांप्रमाणें कर्मत्व असल्यामुळें वरील प्रश्न केवल ग्राम्य धर्मांविषयीं आसक्ति ठेवणाऱ्या लोकांकडूनच उद्भवणारा आहे, असें '**न कर्मानेकत्वात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–)

**भाष्यं—न । कर्मानेकत्वात् । न ह्यग्निहोत्रादीन्येव कर्माणि । ब्रह्मचर्यं तपः सत्यवदनं शमो दमोऽहिंसेत्येवमादीन्यपि कर्माणीतराश्रमप्रसिद्धानि विद्योत्पत्तौ साधकतमान्यसंकीर्णत्वाद्विद्यन्ते ध्यानधारणादिलक्षणानि च । वक्ष्यति च–"तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व" इति ॥**

**भाष्यार्थ**—हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण कर्में अनेक आहेत. अग्निहोत्रादि हींच कायतीं कर्में असें नाहीं. तर ब्रह्मचर्य, तप, सत्यभाषण, शम, दम, अहिंसा, इत्यादि दुसरींहि कर्में इतर आश्रमांकरितां प्रसिद्ध आहेत. तीं असंकीर्ण ( म्ह० हिंसादि दोषांनीं अमिश्र ) असल्यामुळें विद्योत्पत्तीचीं साधकतम ( म्ह० अतिशय सिद्धि करणारीं ) साधनें आहेत. तशींच ध्यान-धारणादिलक्षण कर्मेंहि साधकतम आहेत. वेद याच उपनिषदांत पुढें 'तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर' असें सांगणार आहे. [ याहि कारणानें कर्में विद्येचीं साधनें जरी असलीं तरी त्याकरितां गार्हस्थ्यच कांहीं आवश्यक नाहीं, असें '**जन्मान्तर०**' इत्यादि भाष्यानें सांगतात– ]

**भाष्यं—जन्मान्तरकृतकर्मभ्यश्च प्रागपि गार्हस्थ्याद्विद्योत्पत्तिसंभवात्कर्मार्थत्वाच्च गार्हस्थ्यप्रतिपत्तेः कर्मसाध्यायां च विद्यायां सत्यां गार्हस्थ्यप्रतिपत्तिरनर्थिकैव ॥**

**भाष्यार्थ**—जन्मान्तरीं केलेल्या कर्मांमुळें गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या पूर्वींहि विद्योत्पत्तीचा संभव असल्याकारणानें आणि गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर्मांकरितांच असल्यामुळें कर्मसाध्य विद्या प्राप्त झाली असतां गृहस्थाश्रमाचा अंगीकार करणें व्यर्थच आहे. [ कामी पुरुषांना गृहस्थाश्रमाचे धर्म अनुष्ठेय असले तरी ते सर्वांनाच अनुष्ठेय नसतात याविषयीं आणखी हेतु '**लोकार्थत्वाच्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—लोकार्थत्वाच्च पुत्रादीनाम् । पुत्रादिसाध्येभ्यश्चायं लोकः पितृलोको देवलोक इत्येतेभ्यो व्यावृत्तकामस्य नित्यसिद्धात्मलोकदर्शिनः कर्मणि प्रयोजनमपश्यतः कथं प्रवृत्तिरुपपद्यते। प्रतिपन्नगार्हस्थ्यस्यापि विद्योत्पत्तौ विद्यापरिपाकाद्विरक्तस्य कर्मसु प्रयोजनमपश्यतः कर्मभ्यो निवृत्तिरेव स्यात्। "प्रव्रजिष्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि" इत्येवमादिश्रुतिलिङ्गदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ**— तसेंच, पुत्रादि साधनें लोकांसाठीं आहेत. पुत्रादिक मानुषादि साधनांनीं साध्य होणाऱ्या—हा लोक, पितृलोक व देवलोक—या लोकांपासून ज्याची कामना व्यावृत्त झाली आहे ( ह्म० ज्याला पुत्रादिसाध्य लोकांची इच्छा नाहीं ) आणि जो नित्यसिद्ध आत्मलोकाला पहात आहे, (ज्याला आत्मलोक हेंच फल पाहिजे आहे) त्या—कर्मांचें कांहीं प्रयोजनच नाहीं; असें समजणाऱ्या पुरुषाची प्रवृत्ति कर्मांमध्यें कशी होऊं शकेल ? फार काय पण ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे, अशा पुरुषालाहि विद्या प्राप्त झाली असतां, विद्येच्या परिपाकामुळें विरक्त झालेल्या व कर्मांमध्यें प्रयोजन न पाहणाऱ्या त्याची कर्मांपासून निवृत्तिच होईल. कारण 'हे मैत्रेयि, मी या स्थानापासून सर्वसंगत्याग करून निघून जाणार आहें'बृ.४.५.२.सु.उ.पृ.७०१ इत्यादि श्रुतिलिंग दिसत आहे. [याप्रमाणें गार्हस्थ्य अनावश्यक असल्यामुळें त्याचें विकल्पानें अनुष्ठान होतें असें सांगितलें. पण विकल्पांतील दोन पक्षांचें बल समान नसल्यामुळें यावर '**कर्म प्रति श्रुतेः०**' इत्यादि भाष्यानें आक्षेप घेतात– )

**भाष्यं—कर्म प्रति श्रुतेर्यत्नाधिक्यदर्शनादयुक्तमिति चेदग्निहोत्रादिकर्म प्रति श्रुतेरधिको यत्नो महांश्च कर्मण्यायासोऽनेकसाधनसाध्यत्वादग्निहोत्रादीनाम् । तपोब्रह्मचर्यादीनां चेतराश्रमकर्मणां गार्हस्थ्येऽपि समानत्वादल्पसाधनापेक्षत्वाच्चेतरेषां न युक्तस्तुल्यवद्विकल्प आश्रमिभिस्तस्येति चेन्न। जन्मान्तरकृतानुग्रहात् ॥**

**भाष्यार्थ**— अहोपण, कर्मांचें विधान करण्याविषयीं श्रुतीचा अधिक यत्न दिसतो. त्यामुळें गृहस्थाश्रमाचा विकल्प समजणें अयुक्त आहे, ह्मणून म्हणाल म्हणजे अग्निहोत्रादिकर्मांचें विधान करण्यासाठीं श्रुतीचा अधिक यत्न आहे, व कर्मानुष्ठानामध्यें फार

आयास होतो; कारण अग्निहोत्रादि कर्मैं अनेक साधनांनीं साध्य होणारीं असतात. तसेंच तप, ब्रह्मचर्य, इत्यादि इतर आश्रमांचीं कर्मैं गृहस्थाश्रमांतहि समान असल्यामुळें (म्ह० तीं गृहस्थालाहि इतरांप्रमाणेंच अनुष्ठेय असल्यामुळें) व त्या इतर कर्मांना अल्प साधनांची अपेक्षा असल्यामुळें इतर आश्रमींशीं त्या आश्रमाचा एकसारखाच विकल्प करणें युक्त नव्हे; (गृहस्थाश्रमांत आयास फार, श्रुतीचाहि अग्निहोत्रादि गृहस्थ-कर्मांचें विधान करण्याकडेच सारा रोख व इतर आश्रमींचे धर्म गृहस्थालाहि अनुष्ठेय, तेव्हां अशा कठिण आश्रमाचा दुसऱ्या सोप्या आश्रमाशीं एकसारखाच विकल्प मानणें अयुक्त आहे. ज्या साधनांची योग्यता एकसारखी असते त्यांतील कोणतेंहि करावें, असा विकल्प करितां येतो. पण ज्यांची योग्यता अशी न्यूनाधिक असते त्या साधनांचा विकल्प संभवत नाहीं, असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं.)=कारण इतर आश्रमांवर जन्मान्तरकृत अनुग्रह असतो. ('जन्मान्तरकृता०' इत्यादि परिहाराचेंच विवरण '**यदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें करितात–)

**भाष्यं—यदुक्तं कर्माणि श्रुतेरधिको यत्न इत्यादि । नायं दोषः । यतो जन्मान्तरकृतमप्यग्निहोत्रादिलक्षणं कर्म ब्रह्मचर्यादिलक्षणं चानुग्राहकं भवति विद्योत्पत्तिं प्रति । येन जन्मनैव विरक्ता दृश्यन्ते केचित् । केचित्तु कर्मसु प्रवृत्ता अविरक्ता विद्याविद्वेषिणः । तस्माज्जन्मान्तरकृतसंस्कारेभ्यो विरक्तानामाश्रमान्तरप्रतिपत्तिरेवेष्यते ॥**

**भाष्यार्थ—**कर्माविषयीं श्रुतीचा अधिक यत्न दिसतो, इत्यादि जें म्हटलें आहे तो कांहीं दोष नव्हे. कारण जन्मान्तरीं केलेंलेंहि अग्निहोत्रादिरूप व ब्रह्मचर्यादिरूप कर्म विद्योत्पत्तीचें अनुग्राहक होतें. कारण कित्येक जन्मतःच विरक्त दिसतात व दुसरे कित्येक कर्मांमध्यें प्रवृत्त, अविरक्त व विद्येचा द्वेष करणारे आढळतात. यास्तव जन्मान्तरांतील संस्कारांमुळें विरक्त झालेल्या पुरुषांना गृहस्थेतर आश्रमाची प्राप्तिच इष्ट आहे.

**भाष्यं—कर्मफलबाहुल्याच्च । पुत्रस्वर्गब्रह्मवर्चसादिलक्षणस्य कर्मफलस्यासंख्येयत्वात् । तत्प्रति च पुरुषाणां कामबाहुल्यात्तदर्थः श्रुतेरधिको यत्नः कर्मसूपपद्यते । आशिषां बाहुल्यदर्शनादिदं मे स्यादिदं मे स्यादिति । उपायत्वाच्च । उपायभूतानि हि कर्माणि विद्यां प्रतीत्यवोचाम । उपायेऽधिको यत्नः कर्तव्यो नोपेये ॥**

**भाष्यार्थ**—तसेंच कर्मफलबाहुल्यामुळें म्हणजे पुत्र, स्वर्ग, ब्रह्मवर्चस इत्यादि रूप कर्मफलाला असंख्येयत्व असल्यामुळें (म्ह० त्या कर्मफलाची गणना करतां येत नसल्यामुळें) आणि त्या असंख्येय फलाकरितां पुरुषांच्या कामनाहि पुष्कळ असल्यामुळें त्यासाठीं

श्रुतीचा कर्मांविषयीं अधिक यत्न होणें, उचितच आहे. कारण हें मला असावें, हें मला मिळावें, इत्यादि प्रकारें मनुष्यांचे ठिकाणीं आशांचें बाहुल्य दिसतें. तसेंच कर्मांना विद्येचें उपायत्व असल्यामुळेंहि श्रुतीचा कर्मांविषयींचा अधिक यत्न उपपन्न होतो. कर्में विद्येचीं उपायभूत आहेत, हें आह्मीं वर ( पृष्ठ ४५. ) सांगितलें आहे. उपायासाठींच अधिक यत्न करावा लागतो; उपेयासाठीं नाहीं. (तात्पर्य कर्मांविषयींच्या यत्नाधिक्याची उपपत्ति अन्य रीतीनें लागत असल्यामुळें श्रुतीचा अधिक यत्न आश्रमांच्या विकल्पाचा विघात करूं शकत नाहीं, असा याचा भावार्थ. आतां गृहस्थाश्रमकर्मांना बहिरंगत्व व संन्यासाश्रमकर्मांना अन्तरंग विद्यासाधनत्व आहे, हा विशेष दाखविण्यासाठीं आणखी एका आक्षेपाचें उत्थापनपूर्वक निरसन करून प्रस्तुत विचाराचा उपसंहार '**कर्मनिमित्तत्वात्०**' इत्यादि भाष्यानें करितात–)

**भाष्यं—कर्मनिमित्तत्वाद्विद्याया यत्नान्तरानर्थक्यमिति चेत्कर्मभ्य एव पूर्वोपचितदुरितप्रतिबन्धक्षयादेव विद्योत्पद्यते चेत्कर्मभ्यः पृथगुपनिषच्छ्रवणादियत्नोऽनर्थक इति चेत्। न। नियमाभावात्। न हि प्रतिबन्धक्षयादेव विद्योत्पद्यते न त्वीश्वरप्रसादतपोध्यानाद्यनुष्ठानादिति नियमोऽस्ति। अहिंसाब्रह्मचर्यादीनां च विद्यां प्रत्युपकारकत्वात्साक्षादेव च कारणत्वाच्छ्रवणमनननिदिध्यासनानाम्। अतः सिद्धान्याश्रमान्तराणि सर्वेषां चाधिकारो विद्यायां परं च श्रेयः केवलाया विद्याया एवेति सिद्धम्॥ इति शांकरभाष्ये द्वादशोऽनुवाकः॥ १२॥**

भाष्यार्थ—विद्येला कर्मनिमित्तत्त्व असल्यामुळें (म्ह० विद्या कर्मरूप निमित्तानें प्राप्त होणारी असल्यामुळें ) तिच्यासाठीं दुसरा यत्न करणें व्यर्थ आहे, असें जर ह्मणाल—ह्मणजे कर्मांपासूनच पूर्वसंचित पापरूप प्रतिबंधाचा क्षय झाल्यामुळेंच विद्येची उत्पत्ति जर होत असेल तर कर्मांहून पृथक् उपनिषच्छ्रवणादिकांविषयीं यत्न करणें व्यर्थ आहे, ह्मणून जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तशा नियमाचा अभाव आहे. केवल प्रतिबंधाचा क्षय झाल्यानेंच विद्या उत्पन्न होते व ईश्वरप्रसाद, तप, ध्यान, इत्यादिकांच्या अनुष्ठानानें होत नाहीं, असा कांहीं नियम नाहीं. कारण अहिंसा, ब्रह्मचर्य इत्यादि साधनें विद्येचीं उपकारक आहेत; आणि श्रवण , मनन व निदिध्यायन हीं तर विद्येचीं साक्षात्च कारणें आहेत. यास्तव इतर आश्रमांची सिद्धि झाली; विद्येचा अधिकार सर्वांना आहे, हेंहि ठरलें आणि केवल विद्येमुळेंच परम श्रेय होतें हेंहि सिद्ध झालें. **(इति शीक्षाध्याये द्वादशोऽनुवाकः)**

**इति कृष्णयजुर्वेदीयतैत्तिरीयोपनिषदि प्रथमः शीक्षाध्यायः समाप्तः॥**

# अथ द्वितीयो ब्रह्मवल्ल्यध्यायः ।

श्रुतिः—शं नो मित्रः शं वरुणः० ॥ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

अर्थ—आम्हां शिष्याचार्यांचें सह—बरोबरच रक्षण करो, आम्हांकडून सह भोग घेववो. आम्ही विद्यानिमित्त सामर्थ्य सह संपादन करूं व आम्हीं परस्पर विद्वेष न करावा. त्रिविध तापांची शांति होवो. 'शं नो मित्रः०' या शांतीचा अर्थ मागें पृ. १२वर पहा.

भाष्यं—"शं नो मित्रः०"इत्याद्यतीतविद्याप्राप्त्युपसर्गप्रशमनार्था शान्तिः पठिता । इदानीं तु वक्ष्यमाणब्रह्मविद्याप्राप्त्युपसर्गोपशमनार्था शान्तिः पठ्यते शं नो मित्र इति सह नाववत्विति च । शं नो मित्र इत्यादि पूर्ववत्स्पष्टम् । सह नाववतु—नौ शिष्याचार्यौ सहैवावतु रक्षतु । सह नौ भुनक्तु भोजयतु । सह वीर्यं विद्यादिनिमित्तं सामर्थ्यं करवावहै । निर्वर्तयावहै । तेजस्वि नावावयोस्तेजस्विनोरधीतं स्वधीतमस्तु । अर्थज्ञानयोग्यमस्त्वित्यर्थः । मा विद्विषावहै विद्याग्रहणनिमित्तं शिष्यस्याऽऽचार्यस्य वा प्रमादकृतादन्यायाद्विद्वेषः प्राप्तस्तच्छमनायेयमाशीर्मा विद्विषावहा इति । मैवेतरेतरं विद्वेषमापद्यावहै । शान्तिः शान्तिः शान्तिरिति त्रिर्वचनमुक्तार्थम् । वक्ष्यमाणविद्याविघ्नप्रशमनार्थं चेयं शान्तिः । अविघ्नेनाऽऽत्मविद्याप्राप्तिराशास्यते तन्मूलं हि परं श्रेय इति ॥

भाष्यार्थ—[दोन शांतीचें अपुनरुक्तत्व सांगतात—] 'शं नो मित्रः ०' इत्यादि शांति मागील विद्येच्या प्राप्तीला होणारे जे उपसर्ग त्यांच्या शमनासाठीं पठली. आतां पुढील ब्रह्मविद्याप्राप्तीच्या उपसर्गांचें शमन व्हावें म्हणून 'शं नो मित्रः०'व'सह नाववतु०' अशी शांति पढतात. त्यांतील 'शं नो मित्रः०' हि शांति पूर्वीप्रमाणेंच स्पष्ट आहे. (यास्तव 'सह नौ अवतु०' याचा अर्थ सांगतों—) 'नौ सह अवतु'—आह्मां—शिष्य व आचार्य यांचें एकाच वेळीं रक्षण करो. 'नौ सह भुनक्तु'—आह्मांकडून एकाच वेळीं भोग घेववो. 'वीर्यं सह करवावहै'—आह्मीं दोघे विद्यादिनिमित्तक सामर्थ्य बरोबर संपादन करूं.'नौ अधीतं तेजस्वि अस्तु'—आह्मां तेजस्व्यांचें अध्ययन स्वधीत—तेजस्वी असो. म्हणजे अर्थज्ञानास योग्य असो. 'मा विद्विषावहै'—आह्मीं परस्परांचा द्वेष न करावा. शिष्याचा विद्याग्रहणामुळें उद्भवणारा द्वेष व आचार्याचा प्रमादकृत अन्यायामुळें द्वेष प्राप्त आहे. त्या दोन्ही

प्रकारच्या द्वेषाचें शमन व्हावें, ह्मणून 'मा विद्विषावहै' हा आशीर्वाद आहे. आह्मीं परस्परांचा द्वेष करावयास प्रवृत्त न व्हावें. वर सांगितलेल्या कारणानें 'ॐ शांतिः शांतिः शांतिः' असें तीन वेळ म्हटलें आहे. ही शांति पुढें सांगितल्या जाणाऱ्या विद्येच्या विघ्नांचें प्रशमन व्हावें, ह्मणून आहे. या शांतीनें 'आत्मविद्येची प्राप्ति निर्विघ्नपणें व्हावी,' अशी आशा केली जाते.कारण परम श्रेय आत्मविद्यामूलकच आहे. (मागें होऊन गेलेल्या अर्थांचा अनुवाद करून आनंदवल्लीचें '**संहिता०**' इत्यादि भाष्यानें तात्पर्य सांगतात–)

**भाष्यं— संहितादिविषयाणि कर्मभिरविरुद्धान्युपासनान्युक्तानि । अनन्तरं चान्तःसोपाधिकात्मदर्शनमुक्तं व्याहृतिद्वारेण स्वाराज्यफलम् । न चैतावताऽशेषतः संसारबीजस्योपमर्दनमस्तीत्यतोऽशेषोपद्रवबीजस्याज्ञानस्य निवृत्त्यर्थं विधूतसर्वोपाधिविशेषात्मदर्शनार्थमिदमारभ्यते ब्रह्मविदाप्नोति परमित्यादि ॥**

**भाष्यार्थ**— कर्मांशीं विरुद्ध नसलेलीं संहितादिविषयक उपासनें ( शिक्षाध्यायांत आरंभीं ) सांगितलीं. त्यानंतर हृदयांत व्याहृतींच्या द्वारा स्वाराज्य हें फल देणारें सोपाधिक आत्मदर्शन सांगितलें. पण तेवढ्यानें संसारबीजाचें अशेषतः म्ह० पूर्णपणें उपमर्दन होत नाहीं. यास्तव सर्व उपद्रवांचें बीज जें अज्ञान त्याच्या निवृत्तीकरितां सर्व प्रकारच्या उपाधींनीं रहित अशा आत्मदर्शनासाठीं 'ब्रह्मविदाप्नोति परं०' इत्यादि हें पुढील प्रकरण आरंभिलें जात आहे. ("अहोपण, पूर्वी 'स्वाराज्यास प्राप्त होतो' असें संसारविषयकच अपर विद्याफल सांगितलें. तसेंच 'सोऽश्नुते सर्वान् कामान् सह' असें संसारविषयकच–सर्व विषयसाध्य आनंद हेंच पर विद्येचें फल पुढें श्रुति सांगेल. तेव्हां आत्यंतिक संसाराभाव कसा?" अशी आशंका घेऊन '**प्रयोजनं च०**' इत्यादि सांगतात–)

**भाष्यं— प्रयोजनं चास्या ब्रह्मविद्याया अविद्यानिवृत्तिस्तत आत्यन्तिकः संसाराभावः । वक्ष्यति च–" विद्वान्न बिभेति कुतश्चन " इति । संसारनिमित्ते च सत्यभयं प्रतिष्ठां च विन्दत इत्यनुपपन्नम् । " कृताकृते पुण्यपापे न तपतः " इति च । अतोऽवगम्यतेऽस्माद्विज्ञानात्सर्वात्मब्रह्मविषयादात्यन्तिकः संसाराभाव इति ।**

**भाष्यार्थ**— या ब्रह्मविद्येचें प्रयोजन अविद्यानिवृत्ति आहे. तिच्या योगानें संसाराचा आत्यन्तिक अभाव होतो ( आत्यन्तिक म्ह० कारणासह ) 'विद्वान् कोणत्याहि निमित्तानें भीत नाहीं,'सु.उ.पृ.२३३असें पुढें सांगतीलच. संसाराचें निमित्त विद्यमान असतांना 'निर्भय प्रतिष्ठेस प्राप्त होतो,' सु. उ. पृ. २२६ हें म्हणणें अनुपपन्न आहे. 'कृत पाप व अकृत पुण्य त्याला ताप देत नाहींत' सु.उ.पृ.२३४असेंहि पुढें म्हणणार आहेत. त्यावरून 'या सर्वात्मब्रह्मविषयक विज्ञानामुळें संसाराचा आत्यन्तिक अभाव

ब्रह्मप्राप्त्यर्थ नाहीं असें होतें. यास्तव व्यवहारांत तो नास्तिक असन्-असाधू म्हटला जातो. ( सन्मार्ग कांहीं कामाचा नाहीं, असें जाणणाऱ्या नास्तिकाला लोक असाधु-असत्-पुरुष असें म्हणतात. त्यामुळें ब्रह्म नाहीं असें म्हणणारा पुरुष असत् ठरतो; ) =पण त्याच्या अगदीं उलट असलेला जो 'ब्रह्म आहे,' असें जाणतो तो सन् होय. ज्या अर्थी तो त्या ब्रह्माच्या प्राप्तीला कारण होणाऱ्या वर्णाश्रमादिव्यवस्थालक्षण सन्मार्गाला श्रद्धालुत्वामुळें यथावत् जाणतो त्याअर्थी त्याला दुसरे साधु लोक ( शिष्ट ) 'सन्त' म्ह० साधुमार्गस्थ ( शिष्टांच्या मार्गानें चालणारा ) समजतात. यास्तव ब्रह्म आहे, असेंच जाणावें, असा वाक्यार्थ आहे.

**श्रुतिः—तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य । अथातोऽनुप्रश्नाः ।।**

**अर्थ**—त्या पूर्व विज्ञानमयाचा हाच शारीर आत्मा आहे. हा कोण ? जो आनंदमय. आतां त्या अर्थी असे अनुप्रश्न आहेत.

**भाष्यं—तस्य पूर्वस्य विज्ञानमयस्यैष एव शरीरे विज्ञानमये भवः शारीर आत्मा । कोऽसौ । य एष आनन्दमयः । तं प्रति नास्त्याशङ्का नास्तित्वे । अपोढसर्वविशेषत्वात्तु ब्रह्मणो नास्तित्वं प्रत्याशंका युक्ता । सर्वसामान्याच्च ब्रह्मणः । यस्मादेवमतस्तस्मात्, अथानन्तरं श्रोतुः शिष्यस्यानुप्रश्ना आचार्योक्तिमन्वेते प्रश्ना अनुप्रश्नाः ।।**

**भाष्यार्थ**—'त्या पूर्व विज्ञानमयाचा हाच विज्ञानमय शरीरांत होणारा-शारीर आत्मा आहे.' हा कोण ? तर 'जो हा आनन्दमय.' (कित्येक वरील मंत्र आनन्दमयाचा प्रकाशक आहे असें समजतात. यास्तव त्यांचें निराकरण '**तं प्रति०**' या भाष्यानें करितात-)= त्याच्या नास्तित्वाविषयीं तर मुळीं शंकाच नाहीं. (कारण आनन्दमय सविशेष असल्यामुळें प्रत्यक्ष आहे.)पण ब्रह्म सर्वविशेषशून्य असल्यामुळें त्याच्या नास्तित्वाविषयीं शंका येणें योग्य आहे. तसेंच ब्रह्म सर्वांना समान असल्यामुळें ( त्याचा सर्वांना व्यवहार करतां येणें शक्य आहे; पण तसा अनुभव मात्र कोठेंहि नाहीं. त्यामुळेंहि 'तें नाहीं ' अशी त्याच्या नास्तित्वाची शंका येते. )=आणि 'ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी आतां यानंतर श्रोत्या शिष्याचे हे अनुप्रश्न म्ह० आचार्यांच्या उक्तीनंतर हे प्रश्न आहेत.'

**श्रुतिः—उताविद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चन गच्छती३ । आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चित्समश्नुता३ उ ।।**

**अर्थ**— कोणीहि अविद्वान् सुद्धां या शरीरांतून निघून जाऊन परमात्म्याला पोंचतो ? कीं नाहीं ? कीं कोणी विद्वान् ब्रह्मवेत्ताहि या शरीरांतून निघून जाऊन त्या लोकास-परमात्म्याला प्राप्त होतो ? कीं नाहीं ?

**भाष्यं—सामान्यं हि ब्रह्माऽऽकाशादिकारणत्वाद्विदुषोऽविदुषश्च। तस्मादविदुषोऽपि ब्रह्मप्राप्तिराशङ्क्यते। उतापि। अविद्वानमुं लोकं परमात्मानमितः प्रेत्य कश्चन। चनशब्दोऽप्यर्थे। अविद्वानपि गच्छति प्राप्नोति किंवा न गच्छतीति द्वितीयोऽपि प्रश्नो द्रष्टव्योऽनुप्रश्ना इति बहुवचनात्॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्म आकाशादिकांचें ( भूतविशिष्ट सर्व जीवांचें ) कारण असल्यामुळें विद्वान् व अविद्वान् या उभयतांनाहि तुल्य आहे. यास्तव अविद्वानालाहि ब्रह्मप्राप्ति होते अशी शंका घेतली जाते. 'उत' म्ह० अपि—हि; अविद्वान्-हि त्या लोकास म्ह० परमात्म्याला या लोकाहून—या शरीरांतून निघून जाऊन पोंचतो—प्राप्त होतो कीं नाहीं? 'कश्चन' यांतील 'चन' हा शब्दहि 'अपि' या अर्थीं आहे व 'कश्चन' हें पद अविद्वान् या पदाशीं संबंध ठेवतें. त्यामुळें १ कोणी अविद्वान्सुद्धां ब्रह्माला प्राप्त होतो, २ कीं नाहीं? असा दुसराहि प्रश्न येथें आहे, असें जाणावें. कारण वर 'अनुप्रश्नाः' असें बहुवचन आहे.

**भाष्यं—विद्वांसं प्रत्यन्यौ प्रश्नौ। यद्यविद्वान्सामान्यं कारणमपि ब्रह्म न गच्छति ततो विदुषोऽपि ब्रह्मागमनमाशङ्क्यते। अतस्तं प्रति प्रश्न आहो विद्वानिति। विद्वान्ब्रह्मविदपि कश्चिदितः प्रेत्यामुं लोकं समश्नुते उ इत्येवं स्थिते यादेशे यलोपे च कृतेऽकारस्य प्लुतिः समश्नुता३ उ इति। उकारं च वक्ष्यमाणमधस्तादपकृष्य तकारं च पूर्वस्मादुतशब्दाद्ध्यासज्याऽऽहो इत्येतस्मात्पूर्वमुतशब्दं संयोज्य पृच्छ्यत उताऽहो विद्वानिति। विद्वान्समश्नुतेऽमुं लोकम्। किंवा यथाऽविद्वानेवं विद्वानपि न समश्नुत इत्यपरः प्रश्नः॥**

**भाष्यार्थ**—तसेंच विद्वानाकरितां, विद्वानाला उद्देशून दुसरे दोन प्रश्न आहेत. जर अविद्वान् ( विद्वान् व अविद्वान् या उभयतांचें ) साधारण कारण असलेल्याहि ब्रह्माला प्राप्त होत नाहीं तर विद्वान्हि ब्रह्माला जाऊं शकणार नाहीं, अशी आशंका घेतली जाते. यास्तव त्या विद्वानाला उद्देशून 'आहो विद्वान्०' हा प्रश्न आहे. कोणी विद्वान् ब्रह्मवेत्ताहि या लोकाहून किंवा या शरीरांतून निघून जाऊन त्या लोकाला म्ह० परमात्म्याला प्राप्त होतो का? मूळ उपनिषदांत 'समश्नुता३ उ' असा पाठ आहे. त्याचीं पदें 'समश्नुते उ' अशीं आहेत. पण 'ते' यांतील एच्या पुढें 'उ' आल्यामुळें एचा अय् झाला. नंतर पुढें 'उ' असल्यामुळें पाणिनीच्या 'लोपः शाकल्यस्य' या सूत्रानें 'य-'चा लोप झाला. तेव्हां 'समश्नुत उ' असें राहिलें. नंतर 'त' या अक्षरांतील अकार प्लुत केला. त्यामुळें 'समश्नुता३ उ' असा पाठ झाला. 'उ' हा पुढील उकार मागें ओढून घेऊन आणि पूर्वीच्या 'उत-'शब्दांतील तकार त्याला जोडून झालेल्या 'उत-'शब्दाचीं

'आहो' याच्या पूर्वी योजना करून, त्यांचा संयोग करून शिष्य 'उताहो विद्वान्' इत्यादि प्रश्न करीत आहे. विद्वान् या आत्माला जातो का? कीं 'जसा अविद्वान् तसाच विद्वान्-हि त्याला प्राप्त होत नाहीं?' असा दुसरा प्रश्न. (मिळून अविद्वानाविषयीं दोन व विद्वानाविषयीं दोन असे चार प्रश्न होतात.)

**भाष्यं—द्वावेव वा प्रश्नौ विद्वदविद्वद्विषयौ । बहुवचनं तु सामर्थ्यप्राप्तप्रश्नान्तरापेक्षया घटते । "असद्ब्रह्मेति वेद चेत् । अस्ति ब्रह्मेति चेद्वेद" इति श्रवणादस्ति नास्तीति संशयस्ततोऽर्थप्राप्तः किमस्ति नास्तीति प्रथमोऽनुप्रश्नः । ब्रह्मणोऽपक्षपातित्वादविद्वान्गच्छति न गच्छतीति द्वितीयः । ब्रह्मणः समत्वेऽप्यविदुष इव विदुषोऽप्यगमनमाशङ्क्यते । किं विद्वान्समश्नुते न समश्नुत इति तृतीयोऽनुप्रश्नः ॥**

**भाष्यार्थ**—किंवा विद्वान् व अविद्वान् यांतील प्रत्येकाविषयीं एकेक, असे दोनच प्रश्न समजावे. (पण मग 'अथातोऽनुप्रश्नाः' या बहुवचनाची उपपत्ति कशी लागणार? तर सांगतों—)=बहुवचन तर सामर्थ्यानें प्राप्त होणाऱ्या दुसऱ्या प्रश्नाच्या अपेक्षेनें उपपन्न होतें. (कोणत्या सामर्थ्यानें दुसरा प्रश्न प्राप्त होतो, तें सांगतात—)='असत् ब्रह्म असें जर जाणलें; ब्रह्म आहे असें जर जाणलें' इत्यादिश्रुतिवचनांत 'चेत्' म्ह० जर या संशयबोधक पदाचा प्रयोग केला आहे, त्यावरून दुसऱ्या पक्षीं ब्रह्म आहे व नाहीं, असा संशय येतो. त्यावरून 'काय ब्रह्म आहे, कीं नाहीं,' असा अर्थावरूनच प्राप्त झालेला पहिला अनुप्रश्न आहे. ब्रह्म पक्षपाती नसल्यामुळें अविद्वान् ब्रह्माला प्राप्त होतो व प्राप्त होत नाहीं, हा दुसरा अनुप्रश्न आहे. ब्रह्माला समत्व जरी असलें तरी अविद्वानाप्रमाणें विद्वानाच्याहि अगमनाविषयीं आशंका घेतली जाते. काय विद्वान् ब्रह्माला पोंचतो कीं पोंचत नाहीं, असा तिसरा अनुप्रश्न आहे.

**भाष्यं—एतेषां प्रतिवचनार्थमुत्तरग्रन्थ आरभ्यते । तत्रास्तित्वमेव तावदुच्यते । यच्चोक्तं "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" इति, तच्च कथं सत्यत्वमित्येतद्वक्तव्यमितीदमुच्यते सत्त्वोक्त्यैव सत्यत्वमुच्यते । उक्तं हि "सदेव सत्यम्" इति । तस्मात्सत्त्वोक्त्यैव सत्यत्वमुच्यते । कथमेवमर्थताऽवगम्यतेऽस्य ग्रन्थस्य शब्दानुगमात् । अनेनैव ह्यर्थेनान्वितान्युत्तराणि वाक्यानि । "तत्सत्यमित्याचक्षते" "यदेष आकाश आनन्दो न स्यात्" इत्यादीनि ॥**

**भाष्यार्थ**—त्या तीन प्रश्नांच्या प्रतिवचनाकरितां पुढील ग्रंथ आरंभिला जातो. त्यांपैकीं प्रथम त्याचें अस्तित्वच सांगितलें जातें—'सत्यं, ज्ञानं, अनन्तं ब्रह्म' असें जें सांगितलें आहे, तें सत्यत्व कसें, हें सांगितलें पाहिजे, असें जें म्हटलें होतें तेंच हें आतां

सांगितलें जात आहे. ब्रह्माच्या सत्त्वकथनानेंच त्याचें सत्यत्व सांगितलें आहे. ( म्ह० तें सत् आहे, असें म्हटल्यानेंच तें सत्य आहे, असें सिद्ध होतें.) 'सत्-च सत्य आहे,' असें वर सांगितलेंच आहे. तस्मात् सत्त्वकथनानेंच सत्यत्व सांगितलें जातें. पण या ग्रंथाला ' एवमर्थताच ' आहे म्ह० याचा हाच अर्थ, हें कसें कळतें? म्हणून विचाराल तर 'शब्दानुगमामुळें तें कळतें' (असें आम्ही सांगतों). 'तें सत्य आहे असें सांगतात; जर हा आकाश आनंद नसता,' इत्यादि पुढचीं वाक्यें याच अर्थाशीं अन्वित आहेत. (ब्रह्माचें अस्तित्व सिद्ध करणें म्ह० त्याच्या असत्त्वाची व्यावृत्ति करणेंच आहे, अशा आशयानें '**तत्रासदेव**० ' या भाष्यानें असत्त्वाशंका उत्थापित करितात–)

**भाष्यं—तत्रासदेव ब्रह्मेत्याशङ्क्यते । कस्मात् । यदस्ति तद्विशेषतो गृह्यते यथा घटादि । यन्नास्ति तन्नोपलभ्यते यथा शशविषाणादि । तथा नोपलभ्यते ब्रह्म । तस्माद्विशेषतोऽग्रहणान्नास्तीति । तन्न । आकाशादिकारणत्वाद्ब्रह्मणः । न नास्ति ब्रह्म कस्मादाकाशादि हि सर्वं कार्यं ब्रह्मणो जातं गृह्यते । यस्माच्च जायते किंचित्तदस्तीति दृष्टं लोके यथा घटाङ्कुरादिकारणं मृद्बीजादि तस्मादाकाशादिकारणत्वादस्ति ब्रह्म ॥**

**भाष्यार्थ—**त्या शंकांतील ' ब्रह्म असत्‌च आहे ' ही शंका घेतली जाते. ती कां? तर जें असतें त्याचें विशेषतः ग्रहण केलें जातें. जसे–घटादि पदार्थ. जें नसतें तें उपलब्ध होत नाहीं. जसें–शशविषाणादिक. तसेंच ब्रह्म उपलब्ध होत नाहीं. तस्मात् विशेषतः ग्रहण होत नसल्यामुळें ब्रह्म नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं. कारण ब्रह्म आकाशादिकांचें कारण आहे. ( आतां याच सूत्रभूत वाक्याचा विस्तार करितात–)=ब्रह्म नाहीं, असें नाहीं. कारण आकाशादिक सर्व कार्यजात ब्रह्मापासून झालें आहे, असें श्रुतीवरून प्रतीत होतें, आणि ज्याच्यापासून जें कांहीं कार्य होतें तें विद्यमान असतें, असें व्यवहारांत दिसतें. जसें–घट, अंकुर इत्यादि कार्यांचें कारण मृत्तिका, बीज इत्यादि. यास्तव ब्रह्म आकाशादिकांचें कारण असल्यामुळें आहे. ('आकाशादि सत्पूर्वक आहे. कारण त्याला कार्यत्व आहे, घटादिकांप्रमाणें,' अशा लौकिक व्याप्तीच्या आधारानें सत् कारण तर सिद्ध झालेंच. त्याला देशादिकांचें कारणत्व असल्यामुळें तें देशादिकांनीं अनवच्छिन्न आहे. त्यामुळें तें ब्रह्मपदवाच्य आहे, हें सिद्ध झालें. पण त्याचा विशेष उपलब्ध होत नसल्यामुळें त्याच्या अभावाची शंका येते. तिची ' कारणत्व ' या हेतूनें निवृत्ति केली जाते. पण आश्रयासिद्धीचा प्रसंग येत असल्यामुळें या कथनानें कारणत्वामुळें सत्त्व साधलें जातें, असा भावार्थ. '**न चासतः**० ' या भाष्यानें जगदुपादानाविषयीं असत्त्वाशंका करूं नये, याविषयीं आणखीं हेतु सांगतात–)

**भाष्यं—न चासतो जातं किंचिद्गृह्यते लोके कार्यम् । असतश्चेन्नामरूपादि कार्यं निरात्मकत्वान्नोपलभ्येत । उपलभ्यते तु । तस्मादस्ति ब्रह्म । असतश्चेत्कार्यं गृह्यमाणमप्यसदान्वितमेव तत्स्यात् । न चैवं । तस्मादस्ति ब्रह्म । तत्र कथमसतः सज्जायेतेति श्रुत्यन्तरमसतः सज्जन्मासंभवमन्वाचष्टे न्यायतः । तस्मात्सदेव ब्रह्मेति युक्तम् ॥**

**भाष्यार्थ—**कोणतेंहि कार्य असत्-पासून झालें आहे, असें दिसत नाहीं. असत्-पासून जर हें नाम-रूपादि कार्य झालेलें असतें तर तें निरात्मक असतें; आणि त्यामुळेंच उपलब्ध झालें नसतें. पण तें सर्व उपलब्ध होतें. यास्तव ब्रह्म आहे. असत्-पासून जर कार्य झालेलें असतें व त्याचा अनुभवहि आला असता तर तें असदन्वितच अनुभवास आलें असतें. (म्ह० प्रत्येक कार्य 'आहे, आहे' असा सदन्वित अनुभव न येतां तें 'नाहीं, नाहीं' असा असदन्वित अनुभव आला असता. पण तसा अनुभव येत नाहीं. यास्तव ब्रह्म आहे.) त्याविषयीं 'असत्-पासून सत् कसें होईल,' अशा अर्थाची दुसरी (छान्दोग्य) श्रुति असत्-पासून सत्च्या जन्माचा असंभव न्यायतः (कारण असत्चा अन्वय कार्यांत दिसत नाहीं, या युक्तीनें) सांगते. त्यामुळें ब्रह्म सत्च आहे, असें म्हणणें योग्य आहे. (याप्रमाणें असत्त्वाशंकेचें निरसन करून प्रसंगतः प्रधानवाद्याच्या अचेतनत्वाशंकेचें निरसन '**तद्यदि०**' या भाष्यानें करितात—)

**भाष्यं—तद्यदि मृद्बीजादिवत्कारणं स्यादचेतनं तर्हि, न, कामयितृत्वात् । न हि कामयित्रचेतनमस्ति लोके । सर्वज्ञं हि ब्रह्मेत्यवोचाम । अतः कामयितृत्वोपपत्तिः । कामयितृत्वादस्मदादिवदनाप्तकामं चेत्, न । स्वातन्त्र्यात् । यथाऽन्यान्परवशीकृत्य कामादिदोषाः प्रवर्तयन्ति न तथा ब्रह्मणः प्रवर्तकाः कामाः । कथं तर्हि सत्यज्ञानलक्षणाः स्वात्मभूतत्वाद्विशुद्धा न तैर्ब्रह्म प्रवर्त्यते । तेषां तु तत्प्रवर्तकं ब्रह्म प्राणिकर्मापेक्षया । तस्मात्स्वातन्त्र्यं कामेषु ब्रह्मणः । अतो नानाप्तकामं ब्रह्म ॥**

**भाष्यार्थ—**'अहो पण तें ब्रह्म जर मृत्तिका, बीज इत्यादिकांप्रमाणें कारण असेल तर तें अचेतन होईल' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्याला कामयितृत्व आहे. (म्ह. कामना करणें, हा चेतनाचा धर्म त्याच्या ठिकाणीं आहे. सांख्यांच्या मतीं चेतन निर्विकार असल्यामुळें त्याच्या कामयितृत्वाची जरी असिद्धि होते तरी लौकिक व्याप्तिबलानें त्याला कामयितृत्व असल्यामुळें अचेतनत्वशंका निवृत्त केली जाते, असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—)=व्यवहारांत कामना करणारें कोणीहि अचेतन नसतें. ब्रह्म सर्वज्ञ आहे, हें आम्हीं सांगितलें आहे. त्यामुळें त्याच्या कामयितृत्वाची उपपत्ति लागते. पण 'त्याला कामयितृत्व असल्यामुळें आम्हां पामरांप्रमाणें तें अनाप्तकाम

( अपूर्ण, अतृप्त, ज्याला सर्व भोग प्राप्त झालेले नाहींत असें ) आहे, असें होईल,' म्हणून म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण त्याला स्वातंत्र्य आहे. ज्याप्रमाणें कामादि दोष इतरांना परवश करून प्रवृत्त करितात त्याप्रमाणें काम ब्रह्माचे प्रवर्तक नाहींत; तर ते कसे आहेत? ते स्वात्मभूत असल्यामुळें सत्यज्ञानादिलक्षण व अत्यंत शुद्ध आहेत. त्यांच्याकडून ब्रह्म प्रवृत्त केलें जात नाहीं. उलट प्राण्यांच्या कर्मांच्या अपेक्षेनें तें ब्रह्मच त्यांचें प्रवर्तक आहे. तस्मात् ब्रह्माला कामाविषयीं स्वातन्त्र्य आहे. त्यामुळें ब्रह्म अनाप्त-काम नाहीं. ( पण ' शरीरादि-संबंधावांचून कामांचा उद्भव होत नाहीं. यास्तव कामना करणाऱ्या ब्रह्माला शरीर असतें, असें म्हणण्याचा प्रसंग येतो. ' अशी शंका घेऊन ' **साधनान्तरा०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात— )

**भाष्यं—साधनान्तरानपेक्षत्वाच्च । किंच यथाऽन्येषामनात्मभूता धर्मादि-निमित्तापेक्षाः कामाः स्वात्मव्यतिरिक्तकार्यकरणसाधनान्तरापेक्षाश्च न तथा ब्रह्मणो निमित्ताद्यपेक्षत्वं किं तर्हि स्वात्मनोऽनन्याः ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें ब्रह्माला दुसऱ्या साधनाची अपेक्षा नसते, ( कामसंस्कार-युक्त मायेचें ब्रह्माशीं तादात्म्य असल्यामुळें मायापरिणामरूप कामांचेंहि ब्रह्माशीं तादात्म्य असतें. त्यामुळें त्याला शरीरादि निमित्तांची अपेक्षा नाहीं, असा याचा भावार्थ. ) त्यामुळेंहि ते स्वतंत्र आहेत. म्ह० ज्याप्रमाणें इतर प्राण्यांचे काम (इच्छा) अनात्मभूत धर्मादिनिमित्तांची अपेक्षा करणारे व स्वात्म्याहून व्यतिरिक्त—दुसऱ्या देहेंद्रियादि साध-नांची अपेक्षा करणारे असतात त्याप्रमाणें ब्रह्माच्या कामनांना निमित्तादिकांची अपेक्षा नसते. तर ते स्वात्म्याहून अनन्य असतात.

**श्रुतिः—सोऽकामयत । बहु स्यां प्रजायेयेति । स तपोऽतप्यत । स तप-स्तप्त्वा । इदꣳसर्वमसृजत ।**

**अर्थ**—मीं बहु व्हावें, उत्पन्न व्हावें, अशी तो कामना करिता झाला, तो तप करिता झाला. तो तप करून हें सर्व उत्पन्न करिता झाला.

**भाष्यं—तदेतदाह सोऽकामयत स आत्मा यस्मादाकाशः संभूतोऽकामयत कामितवान् । कथं, बहु स्यां बहु प्रभूतं स्यां भवेयम् । कथमेकस्यार्थान्तराननु-प्रवेशे बहुत्वं स्यादित्युच्यते । प्रजायेयोत्पद्येय । न हि पुत्रोत्पत्त्येवार्थान्तर-विषयं बहुभवनं कथं तर्ह्यात्मस्थानभिव्यक्तनामरूपाभिव्यक्त्या । यदाऽऽत्मस्थे अनभिव्यक्ते नामरूपे व्याक्रियेते तदा नामरूपे आत्मस्वरूपापरित्यागेनैव ब्रह्म-णाऽप्रविभक्तदेशकाले सर्वावस्थासु व्याक्रियेते तदा तन्नामरूपव्याकरणं ब्रह्मणो बहुभवनम् । नान्यथा निरवयवस्य ब्रह्मणो बहुत्वापत्तिरुपपद्यतेऽल्पत्वं वा ॥**

**भाष्यार्थ**—आतां श्रुति तेंच सागते–ज्याच्यापासून आकाश हा पदार्थ उत्पन्न झाला 'सः'–तो आत्मा 'अकामयत'–कामना करता झाला. ती कशी? 'बहु स्यां' –मी बहु पुष्कळ व्हावें, अशी. पण एकाला दुसऱ्या पदार्थांत प्रवेश केल्यावांचून बहुत्व कसें संभवेल, अशी शंका येते, म्हणून 'प्रजायेय' असें म्हटलें आहे. 'प्रजायेय' म्हणजे उत्पन्न होतों. ब्रह्माचें हें बहुभवन–पुष्कळ होणें पुत्रोत्पत्तीप्रमाणें भिन्न पदार्थविषयक नाहीं; तर कसें? आत्म्यामध्येंच स्थित असलेल्या अव्यक्त नाम-रूपांना व्यक्त करून बहु होणें आहे. जेव्हां आत्मस्थ अव्यक्त नामरूपें व्यक्त केलीं जातात तेव्हां तीं नामरूपें सर्व अवस्थांमध्यें आत्मस्वरूपाचा परित्याग न करतांच ज्यांचा देश व काल ब्रह्माहून पृथक् नाहीं, अशींच व्यक्त केलीं जातात. त्यामुळें तें नाम-रूपव्याकरण [ म्ह० नामरूपाला व्यक्त करणें ) हेंच ब्रह्माचें बहुभवन आहे. त्यावांचून निरवयव ब्रह्माची बहुत्वापत्ति ( म्ह० बहु होणें ) किंवा अल्पत्व उपपन्न होत नाहीं.

**भाष्यं—यथाऽऽकाशस्याल्पत्वं बहुत्वं च वस्त्वन्तरकृतमेव । अतस्तद्द्वारेणैवाऽऽत्मा बहु भवति । न ह्यात्मनोऽन्यदनात्मभूतं तत्प्रविभक्तदेशकालं सूक्ष्मं व्यवहितं विप्रकृष्टं भूतं भवद्भविष्यद्वा वस्तु विद्यते । अतो नामरूपे सर्वावस्थे ब्रह्मणैवाऽऽत्मवती, न ब्रह्म तदात्मकम् । ते तत्प्रत्याख्याने न स्त एवेति तदात्मके उच्येते । ताभ्यां चोपाधिभ्यां ज्ञातृज्ञेयज्ञानशब्दार्थादिसर्वसंव्यवहारभाग्ब्रह्म ॥**

**भाष्यार्थ**— जसें आकाशाचें अल्पत्व किंवा बहुत्व दुसऱ्या वस्तूंमुळेंच संभवतें ( त्याप्रमाणें ब्रह्माचेंहि अल्पत्व व बहुत्व नाम-रूप-उपाधीमुळेंच संभवनीय आहे. ) यास्तव त्याच्या द्वाराच म्ह० नाम-रूपशक्त्यात्मकमायापरिणामाच्या द्वाराच आत्मा पुष्कळ होतो. आत्म्याहून पृथक्, अनात्मभूत त्याहून अगदीं भिन्न देश व काल यांत राहणारी, सूक्ष्म, आड असलेली, दूर असलेली, भूत, वर्तमान किंवा भविष्यत् वस्तु नाहीं. यास्तव सर्व अवस्थांमधील नामरूपें ब्रह्माच्या योगानेंच आत्मवन्त आहेत. [ तर मग ब्रह्म सप्रपंच–सविशेष होण्याचा प्रसंग येतो, अशी शंका घेऊन म्हणतात–] =' **न०** '–पण ब्रह्म तद्रूप नाहीं. ( कारण तें चेतन आहे. त्यामुळें नाम-रूपांच्या परिहारानेंहि त्याची सिद्धि होऊं शकते, असा याचा भावार्थ. "तर मग नाम-रूप ब्रह्मात्मक कसें?" '**ते तत्प्रत्याख्याने०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ब्रह्माचा निषेध केला असतां नाम-रूपांचा अभावच होतो. म्हणून नाम-रूपें ब्रह्मात्मक आहेत, असें म्हटलें आहे. [ स्वप्न पाहून उठलेल्या मनुष्याच्या आकाशभक्षणाप्रमाणें अनुभवाच्या प्रत्याख्यानानें आरोपित पदार्थांची सिद्धि संभवत नाहीं. त्यामुळें अनुभवाचा विषय, अशीं नाम-रूपें अनुभवात्मक ब्रह्मरूप आहेत, असें सांगितलें जातें. त्याचें ब्रह्माशीं ऐक्य आहे, अशा

आशयानें तसें सांगितलें जात नाहीं, असा याचा भावार्थ. ब्रह्माचें नुस्तें बहुरूपत्वच मायोपाधिक नाहीं तर सर्व व्यवहारास्पदत्वहि मायोपाधिक आहे, असें '**ताभ्यां चोपाधिभ्यां०** या भाष्यानें सांगतात–]=नाम व रूप या दोन उपाधींच्या योगानें ब्रह्म ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान इत्यादि शब्द व त्यांचे अर्थ इत्यादि सर्वांच्या उत्तम व्यवहाराला पात्र होतें.

**भाष्यं—स आत्मैवंकामः संस्तपोऽतप्यत । तप इति ज्ञानमुच्यते । "यस्य ज्ञानमयं तपः" इति श्रुत्यन्तरात् । आप्तकामत्वाच्चेतरस्यासंभव एव तपसः । तत्तपोऽतप्यत तप्तवान् । सृज्यमानजगद्रचनादिविषयामालोचनामकरोदात्मेत्यर्थः। स एवमालोच्य तपस्तप्त्वा प्राणिकर्मादिनिमित्तानुरूपमिदं सर्वं जगद्देशतः कालतो नाम्ना रूपेण च यथानुभवं सर्वैःप्राणिभिः सर्वावस्थैरनुभूयमानमसृजत सृष्टवान्॥**

**भाष्यार्थ—**तो आत्मा अशा कामनेनें युक्त होत्साता 'तप करता झाला.' 'तप' या पदानें ज्ञान सांगितलें जातें. कारण 'ज्याचें तप ज्ञानमय आहे' अशी दुसरी श्रुति आहे. त्याचप्रमाणें ब्रह्म आप्तकाम असल्यामुळें इतर तपाचा असंभवच आहे. तें ब्रह्म तप करतें झालें, म्ह० आत्मा उत्पन्न केल्या जाणाऱ्या जगाच्या रचनादिकांविषयीं आलोचन–विचार करता झाला, असा याचा अर्थ. 'तो असें आलोचन–तप करून' प्राण्यांच्या कर्मादि निमित्तांच्या अनुसार 'हें सर्व जगत् देशतः, कालतः, नामतः व रूपतः अनुभवानुसार–सर्व अवस्थांतील सर्व प्राण्यांकडून जसें अनुभविलें जात आहे तसें उत्पन्न करता झाला.'

**श्रुतिः—यदिदं किंच । तत्सृष्ट्वा । तदेवानुप्राविशत् ॥**

**अर्थ**–हें जें कांहीं आहे, तें उत्पन्न करून तो त्यांतच मागून प्रविष्ट झाला.

**भाष्यं—यदिदं किंच यत्किंचेदमविशिष्टम् । तदिदं जगत्सृष्ट्वा किमकरोदित्युच्यते–तदेव सृष्टं जगदनुप्राविशदिति । तत्रैतच्चिन्त्यं कथमनुप्राविशदिति । किं यः स्रष्टा स तेनैवाऽऽत्मनाऽनुप्राविशदुतान्येनेति, किं तावद्युक्तम् । क्त्वाप्रत्ययश्रवणाद्यः स्रष्टा स एवानुप्राविशदिति ॥**

**भाष्यार्थ—**'हें जें कांहीं सर्वसाधारण जगत् आहे तें हें जगत् उत्पन्न करून' त्यानें काय केलें, तें सांगतात–'त्याच उत्पन्न केलेल्या जगांत मागून तें प्रवेश करतें झालें.' (प्रवेश कसा झाला हें सांगतां येणें शक्य नाहीं, असें प्रकट करून जीवाला ब्रह्मरूपत्व असल्यामुळें प्रवेशवाक्याचें तात्पर्य दाखविण्यासाठीं '**तत्रैतत्** ०' या भाष्यानें विचाराचा आरंभ करितात–)=पण त्याविषयीं तें कसें प्रवेश करतें झालें, या गोष्टीचा विचार केला जातो. जो स्रष्टा तो त्याच रूपानें प्रवेश करता झाला कीं दुसऱ्या रूपानें? पण ह्या दोन पक्षांतील युक्त प्रश्न कोणता दिसतो? 'तत्सृ्वा' येथें 'त्वा' हा प्रत्यय असल्यामुळें जो

स्रष्टा तोच मागून प्रवेश करता झाला, हें युक्त दिसतें. ( संस्कृतांतील ' क्त्वा-'प्रत्ययाच्या जागीं मराठींत ' ऊन ' हा प्रत्यय होतो. ' क्त्वा-'प्रमाणेंच ऊनप्रत्ययान्त धातुसाधित अव्ययाचा कर्ता व मुख्य क्रियेचा कर्ता एकच असतो. जसें-' रामा जेवून गांवाला गेला ' या वाक्यांत रामा हें पद जेवून या 'ऊन-'प्रत्ययान्ताचा व गेला या मुख्य क्रियापदाचा कर्ता आहे. त्याच न्यायानें जगत् उत्पन्न करून त्यांत प्रवेश करणारा एकच आहे असा भावार्थ. यावर पूर्ववादी ' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें शंका घेतो-)

**भाष्यं—ननु न युक्तं मृद्वच्चेत्कारणं ब्रह्म तदात्मकत्वात्कार्यस्य। कारणमेव हि कार्यात्मना परिणतमित्यतोऽप्रविष्ट इव कार्योत्पत्तेरूर्ध्वं पृथक्कारणस्य पुनः प्रवेशोऽनुपपन्नः । न हि घटपरिणामव्यतिरेकेण मृदो घटे प्रवेशोऽस्ति ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण मृत्तिकेप्रमाणें ब्रह्म जर कारण असेल तर कार्य तदात्मक असल्यामुळें ब्रह्मच त्यांत प्रविष्ट झालें, हें म्हणणें युक्त नव्हे. [ सृष्टि व प्रवेश या क्रियांना पूर्वोत्तर कालीनत्व जर असेल तर ' त्वा-'प्रत्ययानें त्यांचा कर्ता एकच आहे, असा बोध होईल. पण प्रवेशाची उत्तरकालता संभवत नाहीं. कारण उपादान सृष्टिसमयींच कार्यरूपानें अवस्थित होतें. ' **कारणमेव०** ' या भाष्यानें याचेंच विवरण-]=कारणच कार्यरूपानें परिणाम पावलें आहे. यास्तव प्रविष्ट न झालेल्या दुसऱ्या एखाद्या पदार्थाप्रमाणें कार्योत्पत्तीच्या नंतर कारणाचा पुनरपि पृथक् प्रवेश अनुपपन्न आहे. कारण घटरूपानें परिणाम पावणें, यावांचून मृत्तिकेचा घटामध्यें प्रवेश होत नाहीं. [ अप्रविष्ट गृहादिकांत देवदत्ताचा प्रवेश झालेला जसा दिसतो त्याप्रमाणें कार्योत्पत्तीनंतर कारणाचा पृथक् प्रवेश संभवत नाहीं, असा भावार्थ. सिद्धान्ति-एकदेशीचें मत ' **यथा घटे०** ' इत्यादि भाष्यानें उत्थापित करून पूर्ववादी त्याला दूषित करितो-]

**भाष्यं—यथा घटे चूर्णात्मना मृदोऽनुप्रवेश एवमन्येनाऽऽत्मना नामरूपकार्येऽनुप्रवेश आत्मन इति चेच्छ्रुत्यन्तराच्च "अनेन जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्य" इति । नैवं युक्तमेकत्वादब्रह्मणः । मृदात्मनस्त्वनेकत्वात्सावयवत्वाच्च युक्तो घटे मृदश्चूर्णात्मनाऽनुप्रवेशः । मृदश्चूर्णस्याप्रविष्टदेशवत्त्वाच्च । न त्वात्मन एकत्वे सति निरवयवत्वादप्रविष्टदेशाभावाच्च प्रवेश उपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—' ज्याप्रमाणें घटामध्यें चूर्णरूपानें ( म्ह० धुळीच्या रूपानें ) मृत्तिकेचा मागून प्रवेश होतो त्याप्रमाणें अन्य स्वरूपानें आत्म्याचा नाम-रूपकार्यामध्यें अनुप्रवेश होतो, ' म्हणून म्हणाल आणि या ' जीवरूप आत्म्याच्या योगानें अनुप्रवेश करून ' अशी दुसरी श्रुतिहि आहे, असें म्हणाल, तर तसें होणें युक्त नाहीं. कारण ब्रह्माला एकत्व आहे. ( म्ह० तें एक आहे. ) मृत्तिकारूप कारणाला तर अनेकत्व व सावयवत्व

असल्यामुळें घटामध्यें मृत्तिकेचा धुळीच्या रूपानें अनुप्रवेश होणें युक्त आहे. शिवाय घटाची माती धुळीच्या प्रदेशांत प्रविष्ट झालेली नसते. ( तर ती धुळीच्या प्रदेशाहून निराळ्याच प्रदेशांत असते. त्यामुळें धुळीचा प्रवेश तिच्यामध्यें होऊं शकतो )=पण आत्म्याचा तसा प्रवेश उपपन्न होत नाहीं. कारण आत्मा एक असून निरवयव आहे आणि तो प्रविष्ट झालेला नाहीं, असा मुळीं देशच नाहीं. ( स्रष्टा किंवा दुसरा कोणी याचा प्रवेश जर संभवतच नाहीं तर मग प्रवेश कसा संभवतो असें सिद्धांति-एक-देशी '**कथं तर्हि**०' या भाष्यानें विचारतो—)

**भाष्यं—कथं तर्हि प्रवेशः स्यात्। युक्तश्च प्रवेशः श्रुतत्वात्तदेवानुप्राविशदिति। सावयवमेवास्तु तर्हि सावयवत्वान्मुखे हस्तप्रवेशवन्नामरूपकार्ये जीवात्मनाऽनुप्रवेशो युक्त एवेति चेन्नाशून्यत्वात्। न हि कार्यात्मना परिणतस्य नामरूपकार्यदेशव्यतिरेकेणाऽऽत्मशून्यः प्रदेशोऽस्ति यं प्रविशेज्जीवात्मना। कारणमेव चेत्प्रविशेज्जीवात्मत्वं जह्याद्यथा घटो मृत्प्रवेशे घटत्वं जहाति। तदेवानुप्राविशदिति च श्रुतेर्न कारणानुप्रवेशो युक्तः ॥**

**भाष्यार्थ—**तर मग त्याचा प्रवेश कसा होणार? 'तदेवानुप्राविशत्' म्ह० त्यांतच मागून प्रवेश करता झाला, अशी श्रुति असल्यामुळें त्याचा प्रवेश होणें तर युक्त आहे. ( त्यामुळें प्रवेश नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. आतां तोच प्रवेशाची गति '**सावयवमेव**०' या भाष्यानें सांगतो. )=यास्तव तें ब्रह्म सावयवच असूं दे. तें सावयव असल्यामुळें मुखामध्यें जसा हस्तप्रवेश होतो त्याप्रमाणें त्याचा नाम-रूपकार्यामध्यें जीव-रूपानें अनुप्रवेश होणें युक्तच आहे, म्हणून म्हणाल तर ( पूर्ववादीच या मध्यस्थाच्या म्हणण्याचें निकारण '**न अशून्यत्वात्**०' या भाष्यानें करतो. )=तेंहि बरोबर नाहीं. कारण त्याला अशून्यत्व आहे. ( या संक्षिप्त वाक्याचेंच विवरण करितात—)=कार्यरूपानें परिणत झालेल्या ब्रह्माचा नाम-रूपात्मक कार्य हाच प्रदेश आहे. त्याहून निराळा आत्म-शून्य प्रदेशच नाहीं, कीं ज्यामध्यें तो जीवात्मरूपानें प्रवेश करील! ( कार्याकारानें परिणत झालेल्या ब्रह्माचा नाम-रूपात्मक कार्य हाच देश आहे, त्याहून अन्य देश नाहीं. कारण, कारणच कार्यरूपानें परिणत झालें आहे. यास्तव कार्याचा एक प्रकार असा जीवात्मा प्रवेश करूं शकेल, म्हणून जर म्हणाल तर )=कारणांतच जर त्यानें प्रवेश केला तर तो आपल्या जीवात्मत्वाचाच त्याग करील. जसा—घट मृत्तिकेंत प्रवेश करतांच घटत्वाचा त्याग करतो, त्याप्रमाणें. ( कार्यविशेषाचा प्रवेश मानून हें दूषण दिलें. पण श्रुतिविरोधामुळें कार्याचा प्रवेशच संभवत नाहीं, असें वादी '**तदेव**०' या भाष्यानें सांगतो—)=शिवाय 'त्या कार्यांतच मागून प्रवेश करता झाला,' अशी श्रुति असल्यामुळें

कारणामध्यें अनुप्रवेश युक्त नव्हे. [ आतां पूर्वपक्षवादीच मध्यस्थाच्या मताचा ' कार्यान्तरमेव० ' या भाष्यानें अनुवाद करून त्यावर दूषण देतो–]

**भाष्यं—कार्यान्तरमेव स्यादिति चेत्। तदेवानुप्राविशदिति जीवात्मरूपं कार्यं नामरूपपरिणतं कार्यान्तरमेवाऽऽपद्यत इति चेन्न। विरोधात्। न हि घटो घटान्तरमापद्येत। व्यतिरेकश्रुतिविरोधाच्च। जीवस्य नामरूपकार्यव्यतिरेकानुवादिन्यः श्रुतयो विरुध्येरन्। तदापत्तौ मोक्षासंभवाच्च। न हि यतो मुच्यमानस्तदेवाऽऽपद्यते। न हि शृंखलापत्तिर्बद्धस्य तस्करादेः॥**

**भाष्यार्थ:**—प्रवेश करणारें दुसरें कार्यच आहे, असें ह्मणाल म्ह० 'तदेवानुप्राविशत्' –तेंच कारण मागून त्या कार्यात प्रविष्ट झालें, या श्रुतीचा अर्थ–जीवात्मरूप कार्य नाम-रूपांच्या आकारानें परिणत झालेल्या दुसऱ्या कार्यास प्राप्त होतें, ह्मणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्याच्याशीं विरोध येतो. घटच कांहीं दुसऱ्या घटास प्राप्त होत नाहीं. तसाच व्यतिरेकप्रतिपादक श्रुतीशींहि विरोध येतो. म्ह० जीव नाम-रूपात्मककार्याहून पृथक् आहे, असा अनुवाद करणाऱ्या श्रुतीशीं विरोध येतो. शिवाय जीव जर कार्यत्वास प्राप्त झाला तर त्याच्या मोक्षाचा असंभव होतो. कारण ज्याच्यापासून मुक्त होणार त्यालाच तो पाप्त होत नाहीं. ( जीव नाम-रूपात्मक कार्यापासून मुक्त होणारा आहे. त्यामुळें तो नाम-रूपात्मकच होणें युक्त नव्हे. )=तस्करादि बद्ध पुरुषाला शृंखलाभाव प्राप्त होत नसतो, हें प्रसिद्ध आहे. [ पुनः दुसऱ्या मध्यस्थाची '**बाह्यान्तर्भेदेन०**' इत्यादि शंका घेऊन पूर्ववादीच दोष देतो–]

**भाष्यं—बाह्यान्तर्भेदेन परिणतमिति चेत्तदेव कारणं ब्रह्म शरीराद्याधारत्वेन तदन्तर्जीवात्मनाऽऽधेयत्वेन च परिणतमिति चेन्न, बहिष्ठस्य प्रवेशोपपत्तेः। न हि यो यस्यान्तःस्थः स एव तत्प्राविष्ट उच्यते। बहिष्ठस्यानुप्रवेशः स्यात्प्रवेशशब्दार्थस्यैवं दृष्टत्वात्। यथा गृहं कृत्वा प्राविशदिति॥**

**भाष्यार्थ**—तें कारण बाह्य व अन्तर्भेदानें परिणत झालें आहे म्ह० तेंच कारण ब्रह्म शरीरादि आधाररूपानें व तदन्तर्गत जीवरूप आधेयरूपानें परिणत होतें, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण जो ज्याच्या बाहेर स्थित असतो त्याचाच त्यांत प्रवेश उपपन्न होतो. जो ज्याच्या आंत स्थित असतो तोच त्यांत प्रविष्ट झाला, असें म्हटलें जात नाहीं. त्याचप्रमाणें जो बाहेर स्थित असतो त्याचाच अनुप्रवेश होतो. कारण प्रवेश या शब्दाचा अर्थ असाच अनुभवास येतो. जसें–गृह करून त्यांत प्रविष्ट झाला. ( आतां वादी 'जलसूर्य०' इत्यादि भाष्यानें आणखीं एका वेदान्त्याच्या मताला उत्थापित करून त्यावर दोष देतो–)

**भाष्यं—जलसूर्यकादिप्रतिबिम्बवत्प्रवेशः स्यादिति चेन्न। अपरिच्छिन्नत्वादमूर्तत्वाच्च। परिच्छिन्नस्य मूर्तस्यान्यस्यान्यत्र प्रसादस्वभावके जलादौ सूर्यकादिप्रतिबिम्बोदयः स्यात्। न त्वात्मनः, अमूर्तत्वादाकाशादिकारणस्याऽऽत्मनः, अव्यापकत्वात्तद्विप्रकृष्टदेशप्रतिबिम्बाधारवस्त्वन्तराभावाच्च प्रतिबिम्बवत्प्रवेशो न युक्तः॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, जलामध्यें सूर्यादिकांच्या प्रतिबिंबाप्रमाणें प्रवेश होऊं शकेल,' म्हणून म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण ब्रह्म अपरिच्छिन्न व अमूर्त आहे. 'प्रसाद' या स्वभावानें युक्त असलेल्या दुसऱ्या जलादि पदार्थांमध्यें परिच्छिन्न, मूर्त (साकार) व भिन्न असलेल्या—सूर्यादिपदार्थांच्याच प्रतिबिंबाचा उदय होतो. आत्म्याचा नाहीं. कारण आकाशादिकांचें कारण असा तो आत्मा अमूर्त आहे, त्याचप्रमाणें आकाशादिकार्यें ब्रह्माच्या अपेक्षेनें अव्यापक आहेत; व त्याहून दूर देशीं असणाऱ्या प्रतिबिंबाधारभूत दुसऱ्या वस्तूचा अभाव आहे. त्यामुळेंहि ब्रह्माचा कार्यामध्यें प्रतिबिंबाप्रमाणें प्रवेश होणें युक्त नव्हे. (याप्रमाणें मध्यास्थांच्या—सिद्धान्त-एकदेशीयांच्या शंकांचें निरसन करून पूर्ववादी आपल्या पूर्वपक्षाचा उपसंहार '**एवं तर्हि०**' या भाष्यानें करतो-)

**भाष्यं—एवं तर्हि नैवास्ति प्रवेशो न च गत्यन्तरमुपलभामहे। "तदेवानुप्राविशत्" इति च श्रुतेः। श्रुतिश्च नोऽतीन्द्रियविषये विज्ञानोत्पत्तौ निमित्तम्। न चास्माद्वाक्याद्यत्नवतामपि विज्ञानमुत्पद्यते। हन्त तर्ह्यनर्थकत्वादपोह्यमेतद्वाक्यं "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" इति॥**

**भाष्यार्थ**—मग असें जर असेल तर त्याचा प्रवेशच होत नाहीं. (ब्रह्माचा प्रवेश तर नाहींच. पण त्याहून निराळ्या जीवाचाहि प्रवेश संभवत नाहीं, असें सांगितलें आहे. असें '**न च०**' या भाष्यानें सांगतात—)=आम्हांला दुसरी गतिहि उपलब्ध होत नाहीं व 'तेंच अनुप्रवेश करतें झालें,' अशी श्रुति आहे. (त्यामुळें इतराचाहि प्रवेश कल्पितां येत नाहीं, कारण ती श्रुति स्रष्ट्याचा प्रवेश सांगते. आम्हां मीमांसकांना ती प्रमाण आहे. त्यामुळें तिच्या विरुद्ध दुसऱ्याची प्रवेशकल्पना अयुक्त आहे, असा भावार्थ.) =अतीन्द्रिय विषयाचें ज्ञान होण्यास आम्हांला श्रुति हेंच निमित्त आहे. ('तर मग श्रुतीचा आश्रय करून ब्रह्माचाच प्रवेश माना.' '**न च०**' इत्यादि भाष्यानें याचें उत्तर—)=पण या वाक्यावरून मोठ्या यत्नशील पुरुषांनाहि कांहींच विज्ञान होत नाहीं. (तस्मात् 'आंधळ्याला रत्न सांपडलें, दिसलें' या वाक्याप्रमाणें हें वाक्य अर्थशून्य आहे, असें पूर्वपक्षाचें '**हन्त तर्हि०**' या भाष्यानें निगमन—)=यास्तव 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' हें वाक्य अर्थरहित असल्यामुळें निषेध करण्यास योग्य आहे. (या वाक्याचा शक्तिगोचर अर्थ संभवत नाहीं, म्हणून हें अर्थशून्य आहे कीं तात्पर्यगोचर

अर्थ संभवत नाहीं म्हणून! अमूर्त आकाशादिकांचें जलांत जसें प्रतिबिंब पडतें त्याप्रमाणें अनिर्वाच्य अविद्यांमध्यें प्रतिबिंबित झालेल्या अमूर्त ब्रह्माचेंहि सृष्टीनंतर अन्तःकरणादिकांत प्रतिबिंब संभवत असल्यामुळें शक्तिगोचर अर्थ संभवत नाहीं, असें म्हणतां येत नाहीं, असें सिद्धान्ती ' न० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-)

**भाष्यं—न । अन्यार्थत्वात् । किमर्थमस्थाने चर्चा । प्रकृतो ह्यन्यो विवक्षितोऽस्य वाक्यस्यार्थोऽस्ति स स्मर्तव्यः । " ब्रह्मविदाप्नोति परम् " " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " "यो वेद निहितं गुहायाम्" इति । तद्विज्ञानं च विवक्षितं प्रकृतं च तत् । ब्रह्मस्वरूपानुगमाय चाऽऽकाशाद्यन्नमयान्तं कार्यं प्रदर्शितं ब्रह्मानुगमश्चाऽऽरब्धः । तत्रान्नमयादात्मनोऽन्योऽन्तर आत्मा प्राणमयस्तदन्तर्मनोमयो विज्ञानमय इति विज्ञानगुहायां प्रवेशितस्तत्र चाऽऽनन्दमयो विशिष्ट आत्मा प्रदर्शितः ॥**

**भाष्यार्थ**— नाहीं; तसें मुळींच नाहीं. [ दुसरा पक्षहि संभवत नाहीं– ]=कारण त्या वाक्याचा अर्थ तुह्मी समजतां त्याहून निराळा आहे. [ याचेंच स्पष्टीकरण – ]= ही अस्थानीं चर्चा कशासाठीं करतां? कारण या वाक्याचा प्रकृत विवक्षित अर्थ अगदींच निराळा आहे. तो कोणता, याची आठवण केली पाहिजे. ' ब्रह्मवित् परब्रह्माला प्राप्त होतो; ' ' सत्य, ज्ञान व अनन्त ब्रह्म आहे; ' ' जो तें बुद्धिरूप गुहेंत अवस्थित आहे, असें जाणतो; ' अशा अर्थाच्या या अध्यायाच्या आरभींच्या वाक्यांवरून येथें ब्रह्माचें विज्ञान विवक्षित आहे व तें प्रकृतहि आहे. ब्रह्मस्वरूपाचा सर्वत्र अनुगम होतो, हें दाखविण्यासाठीं आकाशापासून अन्नमयापर्यंत कार्यांचें प्रदर्शन केलें आहे. ब्रह्माचा अनुगम ( ह्म० अनुवृत्ति ) आरंभिलेला आहे. त्यांत अन्नमय आत्म्याहून दुसरा अंतर आत्मा प्राणमय आहे. त्याच्या आंत मनोमय व विज्ञानमय सांगून विज्ञानगुहेमध्यें आत्म्याचा प्रवेश करविला व त्यांत आनन्दमय हा विशिष्ट आत्मा दाखविला आहे.

**भाष्यं—अतःपरमानन्दमयलिङ्गाधिगमद्वारेणाऽऽनन्दविवृद्ध्यवसान आत्मा ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा सर्वविकल्पास्पदो निर्विकल्पोऽस्यामेव गुहायामधिगन्तव्य इति तत्प्रवेशः प्रकल्प्यते ॥**

**भाष्यार्थ**—त्यापुढें आनन्दमय या लिंगाच्या ज्ञानाच्या द्वारा आनन्दाच्या विशेष वृद्धीमध्यें पर्यवसान पावणारा आत्माच ब्रह्म, पुच्छ, प्रतिष्ठा, सर्व विकल्पांचें आस्पद (स्थान,आधार),व निर्विकल्प आहे, आणि तो या गुहेमध्येंच जाणावा, अशा हेतूनें त्याचा प्रवेश कल्पिलेला आहे. ( बुद्धिगुहाप्रवेशानंतर आनंदमय हाच विशिष्ट अर्थ विशेष्य चिद्धातूचें लिंग आहे. कारण विशिष्ट अर्थ विशेष्याला सोडून कधींच कोठें उपलब्ध

होत नाहीं. वास्तव त्या विशिष्ट आनंदमयाच्या ज्ञानाच्या द्वारा आनंदाच्या विशेष वृद्धीची अवधि असा जो ब्रह्मरूप आत्मा तो याच गुहेंत जाणावा, अशा आशयानें जलांतील सूर्यप्रवेशाप्रमाणें त्याचा अनिर्वाच्य प्रवेश सांगितला जातो, असा याचा भावार्थ. बुद्धिरूप गुहेमध्येंच ब्रह्माची उपलब्धि संभवनीय असल्यामुळें त्या बुद्धींतच त्याचा प्रवेश सांगण्याची इच्छा केली आहे, असें भाष्यकार 'न हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–)

**भाष्य**—न ह्यन्यत्रोपलभ्यते ब्रह्म निर्विशेषत्वात्। विशेषसंबन्धो ह्युपलब्धि-हेतुर्दृष्टः। यथा राहोश्चन्द्रार्कविशिष्टसंबन्धः। एवमन्तःकरणगुहात्मसंबन्धो ब्रह्मण उपलब्धिहेतुः। संनिकर्षादवभासात्मकत्वाच्चान्तःकरणस्य। यथा चाऽऽलोकवि-शिष्टा घटाद्युपलब्धिरेवं बुद्धिप्रत्ययालोकविशिष्टात्मोपलब्धिः स्यात्तस्मादुपलब्धि-हेतौ गुहायां निहितमिति प्रकृतमेव। तद्वृत्तिस्थानीये त्विह पुनस्तत्सृष्ट्वा तदेवा-नुप्राविशदित्युच्यते॥

**भाष्यार्थ**—ब्रह्म निर्विशेष असल्यामुळें बुद्धीवांचून दुसऱ्या कोठेंहि उपलब्ध होत नाहीं. ('पण दुसऱ्या कोठेंहि उपलब्ध होण्यास योग्य नसलेलें ब्रह्म बुद्धींत तरी कसें उपलब्ध होतें? 'विशेषसंबंधः०' इत्यादि भाष्यानें 'उपाधीचा योग्यताविशेष संभवत असल्यामुळें' असें याचें उत्तर–)=कारण विशेषसंबंधच उपलब्धीचें निमित्त आहे, असें दिसतें. जसें राहूच्या उपलब्धीचें चंद्र व सूर्य यांचा विशिष्ट संबंध हेंच निमित्त आहे त्याप्रमाणें अन्तःकरणगुहा व आत्मा यांचा संबंध ब्रह्माच्या उप-लब्धीचा हेतु आहे. कारण अन्तःकरणाचें आत्म्याशीं सांनिध्य आहे. (अन्तःकरणाच्या संसर्गामुळेंच देह-घटादिकांमध्यें चैतन्याची अभिव्यक्ति होते. त्यावांचून स्वतःच होत नाहीं आणि अन्तःकरण अन्वय-व्यतिरेकन्यायानें साक्षात् चैतन्याचें अभिव्यंजक आहे, असा भावार्थ. ज्याप्रमाणें अस्वच्छ स्वभाव घटादिकांत मुख प्रतिबिंबत होत नाहीं पण स्वच्छस्वभाव जलादिकांत प्रतिबिंबित होतें, त्याप्रमाणें सत्त्वगुणप्रधान अन्तःकरणाचा प्रसाद हा स्वभावच असल्यामुळें त्यांत ब्रह्माची उपलब्धि होऊं शकते असें 'अवभासा-त्मकत्वाच्च०' या भाष्यानें सांगतात–)=तें अवभासात्मक आहे. (प्रकाश व अंधकार यांच्यामध्यें जडत्व जरी एकसारखेंच असलें तरी प्रकाश तमोरूप आवरणाला दूर कर-ण्यास समर्थ आहे, असें मानलें जातें, त्याचप्रमाणें अज्ञान व अन्तःकरण यांना एकसार-खेंच जाड्य जरी असलें तरी प्रत्ययाकारानें परिणत झालेल्या अन्तःकरणाचें अज्ञानरूप आवरणाचा नाश करण्याचें सामर्थ्य स्वीकारावें असें 'यथा०' इत्यादि भाष्यानें सांगतात–)=ज्याप्रमाणें घटादिकांची उपलब्धि म्ह० ज्ञान प्रकाशयुक्त असतें त्याप्रमाणें

बुद्धीच्या प्रत्ययरूप जो प्रकाश त्यानें विशिष्ट अशी आत्म्याची उपलब्धि होते. वास्तव उपलब्धीला [साक्षात्काराला] कारण होणाऱ्या गुहेंत ब्रह्म अवस्थित आहे, या वाक्यावरून तें प्रकृतच आहें, असें ठरतें; आणि त्या वाक्याच्या वृत्तीप्रमाणें म्ह० व्याख्येप्रमाणें असलेल्या या वाक्यांत 'तें उत्पन्न करून त्यांतच मागून प्रवेश करतें झालें' असें म्हटलें आहे

**श्रुतिः—तदनुप्रविश्य । सच्च त्यच्चाभवत् । निरुक्तं चानिरुक्तं च । निलयनं चानिलयनं च । विज्ञानं चाविज्ञानं च । सत्यं चानृतं च सत्यमभवत् । यदिदं किंच । तत्सत्यमित्याचक्षते । तदप्येष श्लोको भवति ॥ ६ ॥**

**अर्थ**—त्यांत मागून प्रवेश करून मूर्त-अमूर्त, समान-असमान, आश्रय-अनाश्रय, चेतन-अचेतन, व्यावहारिक सत्य-असत्य असें हें सर्व तें सत्यच झालें. तें सर्व सत्य ब्रह्म आहे, असें ब्रह्मवेत्ते म्हणतात. त्याअर्थी हा श्लोक आहे. ६

**भाष्यं—तदेवेदमाकाशादिकारणं कार्यं सृष्ट्वा तदनुप्रविष्टमिवान्तर्गुहायां बुद्धौ द्रष्टृ श्रोतृ मन्तृ विज्ञात्रित्येवं विशेषवदुपलभ्यते । स एव तस्य प्रवेशस्तस्मादस्ति तत्कारणं ब्रह्म । अतोऽस्तित्वादस्तीत्येवोपलब्धव्यं तत् । तत्कार्यमनुप्रविश्य, किं, सच्च मूर्तं त्यच्चामूर्तमभवत् । मूर्तामूर्ते ह्यव्याकृतनामरूपे आत्मस्थे अन्तर्गतेनाऽऽत्मना व्याक्रियेते व्याकृते मूर्तामूर्तशब्दवाच्ये ते आत्मना त्वप्रविभक्तदेशकाले इति कृत्वाऽऽत्मा ते अभवदित्युच्यते ॥**

**भाष्यार्थ**—याप्रमाणें तेंच हें आकाशादिकांचें कारण कार्याला उत्पन्न करून त्यांत मागून जणुंकाय प्रविष्टसें होऊन गुहा या नांवाच्या बुद्धींत पाहणारें, ऐकणारें, मनन करणारें, जाणणारें, अशाप्रकारें विशेषयुक्तसें उपलब्ध होतें, तोच त्याचा प्रवेश आहे. म्हणून तें कारण ब्रह्म आहे. यास्तव त्याच्या अस्तित्वामुळें तें आहे, असेंच जाणावें. असो; तें त्या कार्यांत अनुप्रवेश करून मग काय? मग तें सत् म्ह० मूर्त व त्यत् म्ह० अमूर्त झालें. अन्तर्गत आत्म्याकडून ज्यांचें नाम-रूप अव्यक्त आहे अशा आत्मस्वरूपांत स्थित असलेल्या मूर्तामूर्तांना व्यक्त केलें जातें. पण मूर्त व अमूर्त या शब्दांनीं वाच्य अशीं तीं व्यक्त केलेलीं नाम-रूपें आत्म्याशीं अविभक्तदेशकाल असतात. म्ह० त्यांचा देश व काल आत्म्याच्या देश-कालाहून पृथक् नसतो. त्यामुळें आत्माच मूर्तामूर्त नामरूप झाला, असें येथें म्हटलें जातें.

**भाष्यं—किंच निरुक्तं चानिरुक्तं च निरुक्तं नाम निष्कृष्य समानासमानजातीयेभ्यो देशकालविशिष्टतयेदं तदित्युक्तमनिरुक्तं तद्विपरीतं निरुक्तानिरुक्ते अपि**

**मूर्तामूर्तयोरेव विशेषणे। यथा सच्च त्यच्च प्रत्यक्षपरोक्षे, तथा निलयनं चानिलयनं च। निलयनं नीडमाश्रयो मूर्तस्यैव धर्मः। अनिलयनं तद्विपरीतममूर्तस्यैव धर्मः॥**

**भाष्यार्थ**—तसाच तो निरुक्त व अनिरुक्त झाला. निरुक्त ह्म० समान व असमान जातीच्या पदार्थांपासून निराळें करून देश-कालविशिष्टतेनें 'हें तें' असें सांगितलेलें व अनिरुक्त म्ह० तसें—सजातीय व विजातीय पदार्थांपासून पृथक् करून देशकाल-विशिष्ट, या रूपानें—न सांगितलेलें. निरुक्त व अनिरुक्त हीं सुद्धां मूर्त व अमूर्त यांचींच विशेषणें आहेत. ज्याप्रमाणें सत् व त्यत् म्हणजेच प्रत्यक्ष व परोक्ष त्याचप्रमाणें निलयन व अनिलयन. निलयन म्हणजे नीड, आश्रय. तो मूर्तांचाच धर्म आहे, व अनिलयन म्ह० त्याच्या उलट—अनाश्रय. तो अमूर्तांचाच धर्म आहे. ("अनिरुक्तत्वादि हा अमूर्तांचाच जर धर्म असेल तर तो ब्रह्माचाच कां नाहीं ?" याचें उत्तर—'**त्यदनिरुक्त०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—)

**भाष्यं—त्यदनिरुक्तानिलयनान्यमूर्तधर्मत्वेऽपि व्याकृतविषयाण्येव। सर्गोत्तरकालभावश्रवणात्। त्यदिति प्राणाद्यनिरुक्तं तदेवानिलयनं च। अतो विशेषणान्यमूर्तस्य व्याकृतविषयाण्येवैतानि॥**

**भाष्यार्थ**—त्यत्, अनिरुक्त व अनिलयन, हे अमूर्तांचे धर्म जरी असले तरी तीं व्याकृतांचींच विशेषणें आहेत. कारण सृष्टीच्या उत्तरकालीं त्यांचा भाव सांगितलेला आहे. त्यत् म्ह०प्राणादि (आकाररहित, रूपरहित), तेंच अनिरुक्त व अनिलयन आहे. यास्तव अमूर्तांचीं हीं विशेषणें व्याकृतविषयकच आहेत.

**भाष्यं—विज्ञानं चेतनमविज्ञानं तद्रहितमचेतनं पाषाणादि सत्यं च व्यवहारविषयमधिकारान्न परमार्थसत्यम्। एकमेव हि परमार्थसत्यं ब्रह्म। इह पुनर्व्यवहारविषयमापेक्षिकं सत्यं मृगतृष्णिकाद्यनृतापेक्षयोदकादि सत्यमुच्यते। अनृतं च तद्विपरीतम्। किं पुनरेतत्सर्वमभवत्परमार्थसत्यं किं पुनस्तद्ब्रह्म सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेति प्रकृतत्वात॥**

**भाष्यार्थ**—**विज्ञान** म्ह०चेतन व **अविज्ञान** म्ह०चेतनरहित—अचेतन पाषाणादिक. **सत्य** म्ह०व्यवहारविषयक अबाधित (म्ह०व्यवहारसमयीं बाधित न होणारें), कारण प्रकरण व्यवहारविषयाचें आहे. म्हणून तें परमार्थविषयक सत्य नव्हे. कारण परमार्थ सत्य एक ब्रह्मच आहे. पण येथें व्यवहारविषयक आपेक्षिक सत्य हाच सत्यशब्दाचा अर्थ आहे, मृगजलादि असत्य—मिथ्या पदार्थांच्या अपेक्षेनें उदकादिक सत्य म्हटलें जातें. **अनृत** म्ह०अशा

व्यावहारिक सत्याच्या उलट.पण हें सर्व कोण झालें? परमार्थ सत्य हें सर्व झालें.पण तें परमार्थ सत्य काय आहे? तर ब्रह्म. कारण 'सत्यं, ज्ञानं, अनन्तं ब्रह्म' अशा रीतीनें तें प्रकृत आहे. ('तें सत्य आहे, असें म्हणतात' याविषयीं '**यस्मात्**०'इत्यादि भाष्यानें उपपत्ति सांगतात—)

**भाष्यं—यस्मात्सत्त्यदादिकं मूर्तामूर्तधर्मजातं यत्किंचेदं सर्वमविशिष्टं विकारजातमेकमेव सच्छब्दवाच्यं ब्रह्माभवत्तव्द्यतिरेकेणाभावान्नामरूपविकारस्य, तस्मात्तद्ब्रह्म सत्यमित्याचक्षते ब्रह्मविदः ॥**

**भाष्यार्थ**—ज्या अर्थी हें जें कांहीं सत्-त्यदादि मूर्तामूर्त धर्मजात आहे तें सर्व साधारण विकारजात एकच सत्-शब्दवाच्य ('सत'या नांवाचें) ब्रह्म झालें आहे व त्यावांचून नाम-रूपविकाराचा अभाव आहे, (म्ह० नाम-रूपविकार त्यांहून पृथक् पदार्थ नाहीं) त्याअर्थी तें ब्रह्म सत्य आहे, असें ब्रह्मवेत्ते म्हणतात. (याप्रमाणें पदांचें व्याख्यान करून 'सोऽकामयत०' इत्यादि प्रकरणाचें तात्पर्य प्रकृत अनुप्रश्नांच्या निराकरणांत आहे. असें '**अस्ति, नास्ति**०' इत्यादि भाष्यानें सांगतात—)

**भाष्यं—अस्ति नास्तीत्यनुप्रश्नः प्रकृतस्तस्य प्रतिवचनविषय एतदुक्तमात्माऽकामयत बहु स्यामिति। स यथाकामं चाऽऽकाशादिकार्यं सृष्ट्वा तदनु प्रविश्य पश्यञ्शृण्वन्मन्वानो विजानन्बह्वभवत्तस्मात्तदेवेदमाकाशादिकारणं कार्यस्थं परमे व्योमन्हृदयगुहायां निहितं तत्प्रत्ययावभासविशेषेणोपलभ्यमानमस्तीत्येवं विजानीयादित्युक्तं भवति। तदेतस्मिन्नर्थे ब्राह्मणोक्त एष श्लोको मन्त्रो भवति। यथा पूर्वेष्वन्नमयाद्यात्मप्रकाशकाः पञ्चस्वप्येवं सर्वान्तरतमात्मास्तित्वप्रकाशकोऽपि मन्त्रः कार्यद्वारेण भवति ॥ इति ब्रह्मवल्ल्यध्याये शांकरभाष्ये षष्ठोऽनुवाकः॥६॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्म आहे कीं नाहीं, हा प्रकृत अनुप्रश्न आहे. त्याच्या प्रतिवचनप्रसंगीं (त्याच्या प्रतिवचनविषयामध्यें) 'आत्मा मीं बहु व्हावें अशी कामना करिता झाला,' असें म्हटलें आहे. तो आपल्या कामनेप्रमाणें सत्-त्यत् इत्यादिलक्षण आकाशादि कार्याला उत्पन्न करून व मागून त्यांत प्रवेश करून पहाणारा, ऐकणारा, मनन करणारा, जाणणारा इत्यादि प्रकारें बहु झाला, त्याअर्थी तेंच हें आकाशादिकांचें कारण, कार्यामध्यें स्थित असलेलें, परम आकाशांतील हृदयगुहेंत अवस्थित असून त्या बुद्धिगुहेचे मी कर्ता, भोक्ता इत्यादि प्रकारचे जे विशेष प्रत्यय त्यांनीं उपलब्ध होणारें ब्रह्म आहे, असें जाणावें, असें या वाक्यानें सांगितल्यासारखें होतें. (अर्थात् अन्तःकरणप्रत्ययविशिष्ट ब्रह्म जरी विषय होत असलें तरी स्वरूपतः तें अविषय आहे, असा याचा भावार्थ.) या ब्राह्मणोक्त अर्थाविषयीं हा श्लोक—मंत्र आहे. ज्याप्रमाणें पूर्वीच्या पांचहि पर्यायांत अन्नमयादि-

रूप आत्म्यांचे प्रकाशक श्लोक आहेत त्याप्रमाणें सर्वांच्या अगदीं आंत असलेल्या आत्म्याचें अस्तित्व कार्याच्या द्वारा प्रकाशित करणाराहि हा पुढील मंत्र आहे. ॥६॥

**श्रुति:— असद्वा इदमग्र आसीत् । ततो वै सदजायत । तदात्मानꣳस्वयमकुरुत । तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति ॥**

**अर्थ—**हें पूर्वीं असत् होतें. त्यापासून सत्—नाम-रूपात्मक जगत् झालें. तें असत्-संज्ञक ब्रह्म आपल्यालाच जगत् करतें झालें. म्हणून तें सुकृत—स्वयंकृत म्हटलें जातें.

**भाष्यं—असद्वा इदमग्र आसीत् । असदिति व्याकृतनामरूपविशेषविपरीतरूपमविकृतं ब्रह्मोच्यते । न पुनरत्यन्तमेवासत् । न ह्यसतः सज्जन्मास्ति । इदमिति नामरूपविशेषवव्द्याकृतं जगदग्रे पूर्वं प्रागुत्पत्तेर्ब्रह्मैवासच्छब्दवाच्यमासीत । ततोऽसतो वै सत्प्रविभक्तनामरूपविशेषमजायतोत्पन्नम् ॥**

**भाष्यार्थ**—'हें पूर्वीं असत् होतें.' ' असत् ' या शब्दानें ज्याचें स्वरूप व्यक्त नाम व रूप या विशेषांच्या विपरीत आणि अविकृत आहे, असें ब्रह्म सांगितलें जातें. त्या शब्दानें तें वंध्यापुत्राप्रमाणें 'अत्यंत असत् होतें, शून्य होतें,' असें सांगितलें जात नाहीं. कारण असत्-पासून—शून्यापासून सत् वस्तूचा जन्म संभवत नाहीं. ' इदं ' म्ह० नाम-रूपविशेषांनीं युक्त, व्याकृत—व्यक्त जगत्; ' अग्रे ' म्ह० पूर्वीं, उत्पत्तीच्या अगोदर ' असत्-'शब्दवाच्य ब्रह्मच होतें. त्या असत्-पासून सत् म्ह० ज्याचे नाम-रूपविशेष अगदीं विभक्त आहेत असें जगत् उत्पन्न झालें.

**भाष्यं—किं ततः प्रविभक्तं कार्यमिति पितुरिव पुत्रो नेत्याह । तदसच्छब्दवाच्यं स्वयमेवाऽऽत्मानमेवाकुरुत कृतवत् । यस्मादेवं तस्माद्ब्रह्मैव सुकृतं स्वयंकर्तृच्यते । स्वयंकर्तृ ब्रह्मेति प्रसिद्धं लोके सर्वकारणत्वात् ॥**

**भाष्यार्थ—** तर मग काय पित्याहून जसा पुत्र अगदीं पृथक् असतो त्याप्रमाणें कार्य त्या ब्रह्माहून अगदीं भिन्न आहे ? ' नाहीं ' असें श्रुति सांगते—तें असत्-शब्दवाच्य ब्रह्म आपल्यालाच तें जगत् करतें झालें. ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं स्वतः ब्रह्मच सुकृत म्ह० स्वयंकर्तृ म्हटलें जातें. सर्वांचें कारण असल्यामुळें ब्रह्म स्वयंकर्तृ आहे असें लोकांमध्यें प्रसिद्ध आहे.

**भाष्यं— यस्माद्वा स्वयमकरोत्सर्वं सर्वात्मना तस्मात्पुण्यरूपेणापि तदेव ब्रह्म कारणं सुकृतमुच्यते । सर्वथाऽपि तु फलसंबन्धादिकारणं सुकृतशब्दवाच्यं प्रसिद्धं लोके । यदि पुण्यं यदि वाऽन्यत्सा प्रसिद्धिर्नित्ये चेतनवत्कारणे सत्युपपद्यते तस्मादस्ति तद्ब्रह्म सुकृतप्रसिद्धेः । इतश्चास्ति । कुतः । रसत्वात् । कुतो रसत्वप्रसिद्धिर्ब्रह्मण इत्यत आह ॥**

**भाष्यार्थ**—किंवा ज्या अर्थीं त्यानें स्वतः सर्वरूपानें सर्व केलें त्याअर्थीं पुण्यरूपानेंहि तेंच ब्रह्म कारण 'सुकृत' असें म्हटलें जातें. सारांश कसेंहि जरी समजलें तरी फलसंबंधादिकांचें कारण 'सुकृत' या शब्दाचें वाच्य आहे, हें लोकांत प्रसिद्ध आहे. अर्थात् तें जरी पुण्य असलें किंवा आणखी कांहीं असलें तरी ती प्रसिद्धि नित्य व चेतनयुक्त कारण असलें तरच उपपन्न होते. तस्मात् सुकृतप्रसिद्धीवरून तें ब्रह्म आहे, असें ठरतें. आणखीहि या एका कारणानें तें आहे. कोणत्या? तर त्याला रसत्व आहे, या. पण ब्रह्माच्या रसत्वाची प्रसिद्धि कोणत्या निमित्तानें आहे? असें कोणी विचारील म्हणून श्रुति सांगते—

**श्रुतिः—यद्वै तत्सुकृतम्। रसो वै सः। रसꣳ ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति। को ह्येवान्यात्कः प्राण्यात्। यदेष आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येवाऽऽनन्दयाति ॥**

**अर्थ**—तें जें प्रसिद्ध सुकृत तो प्रसिद्ध रस आहे. पुरुष या रसाला प्राप्त होऊन आनंदी होतो. जर हा परम आकाशस्थ आनंद नसेल तर प्राण व अपान यांचे व्यापार कोण करील! हाच लोकांना आनंद देतो.

**भाष्यं—यद्वै तत्सुकृतम्। रसो वै सः। रसो नाम तृप्तिहेतुरानन्दकरो मधुराम्लादिः प्रसिद्धो लोके। रसमेवायं लब्ध्वा प्राप्याऽनन्दी सुखी भवति। नासत आनन्दहेतुत्वं दृष्टं लोके। बाह्यानन्दसाधनरहिता अप्यनीहा निरेषणा ब्राह्मणा बाह्यरसलाभादिव सानन्दा दृश्यन्ते विद्वांसो नूनं ब्रह्मैव रसस्तेषाम्। तस्मादस्ति तत्तेषामानन्दकारणं रसवद्ब्रह्म ॥**

**भाष्यार्थ**—'तें जें सुकृत तोच प्रसिद्ध रस आहे.' तृप्तीला कारण होणारा व आनंद देणारा असा मधुर, अम्ल इत्यादि हा 'रस' म्हणून लोकांमध्यें प्रसिद्ध आहे. 'हा पुरुष रसालाच प्राप्त होऊन आनन्दी—सुखी होतो. असत्—अविद्यमानवस्तु आनन्दाचें कारण होते, असें व्यवहारांत आढळत नाहीं. बाह्य आनन्दाच्या साधनानें रहित असलेलेहि, प्रयत्नशून्य व निरिच्छ विद्वान् ब्राह्मण मधुरादि बाह्य रसाच्या लाभानें जसे तसेच (म्ह० बाह्य रसाचा लाभ झाल्याप्रमाणेंच) आनन्दयुक्त असलेले दिसतात. खरोखर ब्रह्मच त्यांचा रस आहे. तस्मात् त्यांच्या आनन्दाचें कारण तें रसवत् ब्रह्म आहे.

**भाष्यं—इतश्चास्ति। कुतः। प्राणनादिक्रियादर्शनात्। अयमपि हि पिण्डो जीवतः प्राणेन प्राणित्यपानेनापानिति। एवं वायवीया ऐन्द्रियकाश्च चेष्टाः संहतैः कार्यकरणैर्निर्वर्त्यमाना दृश्यन्ते। तच्चैकार्थवृत्तित्वेन संहननं नान्तरेण चेतनमसंहतं संभवति। अन्यत्रादर्शनात् ॥**

**भाष्यार्थ**—आणखीहि एका कारणानें तें आहे. कोणत्या ? तर प्राणनादि क्रिया दिसते, त्यावरून; जिवंत प्राण्याचा हाहि पिंड प्राणाच्या योगानें प्राणन (उच्छ्वास) व अपानानें अपानन (निःश्वास) क्रिया करतो. अशा प्रकारें वायुसंबंधी व इंद्रियसंबंधी चेष्टा संघात पावलेल्या शरीरेंद्रियांकडून केल्या जात असल्याचें दिसतें. पण वायु व इंद्रियें यांनीं एका प्रयोजनाच्या साधनरूपानें संहत होणें (संघात पावणें, परस्परांच्या अधीन होणें म्ह० प्राणादि वायु व श्रोत्रादि इंद्रियें, यांनीं एकाच प्रयोजनाचें साधन होऊन परस्परांना अनुकूल होणें), हें असंहत (म्ह० त्यांच्याशीं संघात न पावलेल्या, साधनरूपानें परस्परानुकूल न झालेल्या) चेतनावांचून संभवत नाहीं. कारण अन्यत्र तसा अनुभव येत नाहीं. (म्ह० गृह, प्रासाद इत्यादिकांमध्यें स्वतंत्र, गृहादिकांमुळें अस्तित्वांत न येणाऱ्या, विलक्षण स्वामीवांचून माती, दगड, लांकडें, चुना इत्यादि अवयवांचा परस्पर संघात झालेला दिसत नाहीं. घर, वाडा, इत्यादि एका कार्याकरितां माती, दगड इत्यादि त्याचे अवयव एकमेकांच्या आधारानें एका विशिष्ट अवस्थेंत राहिलेले असतात. पण धन्यावांचून त्यांच्या त्या परस्पर पारतंत्र्याची उपपत्ति लागत नाहीं. त्याच न्यायानें शरीर व इंद्रियें यांच्या संघातांतहि त्याहून विलक्षण स्वामी असावा, असें वाटतें व तोहि चेतन असल्यामुळें ब्रह्मच होय. कारण चेतनामध्यें भेद मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. अर्थात् त्यावरून ब्रह्माच्या अस्तित्वाची सिद्धि होते.)

**भाष्यं**—तदाह—यद्यदि एष आकाशे परमे व्योम्नि गुहायां निहित आनन्दो न स्यान्न भवेत्को ह्येव लोकेऽन्यादपानचेष्टां कुर्यादित्यर्थः । कः प्राण्यात्प्राणनं वा कुर्यात्तस्मादस्ति तद्ब्रह्म । यदर्थाः कार्यकरणप्राणनादिचेष्टास्तत्कृत एव चाऽऽनन्दो लोकस्य ॥

**भाष्यार्थ**—श्रुति आतां तेंच सांगते. 'जर हा आकाशांत—परम आकाशांतील गुहेंत —स्थित असलेला आनंद नसता तर लोकांत अपानक्रिया कोणीं केली असती ?' अपानाचा अधोनयन हा व्यापार करण्यास कोण समर्थ झाला असता ? असा भावार्थ. किंवा 'प्राणन तरी कोणीं केलें असतें ?' (या आनंदाच्या अभावीं कोणालाहि कांहीं करतां आलें नसतें.) तस्मात् तें ब्रह्म आहे; आणि ज्याच्याकरितां शरीरेंद्रियांच्या प्राणनादि चेष्टा होतात त्याच्यामुळेंच लोकांना आनंद होतो.

**भाष्यं**—कुतः । एष ह्येव पर आत्माऽऽनन्दयात्यानन्दयति सुखयति लोकं धर्मानुरूपम् । स एवाऽऽत्माऽऽनन्दरूपोऽविद्यया परिच्छिन्नो विभाव्यते प्राणिभिरित्यर्थः । भयाभयहेतुत्वाद्विद्वदविदुषोरस्ति तद्ब्रह्म । सद्वस्त्वाश्रयणेन ह्यभयं भवति । नासद्वस्त्वाश्रयणेन भयनिवृत्तिरुपपद्यते । कथमभयहेतुत्वमित्युच्यते ॥

**भाष्यार्थ**—कारण काय कीं 'हाच पर आत्मा लोकाला धर्मानुरूप सुख देतो.' कारण जे तोच आनन्दरूप आत्मा अविद्येनें परिच्छिन्न झाला आहे, असें प्राण्यांकडून जाणलें जातें, (म्ह० प्राण्यांना तोच परिच्छिन्नसा भासतो,) अथवा याचा अर्थ, विद्वान् व अविद्वान् यांच्या क्रमानें अभयाला व भयाला कारण होत असल्यामुळेंहि तें ब्रह्म आहे. कारण सद्वस्तूचा आश्रय केल्यानेंच अभय होतें हें प्रसिद्ध आहे. असत् वस्तूच्या आश्रयानें भयाची निवृत्ति होऊं शकत नाहीं. आतां त्याला अभयहेतुत्व कसें तें सांगतात—

**श्रुतिः—यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयनेऽभयं प्रतिष्ठां विन्दते । अथ सोऽभयं गतो भवति । यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते । अथ तस्य भयं भवति । तत्त्वेव भयं विदुषोऽमन्वानस्य । तदप्येष श्लोको भवति ॥ ७ ॥**

**अर्थ**—कारण ज्यावेळीं हा साधक या अदृश्य–अविकार, अशरीर, अनिर्वाच्य, अनाधार ब्रह्मामध्यें अभय प्रतिष्ठेला प्राप्त होतो त्यावेळीं तो अभयाला प्राप्त झालेला असा होतो. पण जेव्हां हा या ब्रह्मामध्यें थोडेंसेंहि अंतर पाहतो—भेददृष्टि ठेवतो तेव्हां त्याला भय होतें तें ब्रह्मच भेददर्शी विद्वान पुरुषाचें भय आहे. याच अर्थी हा श्लोक आहे.

**भाष्यं—यदा ह्येव यस्मादेष साधक एतस्मिन्ब्रह्मणि किंविशिष्टेऽदृश्ये दृश्यं नाम द्रष्टव्यं विकारो दर्शनार्थत्वाद्विकारस्य । न दृश्यमदृश्यमविकार इत्यर्थः । एतस्मिन्नदृश्येऽविकारेऽविषयभूतेऽनात्म्येऽशरीरे यस्माददृश्यं तस्मादनात्म्यं यस्मादनात्म्यं तस्मादनिरुक्तम् । विशेषो हि निरुच्यते विशेषश्च विकारः । अविकारं च ब्रह्म । सर्वविकारहेतुत्वात्तस्मादनिरुक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—ज्या वेळींच–ज्याअर्थी हा साधक या ब्रह्मामध्यें, कशाप्रकारच्या ब्रह्ममध्यें–अदृश्य ब्रह्मामध्यें. दृश्य म्ह० द्रष्टव्य, पाहण्यास योग्य विकार. कारण विकाराला दर्शनार्थत्व आहे. ( म्ह० विकार दर्शनाकरितांच आहे. कोणताहि विकार उपादान कारण विशेष आकारानें दिसावें, म्हणूनच होतो ) जें दृश्य नव्हे तें अदृश्य. म्ह० अविकार असा भावार्थ. या अदृश्य, अविकार, अविषयभूत, 'अनात्म्य'–अशरीर; ज्याअर्थी अदृश्य त्या अर्थी अनात्म्य; आणि ज्याअर्थी अनात्म्य त्याअर्थी अनिरुक्त; कारण विशेषच सांगितला जातो व विशेष विकार असतो. ब्रह्म अविकार आहे. कारण तें सर्व विकारांचा हेतु आहे. म्हणून तें अनिरुक्त.

**भाष्यं—यत एवं तस्मादनिलयनं निलयनं नीड आश्रयो न निलयनमनिलयनमनाधारं तस्मिन्नेतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयने सर्वकार्यधर्मविलक्षणे**

**ब्रह्मणीति वाक्यार्थः। अभयमिति क्रियाविशेषणम्। अभयामिति वा लिङ्गान्तरं परिणम्यते। प्रतिष्ठां स्थितिमात्मभावं विन्दते लभते। अथ तदा स तस्मिन्नानात्वस्य भयहेतोरविद्याकृतस्यादर्शनादभयं गतो भवति ॥**

**भाष्यार्थ**—ज्याअर्थी असें आहे त्या अर्थीं अनिलयन. निलयन म्ह० नीड, आश्रय. जें निलयन नव्हे तें अनिलयन, अनाधार. त्या ह्या अदृश्य, अनात्म्य, अनिरुक्त, अनिलयन व कार्यांच्या सर्व धर्मांहून विलक्षण अशा ब्रह्मामध्यें, असा या वाक्याचा अर्थ. 'अभयं' हें क्रियाविशेषण आहे. किंवा 'अभयां' असा त्याचा लिंगविपरिणाम करावा. (म्ह० अभयं असें जें नपुंसकलिंग आहे त्याचें 'अभयां' असें स्त्रीलिंग करून घ्यावें. म्हणजे तें 'प्रतिष्ठां' या पदाचें विशेषण होईल.) प्रतिष्ठेस–स्थितीस–आत्मभावास प्राप्त होतो. (जेव्हां हा साधक या अविकार, अशरीर व अनिर्वाच्य ब्रह्मामध्यें निर्भयपणें अथवा भयरहित स्थितीस प्राप्त होतो) तेव्हां तो त्याच्यामध्यें अविद्याकृत नानात्व या भयहेतूच्या अदर्शनामुळें अभयाला प्राप्त झालेला असा होतो.

**भाष्यं—स्वरूपप्रतिष्ठो ह्यसौ यदा भवति तदा नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति। अन्यस्य ह्यन्यतो भयं भवति नाऽऽत्मन एवाऽऽत्मनो भयं युक्तं तस्मादात्मैवाऽऽत्मनोऽभयकारणम्। सर्वतो हि निर्भया ब्राह्मणा दृश्यन्ते सत्सु भयहेतुषु तच्चायुक्तमसति भयत्राणे ब्रह्मणि। तस्मात्तेषामभयदर्शनादस्ति तदभयकारणं ब्रह्मेति ॥**

**भाष्यार्थ**—जेव्हां तो स्वरूपामध्यें प्रतिष्ठित होतो तेव्हां दुसरें कांहीं पहात नाहीं; दुसरें कांहीं ऐकत नाहीं; व दुसरें कांहीं जाणत नाहीं. कारण स्वतः भिन्न असलेल्या एकाला दुसऱ्यापासून भय होतें. आपल्यालाच आपलें भय असणें, युक्त नव्हे. यास्तव आत्माच आत्म्याच्या अभयाचें कारण आहे. भयाचीं कारणें असतांना सुद्धां ब्राह्मण सर्वतः निर्भय दिसतात. परंतु भयापासून रक्षण करणारें ब्रह्म जर नसेल तर ब्राह्मणांनीं निर्भय होणें अयुक्त आहे. तस्मात् म्ह० ते अभय असल्याचें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्यांच्या अभयाचें कारण ब्रह्म आहे.

**भाष्यं—कदाऽसावभयं गतो भवति साधको यदा नान्यत्पश्यत्यात्मनि चान्तरं भेदं न कुरुते तदाऽभयं गतो भवतीत्यभिप्रायः। यदा पुनरविद्यावस्थायां हि यस्मादेषोऽविद्यावानविद्यया प्रत्युपस्थापितं वस्तु तैमिरिकद्वितीयचन्द्रवत्पश्यत्यात्मनि चैतस्मिन्ब्रह्मणि उदपि, अरमल्पमप्यन्तरं छिद्रं भेददर्शनं कुरुते। भेददर्शनमेव ह्यन्तरकरणमल्पमपि भेदं पश्यतीत्यर्थः। अथ तस्माद्भेददर्शनाद्धेतोरस्य भेददर्शिन आत्मनो भयं भवति। तस्मादात्मैवाऽऽत्मनो भयकारणमविदुषः ॥**

**कुतश्चनेति युज्यते । मनोमये चोदाहृतो मन्त्रो मनसो ब्रह्मविज्ञानसाधनत्वात् तत्र ब्रह्मत्वमध्यारोप्य तत्स्तुत्यर्थं न बिभेति कदाचनेति भयमात्रं प्रतिषिद्धमिहाद्वैतविषये न बिभेति कुतश्चनेति भयनिमित्तमेव प्रतिषिध्यते । नन्वस्ति भयनिमित्तं साध्वकरणं पापक्रिया च । नैवम् । कथमित्युच्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण अविद्येमुळें जेव्हां तो थोडेसेंहि अन्तर-भेद करतो तेव्हां लागलेंच त्याला भय होतें, असें वर सांगितलेंच आहे. ज्याला तिमिर-रोग झाला आहे अशा पुरुषाला दिसलेल्या दुसऱ्या चंद्राप्रमाणें विद्वानाच्या भयाचें निमित्त असें जें अविद्येचें कार्य त्याचा नाश झाल्यामुळें तो कशालाहि भीत नाहीं, हें म्हणणें उपपन्न होतें. मनोमयाच्या पर्यायांतहि हाच मंत्र उदाहरणार्थ दिला आहे. कारण मन ब्रह्मविज्ञानाचें साधन आहे. त्यामुळें त्या मनाचे ठिकाणीं ब्रह्मत्वाचा आरोप करून त्याच्या स्तुतीकरितां 'न बिभेति कदाचन' असें ह्मणून तेथें नुसत्या भयाचा निषेध केला आहे. पण येथें या अद्वैतविषयामध्यें 'न बिभेति कुतश्चन' असें ह्मणून भयाच्या निमित्ताचाच निषेध केला आहे. (वादी–)='अहोपण, सदाचरण न करणें व पापाचें आचरण करणें असें दोन प्रकारचें भयाचें निमित्त आहे!' (सिद्धान्ती–)=असें नव्हे. तें कसें तेंच श्रुति सांगते–

**श्रुतिः—एतँ्ह वाव न तपति । किमहँ्साधु नाकरवम् । किमहं पापमकरवमिति**

**अर्थ**—याच विद्वानाला मीं पुण्य कां केलें नाहीं व पाप कां केलें अशी ही चिंता संतप्त करीत नाहीं.

**भाष्यं—एतं यथोक्तमेवंविदम् । ह वावेत्यवधारणार्थौ । न तपति नोद्वेजयति न संतापयति । कथं पुनः साध्वकरणं पापक्रिया च न तपतीत्युच्यते । किं कस्मात्साधु शोभनं कर्म नाकरवं न कृतवानस्मीति पश्चात्संतापो भवत्यासन्ने मरणकाले । तथा किं कस्मात्पापं प्रतिषिद्धं कर्माकरवं कृतवानस्मीति च नरकपतनादिदुःखभयात्तापो भवति । ते एते साध्वकरणपापक्रिये एवमेनं न तपतो यथाऽविद्वांसं तपतः । कस्मात्पुनर्विद्वांसं न तपत इत्युच्यते—**

**भाष्यार्थ**—'एतं'–या पूर्वोक्त एवंवेत्त्याला 'ह, वाव' हे निपात निश्चयार्थ आहेत. 'न तपति'–उद्विग्न करीत नाहीं, संतापयुक्त करीत नाहीं. (वादी–)=अहोपण, सत्कार्य न करणें व पापकर्म हीं त्याला उद्विग्न कशीं करीत नाहींत? (सिद्धान्ती–)=तेंच आतां श्रुतीकडून सांगितलें जात आहे. 'किं'–कोणत्या कारणानें 'साधु'–शुभ कर्म 'नाकरवम्' –मीं केलें नाहीं? असा मरणकाल समीप आला असतां मागून संताप होतो. त्याचप्रमाणें मीं पाप म्ह० निषिद्ध कर्म कोणत्या कारणानें केलें आहे, असा नरकपतनादि दुःखाच्या भीतीनें ताप होतो. तीं हीं दोन्ही–शुभकर्मांचें अकरण व पापकरण अशा रीतीनें याला

( पूर्वोक्त विद्वानाला ) ताप देत नाहींत. तीं जशीं अविद्वानाला ताप देतात ( त्याप्रमाणें विद्वानाला ताप देत नाहींत. )=कोणत्या खरें कारणानें तीं विद्वानाला ताप देत नाहींत, तेंच आतां सांगितलें जात आहे.

**श्रुतिः–स य एवं विद्वानेते आत्मानꣳ स्पृणुते। उभे ह्येवैष एते आत्मानꣳ स्पृणुते। य एवं वेद। इत्युपनिषत्॥ ९॥**

**अर्थ—**जो असें जाणणारा तो त्या दोहोंना आत्मरूप पाहतो. तो दोन्ही–पुण्यपाप आत्मरूपानेंच पाहतो, कोण? जो अशा अद्वैत आनंद ब्रह्माला जाणतो. अशी ही रहस्य-विद्या आहे. ॥ ९॥

**भाष्यं—स य एवंविद्वानेते साध्वसाधुनी तापहेतू इत्यात्मानं स्पृणुते प्रीणयति बलयति वा परमात्मभावेनोभे पश्यतीत्यर्थः। उभे पुण्यपापे हि यस्मादेवमेष विद्वानेते आत्मानमात्मरूपेणैव पुण्यपापे स्वेन विशेषरूपेण शून्ये कृत्वाऽऽत्मानं स्पृणुत एव। को य एवं वेद यथोक्तमद्वैतमानन्दं ब्रह्म वेद तस्याऽऽत्मभावेन दृष्टे पुण्यपापे निर्वीर्ये अतापके जन्मान्तरारम्भके न भवत इतीयमेवं यथोक्ताऽस्यां वल्ल्यां ब्रह्मविद्योपनिषत्सर्वाभ्यो विद्याभ्यः परमरहस्यं दर्शितमित्यर्थः। परं श्रेयोऽस्यां निषण्णमिति॥ इति शांकरभाष्ये नवमोऽनुवाकः॥ ९**

**भाष्यार्थ—**तो जो असें जाणणारा पाप व पुण्य हीं संतापाचीं कारणें आहेत, असें समजून 'आत्मानं स्पृणुते'–आत्म्याला प्रसन्न करतो किंवा बलवान् करतो म्ह० तीं दोन्हीं परमात्मभावानें पाहतो, असा याचा अर्थ. पुण्य व पाप हीं दोन्हीं ज्याअर्थी अशाप्रकारें हा विद्वान् 'आत्मानं'–पुण्यपाप आत्मरूपानेंच आहेत, यास्तव स्वतःच्या विशेषरूपानें त्यांना शून्य करून आत्म्यालाच संतुष्ट करतो. तो कोण, तर जो असें जाणतो, पूर्वोक्त अद्वैत आनंदाला ब्रह्म जाणतो त्याचीं आत्मभावानें–आत्मस्वरूपानें पाहिलेलीं पुण्य-पापें निर्वीर्य, अतापक होतात. तीं दुसऱ्या जन्माचीं आरंभक होत नाहींत. 'इति उपनिषद्'–अशी–या वल्लींत वर जशी सांगितली आहे तशी ही ब्रह्मविद्या उपनिषद् आहे. म्ह० सर्व विद्यांहून परमरहस्य येथें दाखविलें, असा याचा अर्थ. या विद्येंत परम श्रेय स्थित आहे. ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः ) ९.

**सह नाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्यं करवावहै। तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै।**

**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥**

इति ब्रह्मवल्ल्यध्यायः समाप्तः॥ २॥

# अथ तृतीयो भृगुवल्ल्यध्यायः ।

**श्रुतिः—ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

**अर्थ**—या शांतीचा अर्थ पृ.६५वर पहा. (गतार्थाचा अनुवाद करून पुढील वल्लीचा संबंध 'सत्यं ज्ञानं०' इत्यादि भाष्यानें सांगतात—)

**भाष्यं—सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्माऽऽकाशादिकार्यमन्नमयान्तं सृष्ट्वा तदेवानुप्रविष्टं विशेषवदिवोपलभ्यमानं यस्मात्तस्मात्सर्वकार्यविलक्षणमदृश्यादिधर्मकमेवाऽऽनन्दं तदेवाहमिति विजानीयादनुप्रवेशस्य तदर्थत्वात्तस्यैवं विजानतः शुभाशुभे कर्मणी जन्मान्तरारम्भके न भवत इत्येवमानन्दवल्ल्यां विवक्षितोऽर्थः परिसमाप्ता च ब्रह्मविद्या । अतः परं ब्रह्मविद्यासाधनं तपो वक्तव्यमन्नादिविषयाणि चोपासनान्यनुक्तानीत्यत इदमारभ्यते—**

**भाष्यार्थ**—ज्याअर्थी सत्य, ज्ञान व अनन्त ब्रह्म आकाशादि-अन्नमयान्त कार्य उत्पन्न करून त्यांतच मागून प्रविष्ट होऊन जणुंकाय सर्व विशेषयुक्त असल्यासारखें उपलब्ध होतें, त्याअर्थी सर्व कार्याहून विलक्षण अदृश्यादिधर्मकच व आनन्द असें तेंच मी आहें, असें जाणावें. कारण त्याचा अनुप्रवेश त्यासाठींच म्ह० तसें जाणण्यासाठींच आहे. असें जाणणाऱ्या पुरुषाचीं शुभाशुभ कर्में दुसऱ्या जन्माचीं आरंभक होत नाहींत, असा हा आनन्दवल्लींतील विवक्षित अर्थ आहे. ब्रह्मविद्या त्या वल्लींत परिसमाप्त झाली. आतां यापुढें ब्रह्मविद्येचें साधन—तप सांगावें (पदार्थांचें विवरण वाक्यार्थज्ञानाचें साधन आहे, असा भावार्थ) आणि त्याचप्रमाणें मागें न सांगितलेलीं अन्नादि विषयक उपासनें सांगावीं म्हणून हें प्रकरण आरंभिलें जातें.

**श्रुतिः— भृगुर्वै वारुणिः । वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तस्मा एतत्प्रोवाच । अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति । तꣳहोवाच । यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ॥**

**अर्थ**—वरुणाचा पुत्र भृगु, आपल्या वरुण पित्यापाशीं 'हे भगवन्, मला ब्रह्माचा बोध कर,' असें म्हणत गेला. त्याला पिता असें म्हणाला—"शरीर, प्राण, चक्षुः, श्रोत्र, मन, वाक् हीं ब्रह्माच्या ज्ञानाचीं द्वारें आहेत." त्याला तो म्हणाला "ज्याच्यापासून हीं भूतें

उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं तीं ज्याच्या योगानें जीवंत राहतात, लीन होतांना ज्यांत प्रविष्ट होतात त्याला विशेषतः जाणण्याची इच्छा कर. तें ब्रह्म आहे," असें म्हणाला.

**भाष्यं—आख्यायिका विद्यास्तुतये, प्रियाय पुत्राय पित्रोक्तेति—भृगुर्वै वारुणिः। वैशब्दः प्रसिद्धानुस्मारको भृगुरित्येवंनामा प्रसिद्धोऽनुस्मर्यते। वारुणिर्वरुणस्यापत्यं वारुणिर्वरुणं पितरं ब्रह्म विजिज्ञासुरुपससारोपगतवान्। अधीहि भगवो ब्रह्मेत्यनेन मंत्रेण। स च पिता विधिवदुपसन्नाय तस्मै पुत्रायैतद्वचनं प्रोवाच। अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति॥**

**भाष्यार्थ**—येथील आख्यायिका विद्येच्या स्तुतीकरितां आहे. कारण पित्यानें प्रिय पुत्राला ती विद्या सांगितली आहे. 'भृगुर्वै वारुणिः' येथील 'वै-'शब्द प्रसिद्ध पुरुषाची आठवण करविणारा आहे. 'भृगु' अशा या नांवाचा प्रसिद्ध ऋषि अनुस्मरला जातो. ('वै-'शब्दानें त्याची मागून आठवण होते.) वरुणाचें अपत्य असा तो वारुणि वरुणपित्यापाशीं ब्रह्मजिज्ञासु होऊन गेला. 'अधीहि भगवो ब्रह्म'—म्ह० हे भगवन्, मला ब्रह्म शिकीव, अध्यापन कर, मला त्याची आठवण करून दे. (कारण 'अधीहि' हें रूप 'इक्—इ'—स्मरण करणें या धातूपासून झालेलें आहे.) या मंत्रानें त्यानें गुरूपसदन केलें. तेव्हां तो पिता यथाविधि समीप आलेल्या त्या पुत्राला 'अन्नं, प्राणं, चक्षुः, श्रोत्रं, मनः, वाचं' असें हें वचन बोलला.

**भाष्यं—अन्नं शरीरं तदभ्यन्तरं च प्राणमत्तारमुपलब्धिसाधनानि चक्षुः श्रोत्रं मनो वाचमित्येतानि ब्रह्मोपलब्धौ द्वाराण्युक्तवान्। उक्त्वा च द्वारभूतान्येतान्यन्नादीनि तं भृगुं होवाच ब्रह्मणो लक्षणं॥**

**भाष्यार्थ**— अन्न म्ह० शरीर, त्याच्या आंत असलेला प्राण अत्ता—अन्नभक्षक, चक्षुः, श्रोत्र, मन व वाक् हीं उपलब्धीचीं साधनें. वरुण अशीं हीं ब्रह्माच्या उपलब्धीचीं द्वारें सांगता झाला. (लक्ष्य त्वमर्थाच्या विवेकासाठीं हीं द्वारें आहेत. शरीरादिकांची चेष्टा त्यावांचून उपपन्नच होत नसल्यामुळें साक्षिभूत चिद्धातूचें विवेचन केलें जातें, असा भावार्थ.) आणि द्वारभूत अशीं हीं अन्नादिक सांगून तो त्या भृगूला ब्रह्माचें लक्षण सांगता झाला.

**भाष्यं—किं तत्। यतो यस्माद्वा इमानि ब्रह्मादीनि स्तम्बपर्यंतानि भूतानि जायंते। येन जातानि जीवान्ति प्राणान्धारयन्ति वर्धंते। विनाशकाले च यत्प्रयंति यद्ब्रह्म प्रतिगच्छन्ति, अभिसंविशन्ति तादात्म्यमेव प्रतिपद्यन्ते। उत्पत्तिस्थितिलयकालेषु यदात्मतां न जहति भूतानि तदेतद्ब्रह्मणो लक्षणं॥**

**भाष्यार्थ**—तें कोणतें, तर ज्याच्यापासून हीं ब्रह्मादि-स्तंबपर्यंत भूतें उत्पन्न होतात ज्याच्या योगानें तीं उत्पन्न झालेलीं भूतें जिवंत राहतात म्ह० प्राणांना धारण करतात, वाढतात आणि विनाशसमयीं ज्या ब्रह्माप्रत जाणारीं तीं त्यांतच प्रवेश करितात, तादात्म्यास प्राप्त होतात, (तात्पर्य–) उत्पत्ति-स्थिति-लयसमयीं भूतें ज्याच्या स्वरूपास सोडीत नाहींत, तें हें ब्रह्माचें लक्षण आहे.

**भाष्यं—तद्ब्रह्म विजिज्ञासस्व विशेषेण ज्ञातुमिच्छस्व। यदेवंलक्षणं ब्रह्म तदन्नादिद्वारेण प्रतिपद्यस्वेत्यर्थः। श्रुत्यन्तरं च—" प्राणस्य प्राणमुत चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रमन्नस्यान्नं मनसो ये मनो विदुस्ते निचिक्युर्ब्रह्म पुराणमग्र्यम् " इति ब्रह्मोपलब्धौ द्वाराण्येतानीति दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—त्या ब्रह्माला विशेषतः जाणण्याची इच्छा कर. जें अशा लक्षणाचें ब्रह्म आहे त्याला अन्नादिकांच्या द्वारा जाण, असा याचा अर्थ. अशीच दुसरी एक " ब्रह्म प्राणाचा प्राण, चक्षूचा चक्षू, श्रोत्राचें श्रोत्र, अन्नाचें अन्न, व मनाचें मन आहे, असें जे जाणतात ते त्या पुराण व श्रेष्ठ ब्रह्माला साक्षात् जाणूं शकतात,"—मु.उ.पृ.६१५—इत्यादि अर्थाची श्रुति आहे. ती ब्रह्माच्या उपलब्धीचीं हीं द्वारें आहेत, असें सांगते.

**श्रुतिः—स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा ॥ १ ॥**

**अर्थ**— तो तप करता झाला. तो तप करून, ॥१॥

**भाष्यं—स भृगुर्ब्रह्मोपलब्धिद्वाराणि ब्रह्मलक्षणं च श्रुत्वा पितुस्तपो ब्रह्मोपलब्धिसाधनत्वेनातप्यत तप्तवान्। कुतः पुनरनुपदिष्टस्यैव तपसः साधनत्वप्रतिपत्तिर्भृगोः, सावशेषोक्तेः। अन्नादि ब्रह्मणः प्रतिपत्तौ द्वारं लक्षणं च यतो वा इमानीत्याद्युक्तवान्। सावशेषं हि तत्साक्षाद्ब्रह्मणोऽनिर्देशात् ॥**

**भाष्यार्थ**—तो भृगु पित्यापासून ब्रह्माच्या उपलब्धीचीं द्वारें व ब्रह्माचें लक्षण ऐकून ब्रह्माच्या साक्षात्काराचें साधन, या रूपानें तप करता झाला. पण ज्याचा उपदेश केलेला नाहीं, असें तप ब्रह्मज्ञानाचें साधन आहे, हें ज्ञान भृगूला कशावरून झालें? पित्यानें त्याला सावशेष वचन सांगितलें व त्यावरून त्याला तपाचें ज्ञान झालें. म्ह० वरुण ब्रह्माच्या ज्ञानाचें द्वार 'अन्नादि' व लक्षण 'यतो वा इमानि०' म्ह० ज्याच्यापासून भूतें उत्पन्न झालीं, इत्यादि त्याला सांगता झाला. पण साक्षात् ब्रह्माचा निर्देश केलेला नसल्यामुळें तें वाक्य सावशेष आहे; (म्ह० तें वाक्य पूर्ण नाहीं. त्याचा कांहीं अवशेष राहिला आहे. केवल 'त्वं-'पदार्थज्ञानच वाक्यार्थज्ञानाचें निमित्त नाहीं, तर 'तत्-'पदार्थज्ञानहि वाक्यार्थज्ञाननिमित्त आहे, अशा आशयानें पित्यानें तत्पदार्थ ब्रह्माचें लक्षण सांगितलें, असा भावार्थ.)

**भाष्यं—अन्यथा हि स्वरूपेणैव ब्रह्म निर्देष्टव्यं जिज्ञासवे पुत्रायेदमित्थंरूपं ब्रह्मेति। न चैवं निरदिशत्किं तर्हि सावशेषमेवोक्तवान्। अतोऽवगम्यते नूनं साधनान्तरमप्यपेक्षते पिता ब्रह्मविज्ञानं प्रतीति। तपोविशेषप्रतिपत्तिस्तु सर्व-साधकतमत्वात्। सर्वेषां हि नियतसाध्यविषयाणां साधनानां तप एव साधकतमं साधनमिति हि प्रसिद्धं लोके। तस्मात्पित्राऽनुपदिष्टमपि ब्रह्मविज्ञानसाधनत्वेन तपः प्रतिपेदे भृगुः। तच्च तपो बाह्यान्तःकरणसमाधानं तद्द्वारकत्वाद्ब्रह्मप्रति-पत्तेः। " मनसश्चेन्द्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः। तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते " इति स्मृतेः। स च तपस्तप्त्वा॥ इति शांकरभाष्ये प्रथमोऽनुवाकः॥**

**भाष्यार्थ—**' अन्यथा हि० '–नाहींतर जिज्ञासु पुत्राला हें अशा तऱ्हेचें ब्रह्म आहे, असा ब्रह्माचा स्वरूपानेंच निर्देश करून सांगणें उचित होतें. पण त्यानें तसा निर्देश केला नाहीं. तर सावशेषच उपदेश केला. त्यावरून पिता ब्रह्मविज्ञानासाठीं दुसऱ्या साधनाचीहि अपेक्षा करीत आहे, हें भृगूला कळणें साहजिक आहे. पण अनेक साध-नांतील तप या विशेष साधनाचीच त्याला जी प्रतिपत्ति झाली ती तप हें सर्व साध्यांचें अतिशय साधक आहे, म्हणून होय. कारण ज्याचे साध्यविषय नियत आहेत अशा सर्व साधनांतील तप हेंच अतिशय साधक साधन आहे, हें लोकांत प्रसिद्ध आहे. त्यामुळें पित्यानें जरी सांगितलेलें नव्हतें तरी भृगु तप ब्रह्मविज्ञानाचें साधन आहे, असें जाणता झाला. (पित्यानें पदार्थोपलक्षणच सांगितलें, अखंड वाक्यार्थाचें प्रतिपादन केलें नाहीं, पण पदार्थभेदज्ञानानें पुरुषार्थाचा असंभव आहे, कारण ' उदरमन्तरं कुरुते'–पृ. १३१–अशी भेददृष्टीची निंदा केली आहे. हें सर्व लक्षांत आणून वाक्यार्थज्ञाना-पर्यंत तात्पर्यानें लक्ष्यपदार्थविचाराची आवृत्ति भृगूनें केली, असा भावार्थ.)=आणि तें तप म्ह० बाह्य व आंतर इंद्रियांचें समाधान हेंच आहे. कारण ब्रह्मज्ञानाचें तें द्वार आहे. ' मन व इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हेंच परम तप आहे. तें सर्व धर्मांहून श्रेष्ठ आहे व तोच श्रेष्ठ धर्म आहे, असें म्हणतात,' अशी स्मृति आहे. असो; तो भृगु तप करून (अन्न ब्रह्म आहे, असें जाणता झाला, असा पुढील अनुवाकाशीं संबंध. इति भृगुवल्ल्यध्याये प्रथमोऽनुवाकः।) १.

**श्रुतिः—अन्नं ब्रह्मेति व्यजानात्। अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। अन्नेन जातानि जीवन्ति। अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति। तद्विज्ञाय। पुनरेव वरुणं पितरमुपससार। अधीहि भगवो ब्रह्मेति। तꣳहोवाच। तपसा ब्रह्म विजि-ज्ञासस्व। तपो ब्रह्मेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा॥ २॥**

अर्थ—अन्न ब्रह्म आहे, असें तो जाणता झाला. कारण अन्नापासून भूतें होतात, उत्पन्न झालेलीं तीं अन्नानें जिवंत राहतात. विनाश पावणारीं तीं अन्नांत प्रवेश करितात. हें जाणून तो पुनः वरुणपित्यापाशीं 'भगवन् मला ब्रह्माचा बोध कर' असें म्हणत गेला. त्याला पिता म्हणाला "तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर.तप ब्रह्म आहे;" इत्यादि सु. उ. पृ. २३८.

भाष्यं—अन्नं ब्रह्मेति व्यजानाद्विज्ञातवान् तद्धि यथोक्तलक्षणोपेतम् । कथम् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते अन्नेन जातानि जीवन्ति अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति तस्माद्युक्तमन्नस्य ब्रह्मत्वमित्यभिप्रायः । स एवं तपस्तप्त्वाऽन्नं ब्रह्मेति विज्ञायाऽन्नलक्षणेनोपपत्त्या च पुनरेव संशयमापन्नो वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति ॥

भाष्यार्थ—वर सांगितल्याप्रमाणें तो तप करून अन्न ब्रह्म आहे, असें जाणता झाला. ( पित्यानें सांगितलेलें हें लक्षण पूर्णपणें कशामध्यें आहे? असा एकाग्र मनानें विचार करून तो अन्न ब्रह्म आहे, असें समजला. सर्वांना उपलब्ध होणारें, स्थूल देहांचें कारण, विराट्संज्ञक भूतपंचक हा येथील 'अन्न-'शब्दाचा अर्थ आहे. कारण तें स्थूल भूतपंचकच स्थूल भौतिक कार्यांचें कारण आहे. 'यतो वा०' इत्यादि पूर्वोक्त लक्षण त्यामध्यें योजतां येणें शक्य असल्यामुळें तेंच ब्रह्म आहे, असें जो समजला, असा भावार्थ.)=कारण तेंच वर सांगितलेल्या प्रकारच्या लक्षणानें युक्त आहे. तें कसें? तर अन्नापासूनच हीं भूतें उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं तीं अन्नानेंच जिवंत राहतात व प्रलय पावणारीं तीं अन्नामध्यें प्रवेश करितात. यास्तव अन्नाला ब्रह्मत्व युक्तच आहे, असा अभिप्राय. भृगु याप्रमाणें तप करून व अन्न ब्रह्म आहे, असें लक्षण व उपपत्ति यांच्या योगानें जाणून पुनरपि संशय आला असतां वरुणपित्यापाशीं 'अधीहि भगवो ब्रह्म' हाच मंत्र म्हणत गेला.

भाष्यं—कः पुनः संशयहेतुरस्येत्युच्यते अन्नस्योत्पत्तिदर्शनात् । तपसः पुनः पुनरुपदेशः साधनातिशयत्वावधारणार्थः । यावद्ब्रह्मणो लक्षणं निरतिशयं न भवति यावच्च जिज्ञासा न निवर्तते तावत्तप एव ते साधनम् । तपसैव ब्रह्म विजिज्ञासस्वेत्यर्थः । ऋज्वन्यत् ॥ इति श्रीशांकरभाष्ये द्वितीयोऽनुवाकः ॥ २

भाष्यार्थ—'कः पुनः०'—पण त्याच्या संशयाचें कारण काय, असें कोणी विचारील तर सांगतों—अन्नाची उत्पत्ति होत असल्याचें दिसतें. (श्रुति-स्मृतींमध्यें विराटाची उत्पत्ति होत असल्याचें दिसतें. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं लक्षण पूर्णपणें संभवत नाहीं. म्हणून त्यानें पुनः तप केलें) या प्रकरणांत

तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर, तप ब्रह्म आहे, असा जो वारंवार उपदेश केला आहे तो तपाला साधनातिशयत्व आहे, असा निश्चय करण्यासाठीं आहे. म्ह० जोंवर ब्रह्माचें लक्षण निरतिय झालेलें नाहीं व जोंवर जिज्ञासा निवृत्त झालेली नाहीं, तोंवर तप हेंच तुला साधन आहे. म्ह० तपानेंच ब्रह्माला विशेषेंकरून जाणण्याची इच्छा कर; असा याचा अर्थ. बाकी सर्व वाक्यांचा अर्थ सरळ आहे. ( इति भृगुवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाकः ) २.

**श्रुतिः—प्राणो ब्रह्मेति व्यजानात्। प्राणाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। प्राणेन जातानि जीवन्ति। प्राणं प्रयन्त्यभिसंविशन्तीति। तद्विज्ञाय। पुनरेव वरुणं पितरमुपससार। अधीहि भगवो ब्रह्मेति। तँ होवाच। तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व। तपो ब्रह्मेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा॥ ३॥**

अर्थ—स्पष्ट आहे. सु. उ. पृ. २३९ पहा. ॥ ३ ॥

**श्रुतिः—मनो ब्रह्मेति व्यजानात्। मनसो ह्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। मनसा जातानि जीवन्ति। मनः प्रयन्त्यभिसंविशन्तीति। तद्विज्ञाय। पुनरेव वरुणं पितरमुपससार। अधीहि भगवो ब्रह्मेति। तँ होवाच। तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व। तपो ब्रह्मेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा॥ ४॥**

**श्रुतिः—विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात् विज्ञानाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। विज्ञानेन जातानि जीवन्ति। विज्ञानं प्रयन्त्यसंविशन्तीति। तद्विज्ञाय। पुनरेव वरुणं पितरमुपससार। अधीहि भगवो ब्रह्मेति। तँ होवाच। तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व। तपो ब्रह्मेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा॥ ५॥**

अर्थ—सरळ आहे. सु. उ. पृ. २४०-४१ पाहा ( भृगूनें विचार करून विराट्-संज्ञक अन्नाचें कारण क्रियाशक्तिविशिष्टतेनें प्राणशब्दलक्ष्य हिरण्यगर्भ ब्रह्म आहे, असें जाणलें. नंतर संकल्प आणि निश्चय या शक्तींनें विशिष्ट असल्यामुळें क्रमानें मन व विज्ञान या शब्दाचें लक्ष्य असा हिरण्यगर्भ ब्रह्म आहे, असा त्यानें निश्चय केला.)

**श्रुतिः—आनन्दो ब्रह्मेति व्यजानात्। आनन्दाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। आनन्देन जातानि जीवन्ति। आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति॥**

अर्थ—सरळ आहे. सु. उ. पृ. २४१ पहा.

**भाष्यं—एवं तपसा विशुद्धात्मा प्राणादिषु साकल्येन ब्रह्मलक्षणमपश्यञ्शनैः-शनैरन्तरनुप्रविश्यान्तरतममानन्दं ब्रह्म विज्ञातवांस्तपसैव साधनेन भृगुस्तस्माद्ब्रह्मविजिज्ञासुना बाह्यान्तःकरणसमाधानलक्षणं परमं तपःसाधनमनुष्ठेयमिति प्रकरणार्थः। अधुनाऽऽख्यायिकातोऽपसृत्य श्रुतिः स्वेन वचनेनाऽऽख्यायिका-निर्वृतमर्थमाचष्टे—**

**भाष्यार्थ**—अशा रीतीनें तपाच्या योगानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, तो भृगु प्राणादिकांमध्यें ब्रह्माचें लक्षण संपूर्णपणें न पाहिल्यामुळें हळू हळू त्यांना सोडून त्यांच्या आंत प्रवेश करून सर्वांच्या आंत असलेला आनंद ब्रह्म आहे, असें तप याच साधनानें जाणता झाला.(पण हिरण्यगर्भालाहि कार्यत्व असल्यामुळें त्याच्या ठिकाणींहि लक्षण पूर्णपणें संभवत नाहीं, असा विचार करून त्याच्या कारणाचा स्वातंत्र्यानें निश्चय करून सर्वांकडून प्रार्थना केलें जाणारें या रूपानें आनंदशब्दवाच्य मायाविशिष्ट ब्रह्म आहे, असें जाणून विशिष्टाचा दुसरा विशिष्टच आत्मा असणें युक्त नसल्यामुळें कारणत्वोपलक्षित आनंदच ब्रह्म आहे, असें भृगु समजला, असा याचा भावार्थ. )=यास्तव ब्रह्मजिज्ञासूनें बाह्य इंद्रियें व अतःकरण यांचें समाधान हेंच परम तपःसाधन अनुष्ठावें, ( त्या समाधानलक्षण तपाचेंच अनुष्ठान करावें, ) हा या प्रकरणाचा अर्थ आहे. —आतां आख्यायिकेपासून निवृत्त होऊन श्रुति आपल्या वचनानें आख्यायिकेवरून निष्पन्न झालेला अर्थ सांगते—

**श्रुतिः—सैषा भार्गवी वारुणी विद्या । परमे व्योमन्प्रतिष्ठिता । स य एवं वेद प्रतितिष्ठति ॥**

**अर्थ**—ती ही भृगूनें जाणलेली व वरुणानें सांगितलेली विद्या परम आकाशांत प्रतिष्ठित आहे. जो कोणी असें जाणतो तो ब्रह्मामध्यें प्रतिष्ठित होतो.

**भाष्यं—सैषा भार्गवी भृगुणा विदिता वरुणेन प्रोक्ता वारुणी विद्या परमे व्योमन्हृदयाकाशगुहायां परम आनन्देऽद्वैते प्रतिष्ठिता परिसमाप्ताऽन्नमयादात्मनोऽधिप्रवृत्ता । य एवमन्योऽपि तपसैव साधनेनानेनैव क्रमेणानुप्रविश्याऽऽनन्दं ब्रह्म वेद स एवं विद्याप्रतिष्ठानात्प्रतितिष्ठत्यानन्दे परमे ब्रह्मणि, ब्रह्मैव भवतीत्यर्थः । दृष्टं च फलं तस्योच्यते—**

**भाष्यार्थ**—ती ही भार्गवी म्ह० भृगूनें जाणलेली व वरुणानें सांगितलेली म्हणून वारुणी विद्या परम आकाशांत म्ह० हृदयाकाश-गुहेंतील परम अद्वैत आनंदांत प्रतिष्ठित झालेली आहे. म्ह० अन्नमय आत्म्यापासून आधिक्यानें प्रवृत्त झालेली ती आनंदांत परिसमाप्त ( सर्व प्रकारें समाप्त ) झाली आहे. अशा प्रकारें जो कोणी दुसराहि तप याच साधनानें याच क्रमानें अनुप्रवेश करून आनंद ब्रह्म आहे, असें जाणतो तो अशा प्रकारें विद्याप्रतिष्ठानामुळें स्वतः आनन्द परम ब्रह्मामध्यें प्रतिष्ठित होतो. तो ब्रह्मच होतो, असा याचा अर्थ. पुढील वाक्यानें श्रुति त्याचें दृष्टफल सांगते—

**श्रुतिः—अन्नवानन्नादो भवति । महान्भवति । प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥ ६ ॥**

**अर्थ**—अन्नवान् व अन्नाद–अन्नभक्षक होतो. प्रजा, पशु, ब्रह्मवर्चस यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो ॥ ६ ॥

**भाष्यं—अन्नवान्प्रभूतमन्नमस्य विद्यत इत्यन्नवान्। सत्तामात्रेण तु सर्वो ह्यन्नवानिति विद्याया विशेषो न स्यात्। एवमन्नमत्तीत्यन्नादो दीप्ताग्निर्भवतीत्यर्थः। महान्भवति। केन महत्त्वमित्यत आह—प्रजया पुत्रादिना पशुभिर्गवाश्वादिभिर्ब्रह्मवर्चसेन शमदमज्ञानादिनिमित्तेन तेजसा। महान्भवति कीर्त्या ख्यात्या शुभप्रचारनिमित्तया॥ इति शांकरभाष्ये षष्ठोऽनुवाकः॥ ६॥**

**भाष्यार्थ**—'अन्नवान्'–पुष्कळ अन्न ज्याच्यापाशीं असतें तो अन्नवान्; ("अहोपण, मुळांत प्रभूत–पुष्कळ हें विशेषण श्रुत नाहीं. मग तुम्ही त्याचा निक्षेप कां करितां ?" **'सत्तामात्रेण०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–)=कारण नुस्तें परिमित अन्न असणें, एवढ्यानें सर्वच प्राणी अन्नवान् असतो, त्यामुळें नुस्तें अन्न असणें यांत विद्येपासून प्राप्त होणारा विशेष कांहींच नाहीं. (येथें नुस्तें अन्नाचें अस्तित्वच जर विवक्षित असतें तर कुत्रीं, मांजरें इत्यादि प्राणीहि शरीरस्थितीला अवश्य असलेल्या अन्नानें अन्नवान् असतात. तेव्हां नुस्ता अन्नवान् होतो, एवढ्याच सांगण्यानें विद्येचें विशेष फल सांगितलें आहे, असें होत नाहीं. म्हणून अन्नाला प्रभूत–पुष्कळ हें विशेषण दिलें आहे, असा भावार्थ. हें दृष्ट फल अविद्यालेशवशात् द्वैताभास पाहणाऱ्या जीवन्मुक्त ब्रह्मवेत्त्यालाहि प्राप्त होणें अशक्य नाहीं. ईश्वराच्या अनुग्रहानें अविद्वानांनाहि जर अन्नादिसमृद्धि झालेली दिसते, तर त्याच ईश्वराच्या आत्मत्वाचा साक्षात् अनुभव घेणाराला अन्नसमृद्धि होते, हें काय सांगावें !)=त्याचप्रमाणें 'अन्न खातो' म्हणून अन्नाद, म्हणजे तो विद्यावान् दीप्ताग्नि होतो, ज्याचा अग्नि अतिशय दीप्त झाला आहे, असा तो होतो. तसाच तो महान् होतो. कोणत्या कारणानें त्याला महत्त्व येतें, तें वेद सांगतो–पुत्रादि प्रजेच्या योगानें, गाय, घोडे इत्यादि पशूंच्या योगानें व ब्रह्मवर्चसानें म्ह० शम-दम-ज्ञानादिनिमित्त तेजानें. (तो महान् होतो.) तसाच तो शुभप्रचारनिमित्तक कीर्तीनें–ख्यातीनें महान् होतो. (इति भृगुवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः) ६.

**श्रुतिः—अन्नं न निन्द्यात्। तद्व्रतम्। प्राणो वा अन्नम्। शरीरमन्नादम्। प्राणे शरीरं प्रतिष्ठितम्। शरीरे प्राणः प्रतिष्ठितः। तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम्॥**

**अर्थ**—अन्नाची निंदा करूं नये. ब्रह्मज्ञाचें तें व्रत आहे. प्राणच अन्न आहे. शरीर अन्नाद आहे. प्राणांत शरीर प्रतिष्ठित आहे व शरीरांत प्राण प्रतिष्ठित आहे. तें हें शरीर व प्राण अन्न व अन्नाद असल्यामुळें परस्परांत प्रतिष्ठित आहे.

**भाष्यं—किंचान्नेन द्वारभूतेन ब्रह्म विज्ञातं यस्मात्तस्माद्गुरुमिवान्नं न निन्द्यात्तदस्यैवं ब्रह्मविदो व्रतमुपदिश्यते। व्रतोपदेशोऽन्नस्तुतये, स्तुतिभाक्त्वं चान्नस्य ब्रह्मोपलब्ध्युपायत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—तसेंच ज्याअर्थी द्वारभूत अन्नाच्या योगानें ब्रह्म विशेषेंकरून ज्ञात झालें आहे त्याअर्थी गुरूप्रमाणेंच अन्नाची निन्दा करूं नये. ब्रह्माला जाणणाऱ्या याला अशा प्रकारें त्या व्रताचा उपदेश केला जातो. व्रताचा उपदेश अन्नाच्या स्तुतीकरितां आहे. अन्न ब्रह्माच्या उपलब्धीचा उपाय आहे. त्यामुळें अन्नाला स्तुतिभाक्त्व आहे. (त्यामुळें अन्न स्तुतीला योग्य आहे. हीन अन्न जरी प्राप्त झालें तरी त्याची निंदा करूं नये. कारण 'यदृच्छेनें प्राप्त झालेलें हीन किंवा उत्तम अन्न खावें' असें सांगितलें आहे. ब्रह्मज्ञाचें नियमकथन साधकाच्या अनुष्ठानासाठीं आहे, याप्रमाणें लक्ष्य पदार्थाचें अनुसंधान हें वाक्यार्थज्ञानाचें मुख्य साधन व त्याचें फल यांचा उपसंहार करून आतां विचार करण्यास असमर्थ असलेल्या मंद अधिकाऱ्याला अन्नान्नादरूपानें प्राणादि उपासना, या गौण साधनाचें विधान 'प्राणो वा०' या वाक्यानें श्रुति करिते–)

**भाष्यं—प्राणो वा अन्नम्। शरीरान्तर्भावात्प्राणस्य। यद्यस्यान्तःप्रतिष्ठितं भवति तत्तस्यान्नं भवतीति। शरीरे च प्राणः प्रतिष्ठितस्तस्मात्प्राणोऽन्नं शरीरमन्नादम्। तथा शरीरमप्यन्नं प्राणोऽन्नादः। कस्मात्प्राणे शरीरं प्रतिष्ठितम्। तन्निमित्तत्वाच्छरीरस्थितेः। तस्मात्तदेतदुभयं शरीरं प्राणश्चान्नमन्नादश्च। येनान्योन्यस्मिन्प्रतिष्ठितं तेनान्नम्। येनान्योन्यस्य प्रतिष्ठा तेनान्नादः। तस्मात्प्राणः शरीरं चोभयमन्नमन्नादं च ॥**

**भाष्यार्थ**—'प्राणच अन्न आहे.' कारण प्राणाचा शरीरांत अन्तर्भाव होतो. (प्राण शरीरांत असतात.)=कारण जें ज्याच्या आंत प्रतिष्ठित असतें तें त्याचें अन्न असतें. शरीरांत प्राण प्रतिष्ठित होतो. तस्मात् प्राण अन्न व शरीर अन्नाद आहे. त्याचप्रमाणें शरीरहि अन्न व प्राण अन्नाद आहे. कारण प्राणांत शरीर प्रतिष्ठित आहे. कारण शरीराची स्थिति प्राण-अन्ननिमित्तक आहे. तस्मात् शरीर व प्राण हीं दोन्ही अन्न व अन्नादहि आहेत. ज्यामुळें तीं एकमेकांत प्रतिष्ठित आहेत, त्यामुळें अन्न आणि ज्यामुळें तीं एकमेकांचीं प्रतिष्ठाभूत आहेत त्यामुळें अन्नाद आहेत. यास्तव प्राण व शरीर हीं दोन्हीं अन्न व अन्नाद आहेत.

**श्रुतिः—स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति। अन्नवानन्नादो भवति महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन। महान्कीर्त्या ॥ ७ ॥**

**अर्थ**—तो जो कोणी हें अन्न अन्नांत प्रतिष्ठित आहे, असें जाणतो तो प्रतिष्ठित होतो. तो अन्नवान् व दीप्ताग्नि होतो. प्रजा, पशु, ब्रह्मवर्चस व कीर्ति यांनीं महान् होतो ॥ ७ ॥

**भाष्यं—स य एवमेतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठत्यन्नान्नादात्मनैव। किंचान्नवानन्नादो भवतीत्यादि पूर्ववत्॥ इति सप्तमोऽनुवाकः॥७॥**

**भाष्यार्थ**—तो जो अशा रीतीनें हें अन्न अन्नांत प्रतिष्ठित आहे, असें जाणतो तो अन्न व अन्नाद या रूपानेंच प्रतिष्ठित होतो. तसेंच, 'अन्नवान् अन्नादो भवति' इत्यादि वाक्यांचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच जाणावा. (इति भृगुवल्ल्यध्यायें सप्तमोऽनुवाकः). ७.

**श्रुतिः—अन्नं न परिचक्षीत। तद्व्रतम्। आपो वा अन्नम्। ज्योतिरन्नादम्। अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम्। ज्योतिष्यापः प्रतिष्ठिताः। तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम्। स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति। अन्नवानन्नादो भवति। महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन। महान्कीर्त्या॥ ८॥**

**अर्थ**—अन्नाचा परिहार करूं नये. तें व्रत आहे. पुढील अर्थ सरळ आहे. सु. उ. पृ. २४३-४४ पहा. ॥ ८ ॥

**भाष्यं—अन्नं न परिचक्षीत न च परिहरेत्। तद्व्रतं पूर्ववत्स्तुत्यर्थम्। तदेवं शुभाशुभकल्पनयाऽपरिगृह्यमाणं स्तुतं महीकृतमन्नं स्यात्। एवं यथोक्तमुत्तरेष्वप्यापो वा अन्नमित्यादिषु योजयेत्। अप्सु ज्योतिरित्यब्ज्योतिषोरन्नान्नादगुणत्वेनोपासकस्यान्नस्य बहुकरणं व्रतम्॥इति शांकरभाष्येऽष्टमोऽनुवाकः॥८॥**

**भाष्यार्थ**—अन्नाचा परिहार करूं नये. तें व्रत आहे. हें पूर्वीप्रमाणेंच स्तुतीकरितां सांगितलें आहे. शुभ व अशुभ कल्पनेनें ज्याचा परिग्रह केला जात नाहीं, असें तें–अशा रीतीनें स्तुति केलेलें असें स्तुतीनें श्रेष्ठ बनविलेलें अन्न होतें. हें म्ह० येथें जें सांगितलें आहे त्याची 'आपो वा अन्नं०' इत्यादि पुढील पर्यायांतहि योजना करावी. 'अप्सु ज्योतिः' म्ह० जलांत ज्योति प्रतिष्ठित आहे व ज्योतीमध्यें जल प्रतिष्ठित आहे, अशा रीतीनें आप् व ज्योति यांची अन्नत्व व अन्नादत्व या गुणांनीं उपासना करणाराचें 'अन्नाचें बहुकरण' हें व्रत आहे. (इति भृगुवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाकः) ॥ ८ ॥

**श्रुतिः—अन्नं बहु कुर्वीत। तद्व्रतम्। पृथिवी वा अन्नम्। आकाशोऽन्नादः। पृथिव्यामाकाशः प्रतिष्ठितः। आकाशे पृथिवी प्रतिष्ठिता। तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम्।**

**स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन। महान्कीर्त्या ॥ ९ ॥**

**अर्थ**—पुष्कळ अन्न संपादन करावें. इत्यादि पूर्वीप्रमाणेंच सु.उ.पृ.२४४ पहा.

**श्रुतिः—न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत । तद्व्रतम् । तस्माद्यया कया च विधया बह्वन्नं प्राप्नुयात् । आराध्यस्मा अन्नमित्याचक्षते ॥**

**अर्थ**—वसतीकरितां आलेल्या कोणाचेंहि पृथिव्याकाशोपासकानें निवारण करूं नये. तें त्याचें व्रत आहे. निवास दिल्यावर अन्न देणेंहि अवश्य असल्यामुळें कोणत्याहि प्रकारें पुष्कळ अन्न संपादन करावें. कारण अन्नवान् उपासक अभ्यागताला अन्न सिद्ध आहे, असें सांगतात.

**भाष्यं—तथा पृथिव्याकाशोपासकस्य वसतौ वसतिनिमित्तं कंचन कंचिदपि न प्रत्याचक्षीत वसत्यर्थमागतं न निवारयेदित्यर्थः । वासे च दत्तेऽवश्यं ह्यशनं दातव्यम् । तस्माद्यया कया च विधया येन केन च प्रकारेण बह्वन्नं प्राप्नुयाद्बह्वन्नसंग्रहं कुर्यादित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें पृथिवी व आकाश यांच्या उपासकाच्या वसतीविषयीं म्ह० वसतीच्या निमित्तानें कोणाचाहि निषेध करूं नये. वसतीकरितां आलेल्या कोणाचेंहि निवारण करूं नये, असा याचा अर्थ. वास ( रहावयास जागा ) दिली असतां भोजनहि अवश्य देणें उचित आहे. यास्तव कोणत्याहि विधीनें—कोणत्याहि प्रकारानें पुष्कळ अन्न प्राप्त करून घ्यावें. पुष्कळ अन्नाचा संग्रह करावा, असा याचा अर्थ.

**भाष्यं—यस्मादन्नवन्तो विद्वांसोऽभ्यागतायान्नार्थिनेऽराधि संसिद्धमस्मा अन्नमित्याचक्षते न नास्तीति प्रत्याख्यानं कुर्वन्ति तस्माच्च हेतोर्बह्वन्नं प्राप्नुयादिति पूर्वेण संबन्धः । अपि चान्नदानस्य माहात्म्यमुच्यते । यथा यत्कालं प्रयच्छत्यन्नं तथा तत्कालमेव प्रत्युपनमते । कथमिति तदेतदाह—**

**भाष्यार्थ**—ज्याअर्थीं अन्नवन्त विद्वान् अन्नाची इच्छा करणाऱ्या अभ्यागताला त्याच्याकरितां अन्न अगदीं सिद्ध आहे, असें सांगतात. ‘ नाहीं ’ असें म्हणून प्रत्याख्यान ( निषेध ) कधीं करीत नाहींत, त्या कारणानेंहि बहु अन्नाचा संग्रह करावा, असा पूर्ववाक्याशीं संबंध. शिवाय अन्नदानाचें माहात्म्य सांगितलें जातें. जसें ज्यावेळीं अन्न देतो तसें त्याच वेळीं तें त्याला उलट नम्र होऊन परत मिळतें. तें कसें, तेंच सांगतात—

**श्रुतिः—एतद्वै मुखतोऽन्न॰राद्धम् । मुखतोऽस्मा अन्न॰राध्यते । एतद्वै मध्यतोऽन्न॰राद्धम् । मध्यतोऽस्मा अन्न॰राध्यते । एतद्वा अन्ततोऽन्न॰राद्धम् । अन्ततोऽस्मा अन्न॰राध्यते ( १ )। य एवं वेद ॥**

**अर्थ**—हेंच सिद्ध अन्न अभ्यागताला मुख्य वृत्तीनें किंवा प्रथम वयांत देतो. त्याला तसेंच तें प्राप्त होतें. हेंच मध्यवृत्तीनें किंवा मध्यवयांत देतो. तें त्याला तशाच वृत्तीनें किंवा त्याच वयांत प्राप्त होतें. अन्त्य वयांत किंवा हीन उपचारानें दिलेलें अन्न त्याला तसेंच प्राप्त होतें. जो असें अन्नमाहात्म्य जाणतो त्याला पूर्वोक्त फल प्राप्त होतें.

**भाष्यं—एतद्वा अन्नं मुखतो मुख्ये प्रथमे वयसि मुख्यया वा वृत्त्या पूजापुरःसरमभ्यागतायान्नार्थिने राद्धं संसिद्धं प्रयच्छतीति वाक्यशेषः । तस्य किं फलं स्यादित्युच्यते—मुखतः पूर्वे वयसि मुख्यया वा वृत्त्याऽस्मा अन्नादायान्नं राध्यते यथादत्तमुपतिष्ठत इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—हेंच अन्न ' मुखतः '–मुख्य प्रथम वयांत किंवा मुख्य वृत्तीनें पूजापुरःसर अन्नाची इच्छा करणाऱ्या अभ्यागताला सिद्ध केलेलें देतो; (' देतो ' अशा अर्थाचें ' प्रयच्छति ' हें क्रियापद बाहेरून घ्यावें ) त्याला कोणतें फल मिळतें तें श्रुति सांगते–' मुखतः ' म्ह० पूर्व वयांत किंवा मुख्य वृत्तीनें या अन्न देणाराला अन्न सिद्ध करून दिलें जातें. म्ह० तें जसें दिलें असेल तसेंच उलट उपस्थित होतें, असा याचा भावार्थ.

**भाष्यं—एवं मध्यतो मध्यमे वयसि मध्यमेन चोपचारेण । तथाऽन्ततोऽन्ते वयसि जघन्येन चोपचारेण परिभवेन तथैवास्मै राध्यते संसिध्यत्यन्नम् । य एवं वेद य एवमन्नस्य यथोक्तं माहात्म्यं वेद तद्दानस्य यथोक्तं फलमुपनयेत् । इदानीं ब्रह्मण उपासनप्रकार उच्यते—**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें ' मध्यतः ' म्ह० मध्यम वयांत किंवा मध्यम उपचारानें; तसेंच ' अन्ततः ' म्ह० अन्त्य वयांत किंवा हीन उपचारानें–तिरस्कारानें जें अन्न दिलें जातें तें अन्न त्याला तसेंच सिद्ध होतें. जो अशा रीतीनें अन्नाचें वर सांगितल्या प्रमाणें माहात्म्य जाणतो त्याला अन्नदानाचें वर सांगितल्याप्रमाणें फल प्राप्त होतें. आतां ब्रह्माच्या उपासनेचा प्रकार सांगतात–

**श्रुतिः—क्षेम इति वाचि । योगक्षेम इति प्राणापानयोः । कर्मेति हस्तयोः । गतिरिति पादयोः । विमुक्तिरिति पायौ । इति मानुषीः समाज्ञाः ॥**

**अर्थ**—ब्रह्म वाणीमध्यें क्षेम–वस्तूचें परिरक्षण या रूपानें प्रतिष्ठित आहे, असें उपास्य आहे. योग-क्षेमरूपानें प्राणपानामध्यें, कर्मरूपानें दोन्ही हातांमध्यें, गतिरूपानें पायांमध्यें व त्यागरूपानें पायूमध्यें, या मनुष्यांतील उपासना आहेत.

**भाष्यं**—क्षेम इति वाचि । क्षेमो नामोपात्तपरिरक्षणम् । ब्रह्म वाचि क्षेमरूपेण प्रतिष्ठितमित्युपास्यम् । योगक्षेम इति, योगोऽनुपात्तस्योपादानम् । तौ हि योगक्षेमौ प्राणापानयोः सतोर्भवतो यद्यपि तथाऽपि न प्राणापाननिमित्तावेव किं तर्हि ब्रह्मनिमित्तौ । तस्माद्ब्रह्म योगक्षेमात्मना प्राणापानयोः प्रतिष्ठितमित्युपास्यम् ॥

**भाष्यार्थ**—'क्षेमः०'—क्षेम म्ह० प्राप्त वस्तूचें परिरक्षण. ब्रह्म वाणीमध्यें क्षेमरूपानें प्रतिष्ठित आहे, असें जाणून उपासना करण्यास योग्य आहे. 'योगक्षेम०'—जें प्राप्त नसेल त्याचें संपादन करणें हा योग. योग व क्षेम हे दोन्ही प्राण व अपान हे असले तरच होणार हें जरी खरें आहे, तरी ते प्राण व अपान यांच्याच निमित्तानें होणारे नाहींत. तर ते ब्रह्मनिमित्त आहेत. तस्मात् ब्रह्म योग व क्षेम यांच्या रूपानें प्राण व अपान यांमध्यें स्थित आहे, असें समजून तें उपासना करण्यास योग्य आहे.

**भाष्यं**—एवमुत्तरेष्वन्येषु तेन तेनाऽऽत्मना ब्रह्मैवोपास्यम् । कर्मणो ब्रह्मनिर्वर्त्यत्वाद्धस्तयोः कर्माऽऽत्मना ब्रह्म प्रतिष्ठितमित्युपास्यम् । गतिरिति पादयोः । विमुक्तिरिति पायौ । इत्येता मानुषीर्मनुष्येषु भवा मानुष्यः समाज्ञाः, आध्यात्मिक्यः समाज्ञा ज्ञानानि विज्ञानान्युपासनानीत्यर्थः ॥

**भाष्यार्थ**—पुढील दुसऱ्या सर्व पर्यायांतहि असेंच त्या त्या रूपानें ब्रह्मच उपास्य आहे. कर्म ब्रह्माकडूनच केलें जाणारें असल्यामुळें दोन्ही हातांच्या ठिकाणीं ब्रह्म कर्मरूपानें प्रतिष्ठित आहे, असें समजून तेंच उपास्य आहे. दोन्ही पायांचे ठिकाणीं तें गतिरूपानें, व पायु या इंद्रियामध्यें त्याग या रूपानें तें आहे, असें जाणून त्याची उपासना करावी. अशा या मानुषी म्ह० मनुष्यामध्यें होणाऱ्या मानुष्य समाज्ञा म्ह० आध्यात्मिक समाज्ञा—ज्ञानें—विज्ञानें—उपासनें आहेत, असा याचा अर्थ.

**श्रुतिः**—अथ दैवीः । तृप्तिरिति वृष्टौ । बलमिति विद्युति (२) । यश इति पशुषु । ज्योतिरिति नक्षत्रेषु । प्रजातिरमृतमानन्द इत्युपस्थे । सर्वमित्याकाशे । तत्प्रतिष्ठेत्युपासीत । प्रतिष्ठावान्भवति ॥

**अर्थ**—आतां देवांतील समाज्ञा सांगितल्या जातात. तृप्ति या भावनेनें वृष्टीमध्यें ब्रह्मोपासना करावी. 'बल' अशी विद्युत्-मध्यें, 'यश' अशी पशूंमध्यें, 'ज्योति' अशी नक्षत्रामध्यें, प्रजा, पुत्रद्वारा अमृतत्वप्राप्ति व आनंद या रूपानें उपस्थामध्यें, सर्वरूपानें आकाशामध्यें ब्रह्मोपासना करावी. तें आकाश ब्रह्म [illegible] प्रतिष्ठा आहे, अशी उपासना करावी. प्रतिष्ठावान् होतो.




**भाष्यं**—अथानन्तरं दैवीर्दैव्यो देवेषु भवाः [illegible] । तृप्तिरिति वृष्टौ । वृष्टेरन्नादिद्वारेण तृप्तिहेतुत्वाद्ब्रह्मैव तृप्त्यात्म[illegible]

स्यम् । यथाऽन्येषु तेन तेनाऽऽत्मना ब्रह्मैवोपास्यम् । तथा बलरूपेण विद्युति । यशोरूपेण पशुषु । ज्योतीरूपेण नक्षत्रेषु । प्रजातिरमृतममृतत्वप्राप्तिः पुत्रेण ऋणविमोक्षद्वारेणाऽऽनन्दः सुखमित्येतत्सर्वमुपस्थनिमित्तं ब्रह्मैवानेनाऽऽत्मनोपस्थे प्रतिष्ठितमित्युपास्यम् ॥

**भाष्यार्थ**—त्यानंतर आतां दैवी म्ह० देवांमध्यें झालेल्या समाज्ञा सांगितल्या जातात. तृप्ति या भावनेनें वृष्टीमध्यें ब्रह्माची उपासना करावी. म्ह० वृष्टि अन्नादिकांच्या द्वारा तृप्तीला कारण होणारी असल्यामुळें ब्रह्मच तृप्तिरूपानें वृष्टींत व्यवस्थित आहे, अशा भावनेनें ब्रह्म उपासना करण्यास योग्य आहे. त्याचप्रमाणें अन्य पदार्थांमध्येंहि त्या त्या रूपानें ब्रह्माचीच उपासना करावी. कशी ती पहा—बलरूपानें विद्युत्मध्यें; यशोरूपानें पशूंमध्यें; ज्योतीरूपानें नक्षत्रांमध्यें; 'प्रजाति'—पुत्रादि प्रजा, 'अमृत'—पुत्राच्या योगानें ऋणांतून सर्वथा मुक्त होणें, इत्यादिकांच्या द्वारा अमृतत्वप्राप्ति व 'आनन्द'—सुख, असें हें—उपस्थेंद्रियनिमित्तक सर्व ब्रह्मच आहे. ब्रह्मच या रूपानें उपस्थामध्यें प्रतिष्ठित आहे, अशी त्याची उपासना करावी.

**भाष्यं**—सर्वं ह्याकाशे प्रतिष्ठितमतो यत्सर्वमाकाशे तद्ब्रह्मैवेत्युपास्यम् । तच्चाऽऽकाशं ब्रह्मैव । तस्मात्तत्सर्वस्य प्रतिष्ठेत्युपासीत । प्रतिष्ठागुणोपासनात्प्रतिष्ठावान्भवति । एवं पूर्वेष्वपि यद्यत्तदधीनं फलं तद्ब्रह्मैव तदुपासनात्तद्वान्भवतीति द्रष्टव्यम् । श्रुत्यन्तराच्च—"तं यथा यथोपासते तदेव भवति" इति ॥

**भाष्यार्थ**—सर्व वस्तुजात आकाशामध्यें प्रतिष्ठित आहे, हें प्रसिद्ध आहे. यास्तव जें सर्व आकाशांत आहे तें ब्रह्मच आहे, अशी उपासना करावी. शिवाय तें आकाश ब्रह्मच आहे. यास्तव तें सर्वांची प्रतिष्ठा आहे, अशी उपासना करावी. प्रतिष्ठा या गुणाची उपासना केल्यामुळें उपासक प्रतिष्ठावान् होतो. याच न्यायानें पूर्वींच्या यागादि पर्यायांतहि जें जें ब्रह्माच्या अधीन असलेलें फल—कार्य—क्षेमादि सांगितलें आहे तें ब्रह्मच आहे. त्याच्या उपासनेनें पुरुष तद्वान् होतो, असें जाणावें. 'त्याची जशी जशी (ज्या भावानें) उपासना करतो तेंच तो होतो'—सु. उ. पृ.—अशी दुसरी श्रुति आहे. (कोणत्याहि विशेष फळाची इच्छा न धरतां केलेली उपासना बुद्धिशुद्धीच्या द्वारा ब्रह्मज्ञानाला उपकारक होते. पण तीच मुख्य अधिकाऱ्याच्या अपवादाला म्ह० हें सर्व जगत् नसून ब्रह्मच आहे, अशा ज्ञानाला कारण होते.)

**श्रुतिः**—तन्मह इत्युपासीत । महान्भवति । तन्मन इत्युपासीत । मानवान्भवति (३)। तन्नम इत्युपासीत । नम्यन्तेऽस्मै कामाः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्म

**वान्भवति । तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येणं म्रियन्ते द्विषन्तः सपत्नाः । परि येऽप्रिया भ्रातृव्याः ॥**

**अर्थ**—तें मह या रूपानें उपासावें इत्यादि अर्थ स्पष्ट आहे. सु. उ. पृ. २४७–४८ पहा.

**भाष्यं**—तन्मह इत्युपासीत । महो महत्त्वगुणवत्तदुपासीत । महान्भवति । तन्मन इत्युपासीत । मननं मनः । मानवान्भवति मननसमर्थो भवति । तन्नम इत्युपासीत । नमनं नमो नमनगुणवत्तदुपासीत । नम्यन्ते प्रह्वीभवन्त्यस्मा उपासित्रे कामाः काम्यन्त इति भोग्या विषया इत्यर्थः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्म परिवृढतममित्युपासीत । ब्रह्मवांस्तद्गुणो भवति ॥

**भाष्यार्थ**—तें 'मह' या रूपानें उपासावें. 'महः' म्ह० तें महत्त्वगुणयुक्त आहे, अशा भावनेनें त्याची उपासना करावी. तो उपासक प्रजादिकांनीं महान् होतो. तें मन असें उपासावें. मनन हेंच मन होय. म्ह० तो मानवान् होतो; मनन करावयास समर्थ होतो. तें नम असें उपासावें. नमन हेंच नम आहे. अर्थात् तें नमन या गुणानें युक्त आहे, अशा रीतीनें त्याची उपासना करावी. त्या उपासकाला—उपासकापुढें सर्व काम नमतात. ज्यांची कामना केली जाते ते काम म्ह० भोग्य विषय असा त्याचा अर्थ. तें ब्रह्म असें उपासावें. ब्रह्म—सर्व प्रकारें अतिशय वाढलेलें, अशा गुणानें त्याची उपासना करावी. उपासक ब्रह्मवान् विराडाप्रमाणें स्थूलभोगसाधनवान्, त्याच्या गुणांनीं युक्त होतो.

**भाष्यं**—तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । ब्रह्मणः परिमरः परिम्रियन्तेऽस्मिन्पञ्च देवता विद्युद्वृष्टिश्चन्द्रमा आदित्योऽग्निरित्येताः । अतो वायुः परिमरः श्रुत्यन्तरप्रसिद्धेः । स एष एवायं वायुराकाशेनानन्य इत्याकाशो ब्रह्मणः परिमरस्तमाकाशं वाय्वात्मानं ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येनमेवंविदं प्रतिस्पर्धिनो द्विषन्तोऽद्विषन्तोऽपि सपत्ना यतो भवन्त्यतो विशेष्यन्ते द्विषन्तः सपत्ना इति । य एनं द्विषन्तः सपत्नास्ते परिम्रियन्ते प्राणाञ्जहति । किंच ये चाप्रिया अस्य भ्रातृव्या अद्विषन्तोऽपि ते च परिम्रियन्ते ॥

**भाष्यार्थ**—तें ब्रह्माचा परिमर असें उपासावें. ब्रह्माचा परिमर म्ह० यांत विद्युत्, वृष्टि, चंद्रमा, आदित्य व अग्नि अशा या पांच देवता सर्वतः मरतात—लीन होतात. यास्तव वायु हा परिमर आहे. कारण दुसऱ्या श्रुतींत तशी प्रसिद्धीहि आहे. ('य एवमेताः पंच देवता वायुर्वाव संवर्गः'—सु.उ.पृ.३७४—इत्यादि श्रुति आहे. त्या श्रुतीवरून ब्रह्माचें संहारकर्तृत्व वायुद्वारक आहे, म्ह० ब्रह्म वायूच्या द्वारा संहार करणारें होतें, असें ठरतें. म्हणून वायु ब्रह्माचा परिमर म्ह० संहाराचें साधन आहे. पण परिमरगुणत्वानें आकाशोपासन कसें सिद्ध होतें, तें 'स

एष०' इत्यादि भाष्यानें सांगतात '–)=तोच हा वायु आकाशाशीं अनन्य (अभिन्न) आहे. म्हणून आकाश हा ब्रह्माचा परिमर आहे. त्या वायुरूप आकाशाला ब्रह्माचा परिमर या दृष्टीनें उपासावें. 'एनं '–असें जाणणाऱ्या, अशी उपासना करणाऱ्या उपासकाचे जे द्वेष करणारे प्रतिस्पर्धी, कांहीं सपत्न द्वेष न करणारहि असतात; म्हणून 'द्विषन्तः सपत्नाः' असें सपत्नांना 'द्विषन्तः' हें विशेषण दिलें जातें. जे त्याचा द्वेष करणारे सपत्न –प्रतिस्पर्धी असतात ते 'परिम्रियन्ते'–प्राणांना सोडतात. तसेच जे याचे अप्रिय भ्रातृव्य द्वेष न करणारे असेहि असतात तेहि मरतात. (येणेंप्रमाणें अज्ञानदशेंत मन्द अधिकाऱ्यांच्या उपयोगी असलेल्या सर्व उपासना सांगून आतां अपवादहष्टीचा आश्रय करून **'प्राणो वा अन्नं०'** इत्यादि भाष्यानें सांगतात—)

**भाष्यं**—**प्राणो वा अन्नं शरीरमन्नादमित्यारभ्याऽऽकाशान्तस्य कार्यस्यैवान्नान्नादत्वमुक्तम्। उक्तं नाम किं तेन, तेनैतत्सिद्धं भवति, कार्यविषय एव भोज्यभोक्तृत्वकृतः संसारो न त्वात्मनीति। आत्मनि तु भ्रान्त्योपचर्यते॥**

**भाष्यार्थ**—प्राण हेंच अन्न आहे; व शरीर अन्नाद आहे; येथपासून आरंभ करून आकाशापर्यंत कार्यालाच अन्नत्व व अन्नादत्व सांगितलें आहे. (वादी–)=बरें सांगितलें आहे, पण त्यानें झालें काय? (सिद्धान्ती–)=त्याच्या योगानें भोज्यभोक्तृत्वकृत संसार कार्यविषयकच आहे; तो आत्म्यामध्यें नाहीं, हें सिद्ध झालें. पण आत्म्याच्या ठिकाणीं तो भ्रांतीनें कल्पिला जातो. (भोक्तृत्वादिलक्षण संसार कार्यविषय आहे, असें म्हणणाऱ्या भागवतांना जीवाचें स्वाभाविक संसारित्व इष्ट आहे, कारण जीवालाहि कार्यत्व आहे, हें भागवतांचें मत '**ननु०**' इत्यादि भाष्यानें उत्थापित करून त्याचें निरसन करितात–)

**भाष्यं**—**नन्वात्माऽपि परमात्मनः कार्यं ततो युक्तस्तस्य संसार इति। न। असंसारिण एव प्रवेशश्रुतेः। "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" इत्याकाशादिकारणस्य ह्यसंसारिण एव परमात्मनः कार्येऽनुप्रवेशः श्रूयते। तस्मात्कार्यानुप्रविष्टो जीव आत्मा पर एवासंसारी। सृष्ट्वाऽनुप्राविशदिति समानकर्तृकत्वोपपत्तेश्च। सर्गप्रवेशक्रिययोश्चैकश्चेत्कर्ता ततः क्त्वाप्रत्ययो युक्तः॥**

**भाष्यार्थ**—(वादी–)=अहोपण, आत्माहि परमात्म्याचें कार्य आहे; त्यामुळें त्याचा संसार योग्यच आहे. (सिद्धान्ती–)=नाहीं; तसें नाहीं. कारण श्रुतींत असंसारी परमात्म्याचाच प्रवेश सांगितला आहे. 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' म्ह० त्या कार्याला उत्पन्न करून तो त्यांतच मागून प्रविष्ट झाला, या श्रुतिवचनानें तर आकाशादिकांचें कारण जो असंसारी परमात्मा त्याचाच कार्यामध्यें अनुप्रवेश सांगितला आहे. यास्तव कार्यामध्यें प्रविष्ट झालेला जीव आत्मा पर असंसारीच आहे. शिवाय उत्पन्न करून त्यांत

प्रविष्ट झाला; या वाक्यांतील समानकर्तृकत्वाचीहि उपपत्ति लागत असल्यामुळें असं-
सारीच प्रविष्ट झाला. म्ह० उत्पन्न करणें व प्रवेश करणें या दोन क्रियांचा एकच जर
कर्ता असेल तरच 'सृष्ट्वा' येथील क्त्वाप्रत्यय उपपन्न होईल. (त्यावांचून- त्या दोन्ही
क्रियांचा समान कर्ता असल्यावांचून 'सृष्ट्वा' हें उपपन्न होणार नाहीं.)

**भाष्यं—प्रविष्टस्य तु भावान्तरापत्तिरिति चेत्। न। प्रवेशस्यान्यार्थत्वेन प्रत्याख्यातत्वात्। अनेन जीवेनेति विशेषश्रुतेर्धर्मान्तरेणानुप्रवेश इति चेत्। न। तत्त्वमसीति पुनस्तद्भावोक्तेः। भावान्तरापन्नस्यैव तदपोहार्था संपदिति चेत्। न। तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसीति सामानाधिकरण्यात्॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, प्रविष्ट झालेल्या त्याला दुसऱ्या भावाची प्राप्ति होते;' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण प्रवेशाचें प्रयोजन निराळें आहे असें सांगून —पृ. १२३ पहा—आह्मी या आक्षेपाचें निरसन केलें आहे. (छांदोग्य श्रुतीच्या अनु-रोधानें विकाररूपानें प्रवेशाची आशंका घेऊन '**अनेन जीवेन०**' या भाष्यानें वाक्य-शेषविरोध सांगतात—)='अनेन जीवेन०'—सु.उ.पृ.४२४—अशी विशेष श्रुति असल्या-मुळें दुसऱ्या धर्मानें त्याचा अनुप्रवेश होतो, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'तें तूं आहेस'—सु.उ.पृ.४३३—असें म्हणून पुनः त्याला तद्रूपत्व सांगितलें आहे. 'निराळ्या भावास प्राप्त झालेल्या त्या भावाचा निषेध करण्यासाठीं ती नुस्ती संपत् आहे,' म्हणून म्हणाल; (म्ह० भ्रान्तीनें देहादिभावास प्राप्त झालेल्या व ब्रह्माहून निरा-ळ्याच असलेल्या जीवाला त्याच्या संसारित्वाचा निषेध करण्यासाठीं त्याच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी, असा उपदेश केला जात आहे. अर्थात् स्वाभाविक अभिलाषाचा निषेध करण्यासाठीं परस्त्रीच्या ठिकाणीं मातृबुद्धीचा जसा उपदेश करितात, त्याचप्रमाणें हें समजावें, म्हणून म्हणाल) तर '**न०**'—तें बरोबर नाहीं. कारण श्रुतींत 'तें सत्य आहे, तो आत्मा आहे व तेंच तूं आहेस' असें समानाधिकरण्य आहे. (म्ह० अबाधित तत्प-दार्थाच्या मुख्य सामानाधिकरण्याशीं विरोध येत असल्यामुळें अब्रह्म जीवामध्यें ब्रह्मत्व संपादन करण्यासाठीं तो उपदेश आहे, असें म्हणतां येत नाहीं, असा भावार्थ.)

**भाष्यं—दृष्टं जीवस्य संसारित्वमिति चेत्। न। उपलब्धुरनुपलभ्यत्वात्। संसारधर्मविशिष्ट आत्मोपलभ्यत इति चेत्। न। धर्माणां धर्मिणोऽव्यतिरेका-त्कर्मत्वानुपपत्तेः। उष्णप्रकाशयोर्दाह्यप्रकाश्यत्वानुपपत्तिवत्॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, जीवाचें संसारित्व प्रत्यक्ष आहे.' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण जो उपलब्धा त्याला उपलभ्यत्व असूं शकत नाहीं. (तर सुखादि विषयांनाच उपलभ्यत्व असतें.) 'संसार या धर्मानें विशिष्ट असलेला आत्मा उपलब्ध

होतो' म्हणून म्हणाल तर तेंहि युक्त नव्हे. कारण कोणतेहि धर्म धर्मीहून पृथक् नसतात. त्यामुळें त्यांना कर्मत्व संभवत नाहीं. (धर्मी कर्ता व त्याचे धर्म, हें त्याचें कर्म असें संभवत नाहीं.) अर्थात् उष्ण व प्रकाश ह्या सूर्याच्या धर्मांना जसें दाह्यत्व व प्रकाश्यत्व असूं शकत नाहीं त्याप्रमाणें. (काष्ठादि भिन्न पदार्थच दाह्य व प्रकाश्य म्ह० दहन करण्यास योग्य व प्रकाशित करण्यास योग्य असतात. बरें, 'त्रासादिक व दुःखादिक साश्रय आहेत. कारण तींहि कार्यें आहेत. घटादिकांप्रमाणें,' या अनुमानावरून त्रासादिकांचा म्ह० भयादि विकारांचा आश्रय सिद्ध होतो. पण त्यांचा दुसरा कोणी आश्रय नसल्यामुळें आत्माच त्यांचा आश्रय आहे, असें अनुमान होतें, अशी शंका घेऊन तिचें निरसन 'त्रासादि०' या भाष्यानें करितात—)

**भाष्यं—त्रासादिदर्शनाद्दुःखित्वाद्यनुमीयत इति चेत्। न। त्रासादेर्दुःखस्य चोपलभ्यमानत्वान्नोपलब्धृधर्मत्वम्। कापिलकाणादादितर्कशास्त्रविरोध इति चेत्। न। तेषां मूलाभावे वेदविरोधे च भ्रान्तत्वोपपत्तेः। श्रुत्युपपत्तिभ्यां च सिद्धमात्मनोऽसंसारित्वमेकत्वाच्च। कथमेकत्वमित्युच्यते—**

**भाष्यार्थ**—त्रासादिकांचा साक्षात् अनुभव येत असल्यामुळें त्यांवरून आत्म्याच्या दुःखित्वादिकांचें अनुमान होतें, म्हणून म्हणाल तर तेंहि सयुक्तिक नाहीं. कारण त्रासादिक व दुःख यांना उपलभ्यमानत्व आहे. म्ह० तीं अनुभविलीं जातात. त्यामुळें त्यांना त्यांचा अनुभव घेणाराचें धर्मत्व नाहीं. म्ह० त्रासादिक व दुःख हे त्याचा अनुभव घेणारा जो जीव त्याचे धर्म नव्हेत, तर त्याच्या अनुभवाचे विषय आहेत. (बरें, जीवाला ब्रह्मरूपत्व आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या वेदान्तशास्त्राचा) 'कापिल, काणाद (म्ह० सांख्य, वैशेषिक) इत्यादि तर्कशास्त्राशीं विरोध येतो,' म्हणून म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण त्यांच्या तर्कांना अपौरुषेय वेदवाक्यें, हें मूळ नाहीं; उलट त्या वेदाशीं त्यांचा विरोध आहे, असें झाल्यास त्या तर्कांना भ्रांतत्व असणेंच युक्त आहे. (म्ह० त्यांच्या तर्कांना मूळ प्रमाण नाहीं व ते वेदविरुद्धहि आहेत, असें झाल्यास ते भ्रामक आहेत, असें समजणेंच सयुक्तिक आहे.) श्रुति व उपपत्ति यांच्या योगानें आत्म्याचें असंसारित्व सिद्ध झालेलें आहे. आत्म्याच्या एकत्वावरूनहि त्याच्या असंसारित्वाची सिद्धि होते. 'अहोपण, त्याला एकत्व कसें?' अशी शंका घेऊन श्रुति सांगते—

**श्रुतिः—स यश्चायं पुरुषे। यश्चासावादित्ये। स एकः (४)। स य एवंवित्। अस्माल्लोकात्प्रेत्य। एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं विज्ञानमयमात्मानमुपसं-**

क्रम्य। एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रम्य। इमाँल्लोकान्कामान्नी कामरूप्यनुसं-चरन्। एतत्साम गायन्नास्ते ॥

**अर्थ**—तो जो हा या पुरुषांत आहे आणि हा जो आदित्यांत आहे, तो एक आहे. जो अशी उपासना करितो, तो या बाह्य पुत्रादि लोकांपासून निवृत्त होऊन या शरीररूपी आत्म्याचें उपसंक्रमण करून...इत्यादि स्पष्ट आहे. सु. उ. पृ. २४९ पहा. '**इमान् लोकान्०**'—या भूः, भुवः इत्यादि लोकांतून कामान्नी व कामरूपी होऊन अनुसंचार करीत हें साम गात राहतो.

**भाष्यं**—स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एक इत्येवमादि पूर्ववत्सर्वम्। अन्नमयादिक्रमेणाऽऽनन्दमयमात्मानमुपसंक्रम्यैतत्साम गायन्नास्ते ॥

**भाष्यार्थ**— तो जो हा या पुरुषांत आहे; आणि हा जो आदित्यामध्यें आहे तो एक आहे; इत्यादि हें सर्व पूर्वी ब्रह्मवल्ल्यध्यायांत जसें सांगितलें आहे तसेंच समजावें. अन्नमयादि क्रमानें आनंदमय आत्म्यास उपसंक्रांत होऊन हें साम गात राहतो. ( आतां वल्लीच्या समाप्तीपर्यंतच्या ग्रंथाचें तात्पर्य गतार्थाच्या अनुवादानें '**सत्यं ज्ञानं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात- )

**भाष्यं**—सत्यं ज्ञानमित्यस्या ऋचोऽर्थो व्याख्यातो विस्तरेण तद्विवरणभूतयाऽऽनन्दवल्ल्या। सोऽश्नुते सर्वान्कामान्सह ब्रह्मणा विपश्चितेति तस्य फलवचनस्यार्थविस्तारो नोक्तः। के ते किंविषया वा सर्वे कामाः कथं वा ब्रह्मणा सह समश्नुत इत्येतद्वक्तव्यमितीदमिदानीमारभ्यते ॥

**भाष्यार्थ**— 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' या ऋचेचा अर्थ तिच्याच विवरणभूत आनन्दवल्लीनें विस्तारपूर्वक सांगितला. पण 'सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चितेति' या त्याच्या फलवचनाच्या अर्थाचा विस्तार करून सांगितला नाहीं. ते सर्व काम कोणते अथवा कशाविषयींचे अथवा तो ब्रह्मासह त्यांना कसा भोगतो; हें सांगणें उचित आहे. यास्तव आतां या विचारास आरंभ केला जातो.

**भाष्यं**—तत्र पितापुत्राख्यायिकायां पूर्वविद्याशेषभूतायां तपो ब्रह्मविद्यासाधनमुक्तम्। प्राणादेराकाशान्तस्य च कार्यस्यान्नान्नादत्वेन विनियोगश्चोक्तः। ब्रह्मविषयोपासनानि च। ये च सर्वे कामाः प्रतिनियतानेकसाधनसाध्या आकाशादिकार्यभेदविषया एते दर्शिताः। एकत्वे पुनः कामकामित्वानुपपत्तिः। भेदजातस्य सर्वस्याऽऽत्मभूतत्वात् ॥

**भाष्यार्थ**— त्यांत पूर्वविद्येच्या शेषभूत अशा या पिता-पुत्रांच्या आख्यायिकेंत तप हें ब्रह्मविद्येचें साधन आहे, असें सांगितलें आणि प्राणादिकांपासून आकाशान्त कार्यांचा

विनियोग अन्न व अन्नाद या रूपानें सांगितला. ब्रह्मविषयक उपासनेंहि सांगितलीं, तसेंच, जे प्रत्येकाला नियत, अनेक साधनसाध्य व आकाशादि कार्यभेदविषयक काम ते हे सर्व दाखविले. पण आत्म्याचें जर एकत्व असेल तर काम व कामित्व यांची अनुपपत्ति होते. कारण सर्व भेदजात आत्मभूत आहे.

**भाष्यं—तत्र कथं युगपद्ब्रह्मस्वरूपेण सर्वान्कामानेवंवित्समश्नुत इत्युच्यते। सर्वात्मत्वापत्तेः। कथं सर्वात्मत्वापत्तिरित्याह। पुरुषादित्यस्थात्मैकत्वविज्ञानेनापोह्योत्कर्षापकर्षावन्नमयाद्यात्मनोऽविद्याकल्पितान्क्रमेण संक्रम्याऽऽनन्दमयान्तान्सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मादृश्यादिधर्मकं स्वाभाविकमानन्दमजममृतमभयमद्वैतं फलभूतमापन्न इमाँल्लोकान्भूरादीननुसंचरन्निति व्यवहितेन संबन्धः॥**

**भाष्यार्थ**—'तर मग असें असतांना ब्रह्म हृदयाकाशांतील गुहेंत अवस्थित आहे, हें जाणणारा ब्रह्मस्वरूपानें सर्व कामांना एकाच वेळीं भोगतो, असें कसें ह्मणतां?' ह्मणून कोणी विचारील तर सांगतात.—त्याला सर्वात्मता प्राप्त झाल्यामुळें तो सर्व काम एकाच वेळीं भोगतो.—'पण त्याला सर्वात्मतापत्ति कशी?' म्हणून कोणी विचारील तर वेद सांगतो—पुरुष व आदित्य यांतील आत्म्याच्या एकत्वविज्ञानानें त्यांच्या ठिकाणचे उत्कर्षापकर्षभाव नाहींसे करून आनन्दमयापर्यंत अन्नमयादि अविद्याकल्पित आत्म्यांचें क्रमानें संक्रमण करून सत्य, ज्ञान, अनन्त, अदृश्यादिधर्मक, स्वाभाविक आनंद अज, अमृत, अभय, अद्वैत व फलभूत, अशा ब्रह्माला प्राप्त झालेला तो 'इमान् लोकान्'—ह्या भूः, भुवः इत्यादि लोकांतून अनुसंचार करीत राहतो, असा मधलीं कांहीं पदें सोडून पुढच्या पदांशीं अन्वय लावावा.

**भाष्यं—कथमनुसंचरन्। कामान्नी कामतोऽन्नमस्येति कामान्नी। तथा कामतो रूपाण्यस्येति कामरूपी। अनुसंचरन्सर्वात्मनेमाँल्लोकानात्मत्वेनानुभवन्। किम्, एतत्साम गायन्नास्ते। समत्वाद्ब्रह्मैव साम सर्वानन्यरूपं गायञ्शब्दयन्नात्मैकत्वं प्रख्यापयँल्लोकानुग्रहार्थं तद्विज्ञानफलं चातीव कृतार्थत्वं गायन्नास्ते तिष्ठति। कथम्—**

**भाष्यार्थ**—पण तो कसा अनुसंचार करणारा? तर 'कामान्नी' म्ह० इच्छेच्या अनुसार ज्याला अन्न प्राप्त होतें तो कामान्नी, त्याचप्रमाणें ज्याला इच्छेप्रमाणें रूपें प्राप्त होतात तो कामरूपी, अशा रीतीनें अनुसंचार कारणारा म्ह० सर्वात्मरूपानें या लोकांचाहि आत्मरूपानें अनुभव घेणारा तो. काय करतो? तर हें साम गात राहतो. ब्रह्म सर्वत्र सम असल्यामुळें तेंच साम म्ह० सर्वांशीं अनन्यरूप असणारें, तें गात, सामाचा उच्चार करीत—आत्म्याचें एकत्व प्रकट करीत व लोकांवर अनुग्रह करण्या-

साठीं एकत्वविज्ञानानें फलहि प्रकट करीत, आपलें अत्यंत कृतार्थत्व गात राहतो. तें कसें तर—

श्रुतिः—हा३वु हा३वु हा३वु (५)। अहमन्नमहमन्नमहमन्नम्। अहमन्नादोऽ३हमन्नादोऽ३हमन्नादः। अहꣳ श्लोककृदहꣳ श्लोककृदहꣳ श्लोककृत्। अहमस्मि प्रथमजा ऋता३स्य। पूर्वं देवेभ्यो अमृतस्य ना३भायि॥

अर्थ—'हा ३ वु' हे तीन शब्द 'अहो' याअर्थी अत्यंत विस्मय प्रकट करण्यासाठीं आहेत. अहो, अद्वैत आत्मा निरंजन असूनहि मीच अन्न व अन्नाद आहें, त्याचप्रमाणें मी श्लोककर्ता म्ह० अन्न व अन्नाद यांचा संघात करणारा आहें. मी या मूर्तामूर्त जगाच्या पूर्वी उत्पन्न झालेला हिरण्यगर्भहि आहें. देवाच्या पूर्वी असणारा विराड्रूप आहें. अमृतत्वाचा मध्य आहें.

भाष्यं—हा३वु हा३वु हा३वु। अहो इत्येतस्मिन्नर्थेऽत्यन्तविस्मयख्यापनार्थम्। कः पुनरसौ विस्मय इत्युच्यते—अद्वैत आत्मा निरंजनोऽपि सन्नहमेवान्नमन्नादश्च। किंचाहमेव श्लोककृत्। श्लोको नामान्नान्नादयोः संघातस्तस्य कर्ता चेतनावान्। अन्नस्यैव वा परार्थस्यान्नादार्थस्य सतोऽनेकात्मकस्य पारार्थ्येन हेतुना संघातकृत्। त्रिरुक्तिर्विस्मयत्वख्यापनार्था। अहमस्मि भवामि। प्रथमजाः प्रथमजः प्रथमोत्पन्न ऋतस्य सत्यस्य मूर्तामूर्तस्यास्य जगतः। देवेभ्यश्च पूर्वम्। अमृतस्य नाभिरमृतत्वस्य नाभिर्मध्यं मत्संस्थममृतत्वं प्राणिनामित्यर्थः॥

भाष्यार्थ—'हा३वु हा३वु हा३वु' हे तीन शब्द 'अहो' या अर्थी अत्यंत विस्मय प्रकट करण्यासाठीं आहेत. पण तो विस्मय कोणता, तेंच सांगितलें जातें—अद्वैत आत्मा निरंजन असूनहि मीच अन्न व अन्नाद आहें. त्याचप्रमाणें मीच श्लोककर्ता आहें. श्लोक म्हणजे अन्न व अन्नाद यांचा संघात. त्याचा कर्ता—चेतनावान्. अथवा परार्थ म्ह० अन्नादासाठीं असलेल्या अनेकात्मक अन्नाचाच परार्थत्व म्ह० दुसऱ्या करितां असणें, या निमित्तानें संघात करणारा. 'श्लोककृत्' या शब्दाचा तीनदां जो उच्चार केला आहे तो विस्मयत्व प्रकट करण्यासाठीं आहे. मी 'प्रथमजाः'—प्रथम उत्पन्न झालेला; मी ऋत म्ह० सत्य अशा या मूर्त व अमूर्त जगाचा प्रथमज (हिरण्यगर्भहि) आहें, त्याचप्रमाणें देवांच्याहि पूर्वी असणारा विराड्रूप आहें. 'अमृतस्य' अमृतत्वाची नाभि म्ह० मध्य आहें. प्राण्यांचें अमृतत्व मजमध्यें उत्तम प्रकारें स्थित आहे, असा याचा अर्थ.

**श्रुतिः—यो मा ददाति स इदेव माऽऽ३वाः । अहमन्नमन्नमदन्तमा३द्मि । अहं विश्वं भुवनमभ्यभवा३म् । सुवर्न ज्योतीः । य एवं वेद । इत्युपनिषत् ॥१०॥**

**अर्थ**—जो कोणी मज अन्नाला अन्नार्थी लोकांस देतो तो विनष्ट न झालेल्या यथाभूत अन्नाचें रक्षण करतो. पण जो दुसरा कोणी योग्य कालीं अन्नरूप अशा मला याचकांना न देतां स्वतःच खातो, त्याला मी आतां अन्नरूपानेंच खातों. मी या सर्व भुवनास पराभूत करतों. आदित्याप्रमाणें आमची ज्योति नित्य प्रकाशमय आहे. जो असें जाणतो त्याला पूर्वोक्त फल प्राप्त होतें.

**भाष्यं—यः कश्चिन्मा मामन्नमन्नार्थिभ्यो ददाति प्रयच्छत्यन्नात्मना ब्रवीति स इदित्थमेवमविनष्टं यथाभूतमावा अवतीत्यर्थः । यः पुनरन्यो माममदत्त्वाऽर्थिभ्यः काले प्राप्तेऽन्नमत्ति तमन्नमदन्तं भक्षयन्तं पुरुषमहमन्नमेव संप्रत्याद्मि भक्षयामि । अत्राऽऽहैवं तर्हि बिभेमि सर्वात्मत्वप्राप्तेर्मोक्षादस्तु संसार एव यतो मुक्तोऽप्यहमन्नभूत आद्यः स्यामन्नस्य । एवं मा भैषीः संव्यवहारविषयत्वात्सर्वकामाशनस्यातीत्यायं संव्यवहारविषयमन्नान्नादादिलक्षणमविद्याकृतं विद्यया ब्रह्मत्वमापन्नो विद्वांस्तस्य नैव द्वितीयं वस्त्वन्तरमस्ति यतो बिभेत्यतो न भेतव्यं मोक्षात्॥**

**भाष्यार्थ**—जो कोणी मज अन्नाला अन्नार्थी लोकांस देतो, म्ह० मला अन्नरूपानें बोलतो तो 'इत्'–अशाप्रकारें, अशा तऱ्हेनें विनष्ट न झालेल्या यथाभूत अन्नाचें रक्षण करतो, असा याचा अर्थ. पण याच्या उलट जो दुसरा काल प्राप्त झाला असतां मला याचकांना न देतां स्वतः अन्न खातो त्या अन्न खाणाऱ्या—अन्न भक्षण करणाऱ्या पुरुषाला मी आतां अन्नरूपानेंच खातों. हें ऐकून कोणी म्हणतो कीं, असें जर असेल तर मी त्या सर्वात्मप्राप्तीला भितों. मला आपला मोक्षापेक्षां संसारच असूं दे. कारण मी मुक्त जरी झालों तरी अन्नभूत होत्साता अन्नाचाच भक्षणीय होईन! (पण त्यावर आह्मी सांगतों कीं, बाबारे)='**मा भैषीः**'–असा भिऊं नकोस. कारण, सर्व कामाशनाला संव्यवहारविषयत्व आहे. म्ह० सर्व कामांचा भोग घेणें, हा व्यवहाराचा विषय आहे. पण हा विद्वान् या अविद्याकृत अन्न-अन्नाद इत्यादिलक्षण संव्यवहाराच्या विषयाचें उल्लंघन करून विद्येच्या योगानें ब्रह्मत्वास प्राप्त झालेला आहे, त्याच्या दृष्टीनें दुसरी निराळी वस्तूच नाहीं कीं, जिला तो भिईल. यास्तव मोक्षाला भिऊं नये.

**भाष्यं—एवं तर्हि किमिदमाह–अहमन्नमहमन्नाद इत्युच्यते । योऽयमन्नान्नादादिलक्षणः संव्यवहारः कार्यभूत स संव्यवहारमात्रमेव न परमार्थवस्तु । स एवंभूतोऽपि ब्रह्मनिमित्तो ब्रह्मव्यतिरेकेणासन्निति कृत्वा ब्रह्मविद्याकार्यस्य ब्रह्मभावस्य स्तुत्यर्थमुच्यते । अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादोऽहमन्नादोऽह-**

**मन्नाद इत्यादि । अतो भयादिदोषगन्धोऽप्यविद्यानिमित्तोऽविद्योच्छेदाद्ब्रह्मभूतस्य नास्तीति । अहं विश्वं समस्तं भुवनं भूतैः संभजनीयं ब्रह्मादिभिर्भवन्तीति वाऽस्मिन्भूतानीति भुवनमभ्यभवामाभिभवामि परेणेश्वरेण स्वरूपेण ॥**

**भाष्यार्थ**---असें जर आहे, तर ' मी अन्न व अन्नाद आहें हें काय म्हणत आहे,' असा प्रश्न आला असतां सांगतों–जो हा अन्न-अन्नाद इत्यादिलक्षण कार्यभूत संव्यवहार तो नुसता संव्यवहारच आहे. परमार्थ वस्तु नव्हे. तो असा जरी असला तरी ब्रह्मनिमित्तक असल्यामुळें म्ह० ब्रह्म हेंच त्या संव्यवहाराचें कारण असल्यामुळें ब्रह्माहून पृथक् पदार्थ या रूपानें असत् आहे; यास्तव ब्रह्मविद्येचें कार्य असा जो ब्रह्मभाव त्याच्या स्तुत्यर्थ ' अहमन्नमहमन्नमहमन्नम् ' व ' अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः ' इत्यादि सांगितलें जात आहे. यास्तव अविद्येचा उच्छेद झाल्यामुळें ब्रह्मभूत विद्वानाला अविद्यानिमित्तक भयादि दोषांचा गंधहि नाहीं. 'अहं'–मी 'विश्वं'–समस्त 'भुवनं'–ब्रह्मादि भूतांकडून संविभाग करण्यास योग्य असलेलें अथवा यांत भूतें होतात, म्हणून भुवन ' अभ्यभवाम् '–पराभूत करतों. म्ह० श्रेष्ठ ईश्वरस्वरूपानें या समस्त भुवनाचा उपसंहार करतों. ( अर्थात् ईश्वराशीं आपलें तादात्म्य आहे, असें ज्ञान झालें असतां ' मी ' या वृत्तीचा बाध होतो. अद्वैत सिद्ध होतें. त्यामुळें भयाचें कारणच उरत नाहीं, असा भावार्थ.)

**भाष्यं---सुवर्न ज्योतीः सुवरादित्यो नकार उपमार्थे । आदित्य इव सकृद्विभातमस्मदीयं ज्योतीर्ज्योतिः प्रकाश इत्यर्थः । इति वल्लीद्वयविहितोपनिषत्परमात्मज्ञानं तामेतां यथोक्तामुपनिषदं शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वा भृगुवत्तपो महदास्थाय य एवं वेद तस्येदं फलं यथोक्तमोमिति ॥१०॥**

**भाष्यार्थ**---'सुवर्न ज्योतीः' यांतील 'सुवर्' म्ह० आदित्य; नकार उपमा (इव) या अर्थी म्ह० आदित्याप्रमाणें ' सकृत् विभातं '–नित्य प्रकाश पावणारी 'ज्योतीः' म्ह० ज्योति–प्रकाश. आमची ज्योति–प्रकाश सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें नित्य प्रकाशमय आहे. 'इति' म्ह० या दोन्ही वल्लींनीं सांगितलेलें ' उपनिषद् ' म्ह० परमात्मज्ञान आहे. त्या या वर सांगितलेल्या प्रकारच्या उपनिषदाला–परमात्मज्ञानाला शान्त, दान्त, उपरत, तितिक्षु व समाहित होऊन, भृगूप्रमाणें मोठें तप करून, जो असें जाणतो त्याला वर सांगितलेल्या प्रकारचें फल प्राप्त होतें. ओमिति ॥ (इति भृगुवल्ल्यध्याये दशमोऽनुवाकः)

**ॐ । सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

**इति कृष्णयजुर्वेदीयतैत्तिरीयोपनिषदि तृतीयो भृगुवल्ल्यध्यायः समाप्तः ॥ ३ ॥**

**इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ समाप्त झाला.**